# ॥ पद्मपुराण ॥

(उत्तरार्ध)





प्र. न. जोशी

प्रकाशक :
श्री. मनोहर य. जोशी
बी.ए.बी कॉम.
प्रसाद प्रकाशन,
१८९२, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ३०.

गुरुपौर्णिमा १९०३.



आपले वेद आपली पुराणे
ठेव योजनेतील ग्रंथ.



मुद्रक :
प्रमोद वि. बापट,
प्रमोद प्रिंटर्स,
१०१९, सदाशिव पेठ,
नागनाथ पाराजवळ,
पुणे ४११०३०.

## प्रकाशकाचे निवेदन

'आपले वेद, आपली पुराणे' या योजनेतील पहिले पाच ग्रंथ म्हणजे ऋग्वेद, ब्रह्मपुराण, पद्मपुराणाचे दोन भाग व विष्णुपुराण एकदमच प्रकाशित होत आहेत.

सोप्या भाषेत वेद व पुराणे समजावन सांगणारे ग्रंथ प्रकाशित करावेत, अशी कल्पना बरेच दिवस माझ्या मनात होती. ही कल्पना माझे वडील कै. य. गो. जोशी यांनी ज्या पद्धतीने ज्ञानेश्वरी सोप्या भाषेत समजावून सांगणारा 'सुबोध ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ लिहिला त्यावरून सुचली. मात्र संपूर्ण ज्ञानेश्वरीचे रूपांतर सुबोध ज्ञानेश्वरीत आहे. विस्तार, पुनरुक्ती, काही कालबाह्य भाग इ. अनेक कारणांमुळे पुराणांचे व वेदांचे संपूर्ण भाषांतर देणे शक्य नव्हते व त्याची किंमतही कोणाही माणसाच्या आवाक्याबाहेरची झाली असती.

वेदांत व पुराणांत आहे तरी काय ? ही प्रत्येकाची उत्सुकता असते. ते कुतूहल पुरे करणारे पण त्याचबरोबर प्रत्येक वेदाची व पुराणाची यथार्थ कल्पना देऊ शकणारे असे हे ग्रंथ आहेत.

आजपर्यंत पुराणांच्या मराठीकरणाचे काही प्रयत्न झाले आहेत. त्यांचा शोध घेतला. परंतु अठराही महापुराणांचे संपूर्ण भाषांतर आतापर्यंत झालेले नाही. पद्म, मत्स्य, लिंग, विष्णु, शिव, स्कंद अशा काही पुराणांची भाषांतरे पूर्वी झालेली आढळतात. परंतु वेद व पुराणांचा सोप्या भाषेत परिचय करून देण्याचा जसा प्रयत्न आम्ही करीत आहोत तसा प्रयत्न कोणी केल्याचे आढळले नाही.

संपूर्ण योजना मी मनाशी तयार केली. माझ्या समविचारांचे श्री. स. कृ. देवधर व श्री. प्र. न. जोशी यांच्याशी अनेक वेळा चर्चा केली व योजनेचा पक्का आराखडा तयार केला. परंतु आजच्या महागाईच्या दिवसांत वाचकांना परवडेल अशा किंमतीत संपूर्ण संच देणे कठीण वाटू लागले. प्रकाशनासाठी फार मोठ्या भांडवलाचीही गरज होती. अनेक

दिवस विचार करता करता ठेवयोजनेंची कल्पना मनात आली, 'प्रसाद'-वर लोकांचा पूर्ण विश्वास आहे. 'प्रसाद' मासिकाची ठेव-योजना बरीच वर्षे यशस्वीपणे चालू आहेच. यावरूनच ही ठेवयोजना तयार केली व आता मात्र हे काम नक्की उभे राहील, अशा विचाराने मी ऑगस्ट, ८० च्या 'प्रसाद'च्या अंकात योजना प्रसिद्ध केली ती प्रसिद्ध होताच वाचकांचा प्रचंड प्रतिसाद मिळाला व अल्पावधीतच लक्षावधी रुपये जमा झाले.

योजना कार्यवाहीत आणण्यासाठीही अनेक सुहृदांचे मोलाचे साह्य झाले आहे. निदान दोन पिढ्या टिकेल अशा उत्तम कागदाची आमची गरज श्री. बाबुरावजी पारखे यांनी तत्परतेने भागविली आहे. प्रमोद प्रिंटर्सचे श्री. प्रमोद बापट यांनी निष्ठेने छपाईची जबाबदारी उचलली आहे. मुद्रितशोधनाच्या बाबतीत श्रीमती सुमती धायगुडे यांचे सहकार्य लाभले आहे. ग्रंथाची सजावट करण्यात चित्रकार वसंत सहस्रबुद्धे यांनी मदत केली आहे. ग्रंथबांधणीच्या मोठ्या कामात श्री. बा. द. कातुरे यांनी तत्परतेने साह्य केले आहे. या सर्व इष्टमित्रांचे साह्य ग्रंथयोजना पूर्ण होईपर्यंत मिळणार आहे. म्हणून तूर्त त्यांचा निर्देशच येथे केला आहे. आता निश्चितपणे संपूर्ण संच ठरलेल्या मुदतीत प्रकाशित होईल.

यानंतर अशाच योजनेत सांस्कृतिक महत्त्वाचे आणखी काही ग्रंथ प्रकाशित करण्याचा मानस आहे. त्यालाही वाचकांचा प्रतिसाद मिळेल असा विश्वास आहे.

मनोहर य. जोशी

## लेखकाचे निवेदन

'आपले वेद-आपली पुराणे' या संकल्पित ग्रंथमालेतील तिसरा ग्रंथ 'पद्मपुराण, उत्तरार्ध' वाचकांच्या हाती देण्यात अत्यंत संतोष होत आहे. प्रथमच हे स्पष्ट करायला हवे की, हा ग्रंथ म्हणजे पद्मपुराणाचे भाषांतर नाही, अनुवाद नाही, साररूपही नाही. सर्वसामान्य अशा बहुश्रुत वाचकास आपल्या पूर्वपरंपरेचा वैचारिक व सांस्कृतिक धागा ध्यानात यावा, अशी फार इच्छा असल्याचे या योजनेस जो प्रतिसाद मिळाला त्यावरून वाटले. ज्यांना संस्कृत परिचयाचे नाही, ज्यांना मूळ संस्कृत पुराणे सहज उपलब्ध होत नाहीत, ज्यांना उपलब्ध झाली तरी त्यांच्या अवाढव्य विस्तारामुळे ती वाचणे शक्य होत नाही; त्यांच्यासाठी प्रत्येक पुराणातील निवडक विषयांची पुनः रचना करून, पुनरुक्ती टाळून त्या त्या पुराणाचे यथायोग्य दर्शन घडविण्याचा येथे प्रयत्न केला आहे. या प्रयत्नात माझे स्वतःचे असे काही नाही. संस्कृत विद्येचे संशोधक, प्राचीन संस्कृतीचे अभ्यासक यांच्यासाठी हा उपक्रम नाही हे स्पष्टच आहे.

निम्मे आयुष्य संतसाहित्य, संतचरित्रे, संतबोध यांच्या चिंतनात, मननात गेल्यावर आता जिज्ञासा अशी झाली की, ज्ञानेश्वरांनी तरी 'अष्टादश पुराणें। तींचि मणिभूषणें' असा पुराणांचा उल्लेख का केला? 'पाहिलीं पुराणें धांडोळिलीं दरुषणें' असे तुकाराममहाराज म्हणतात, तेव्हा त्यांच्या पाहण्यात कोणती पुराणे आली होती? 'पुराणांचा इतिहास। गोडरस सेविला' हा गोड रस कोणता? 'तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं। नव्हे माझी वाणी पदरिंची' असे महाराज म्हणतात, तेव्हा त्यांच्या समोर कोणते पुराण होते? अशा प्रश्नांच्या उत्तरांच्या शोधात मी गेली सहा वर्षे आहे. पूर्वीपासून घरी बहुतेक सर्व पुराणे असल्याने या शोधास गती मिळाली. 'प्रसाद'चे उत्साही चालक श्री. म. य. तथा बापूसाहेब जोशी यांची कार्यकुशल व गुणग्राही योजना मला उपकारक ठरेल असे वाटल्यावरून मी हे पुराणांच्या दर्शनाचे नवे काम स्वीकारले आहे. त्यांच्या उत्साहाचे चीज मराठी बोलणारा मनुष्य निःसंशय करील असा विश्वास वाटतो.

'रेणुका', लक्ष्मी पार्क — प्र. न. जोशी
नवी पेठ पुणे ३०. १९-७-१९८१

# पद्मपुराण-परिचय

## उत्तरार्ध

**वैष्णव कोणास म्हणावे ?**

शौचसत्यक्षान्तियुक्तो रागद्वेषविवर्जितः ।
वेदविद्याविचारज्ञो यः स वैष्णव उच्यते ।।
अग्निहोत्ररतो नित्यं नित्यं चातिथिपूजकः ।
पितृभक्तो मातृभक्तः स वै वैष्णव उच्यते ।।
दयाधर्मेण संयुक्तस्तथा पापपराङ्गमुखः ।
शंखचक्रांकितो यो वै स वै वैष्णव उच्यते ।।
कण्ठे मालाधरो यस्तु मुखे रामं सदोच्चरेत् ।
गानं कुर्यात् सदा भक्त्या स नरो वैष्णवः स्मृतः ।।
पुराणेषु रता नित्यं यज्ञेषु च रताः सदा ।
ते नरा वैष्णवा ज्ञेयाः सर्वधर्मेषु सम्मताः ।।

(उत्तरखंड ८२-४-८)

जो आतून व बाहेरून पवित्र आहे, सत्यवादी व क्षमाशील आहे, राग-द्वेषापासून मुक्त आहे, जो ब्रह्मविद्येच्या विचारात कुशल आहे, तोच वैष्णव समजावा. जो नेहमी अग्निहोत्र करतो, जो नेहमीच अतिथीचा आदरसत्कार करतो, जो माता-पित्यांचा भक्त आहे, तोच खरा विष्णुभक्त समजावा. जो दयाधर्माचे पालन करतो, जो पापापासून दूर होतो, जो शरीरावर शंख, चक्र आदी चिन्हे धारण करतो, त्यालाच वैष्णव म्हणावे. ज्याच्या गळयात माळ आहे, ज्याच्या मुखात सतत प्रभूचे नाम असते, जो नित्य भक्तिपूर्वक प्रभूचे गुणगान करतो, त्यालाच वैष्णव ही पदवी शोभते. जे लोक नित्य पुराणाचे पाठ वाचतात, ऐकतात, सदा यज्ञाच्या अनुष्ठानात रमतात, त्यांनाच वैष्णव म्हणावे.

तेच सर्व धर्मांच्या दृष्टींनी सन्माननीय होत.

## सृष्टीची अशी रचना

वैष्णव कुणास म्हणावे, याचा निर्णय पद्मपुराणाने वरील प्रकाराने दिलेला आहे. मानवी मनाने आयुष्यात कशाचे चिंतन करावे, कशाचा ध्यास घ्यावा, कशासाठी आपल्या जीविताची सार्थकता मानावी ? अशा प्रश्नांची उत्तरे शोधण्यासाठी प्राचीन ऋषिमुनींचे प्रयत्न आहेत. पुराणांनी कथांच्या, आख्यानांच्या माध्यमाने सर्वसामान्य लोकांसाठी या प्रश्नांची चर्चा केली. कथा, उपकथा, आख्याने, भावगर्भ स्तोत्रे, विविध प्रकारची तीर्थस्थाने, मासमाहात्म्ये, अवतारकथा आणि अनेक भौतिक विषय यांनी पुराणांची सृष्टी उभी राहिलेली आहे. या पुराण-सृष्टीने सृष्टीचे, निसर्गाचे, ब्रह्मांडाचे, भारतवर्षाचेही वर्णन विस्ताराने केले आहे. पद्मपुराणाने सृष्टीच्या रचनेचा, विकासाचा निर्देश अनेक ठिकाणी केला आहे.

पद्मपुराणाच्या मते प्रथम हिरण्यमय (तेजोमय) अंडचातून ब्रह्म-देवाची निर्मिती झाली. या अंडचाभोवती सर्वत्र जलाचे आवरण, जला-भोवती तेजाचे, तेजाच्या बाहेर वायूचे आवरण आहे. वायू आकाशाने घेरलेला आहे. या अंडचातूनच सर्व लोकांची निर्मिती झाली. सर्व नद्या, पर्वत, मन्वन्तरे, कल्प इत्यादींचा उगम याच स्थानापासून आहे. पद्म-पुराणातील पुलस्त्य ऋषी सांगतात की, संकल्प, दर्शन, स्पर्श करून प्रथम प्रजेची निर्मिती होत राहिली. परंतु दक्ष प्रजापतीच्यापासून मैथुनातून प्रजा निर्माण होत गेली. त्याने प्रथम देवता, ऋषी, नाग, इत्यादींची निर्मिती केली. पण प्रजेची वृद्धी झाली नाही. तेव्हा त्याने आपली पत्नी वारिणीच्या साह्याने साठ कन्यांना जन्म दिला. धर्म, कश्यप, चंद्रमा, अरिष्टनेमी, भृगुपुत्र, कृशाश्व, अंगिरा यांच्याशी त्यांची लग्ने लावून दिली. यांच्यापासून पुढे सर्व विस्तार झाला. अरुंधती, वसू, जामी, लंबा, भानू, मरुत्वती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या व विश्वा या दहा धर्माच्या पत्नी. विश्वापासून विश्वदेव, साध्यापासून साध्य, मरुत्वती-पासून मरुत्वान्, वासूचे आठ वसू, भानूपासून भानू, लंबापासून घोष,

जामीपासून नागवीथी, नावाची कन्या, अरुंधतीपासून पृथ्वीवरील सर्व प्राणी अशी ही निर्मिती पद्मपुराणाने दिली आहे.

आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, पृत्यूष व प्रभास हे आठ वसू. शांत, वैतण्ड, सांब व मुनिबभ्रू हे आपाचे चार पुत्र. प्रजापती विश्वकर्मा हा प्रभासाचा पुत्र. हा शिल्पज्ञ घर, उद्याने, प्रासाद, तलाव, आभूषणे, उपवने, कूप इत्यादींची निर्मिती करण्यात कुशल झाला. अजैकपाद, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, त्र्यंबक, सावित्र, जयन्त, पिनाकी व अपराजित या अकरा रुद्रांपासून त्रिशूलधारी शेकडो पुत्र निर्माण झाले. अदिती, दिती, दनू, अरिष्टा, सुरसा, सुरभी, विनता, ताम्रा, क्रोधवशा, इरा, कद्रू, खसा व मुनी या कश्यपांच्या पत्नी होत. इंद्र, धाता, भग, त्वष्टा, मित्र, वरुण, अर्यमा, विवस्वान, सविता, पूषा, अंशुमान्, विष्णू असे बारा आदित्य अदिती व मीरीचिनंदन कश्यप यांचे पुत्र होत. दिती व कश्यप यांचे पुत्र हिरण्यकशिपू व हिरण्याक्ष. प्रल्हाद, अनुल्हाद, संल्हाद व ल्हाद हे हिरण्यकशिपूचे पुत्र असून आयुष्मान्, शिबी, वाल्कली, विरोचन हे चार पुत्र प्रल्हादाचे होत. विरोचनाचा पुत्र बली. बलीच्या अनेक पुत्रांतील बाण हा सर्वश्रेष्ठ पुत्र होय. उलूक, शकुनी, भूतसंतापन, महाभीम हे चार पुत्र हिरण्याक्षाचे. यांच्यापासूनही महाबली, रूपवान, तेजस्वी पुत्रांची परंपरा सुरू झाली. कश्यपांचा आणखी विस्तार त्यांच्या विविध पत्नींच्या संदर्भात पद्मपुराणाने दिलेला आहे.

मरुद्गण, भिन्न भिन्न समूहांचे राजे, चौदा मन्वन्तरे यांचाही खुलासा पद्मपुराण करते. स्वर्गखंडात सृष्टीचा क्रम पुन्हा वर्णन करण्यात आला आहे. प्रलयकालाच्या नंतर या सृष्टीमधील कोणतीच वस्तू शिल्लक राहिली नव्हती. केवळ ज्योतिमय ब्रह्मच होते. हे ब्रह्म नित्य, निरंतन, शांत, निर्गुण, सदा निर्मल, आनंदधाम व शुद्ध आहे. संसारबंधनापासून मुक्त होणारे वा होऊ पाहाणारे या ब्रह्माचे चिंतन-मनन करतात. हे सनातन ब्रह्म ज्ञानरूप, सर्वज्ञ, अनंत, अजन्म, अविकारी, अविनाशी, नित्यशुद्ध, अच्युत, व्यापक व सर्वांहून श्रेष्ठ आहे. विकारमय जगत् पाच ब्रह्मांपासून उत्पन्न झाले. ब्रह्मापासूनच मूळ

प्रकृतीचा जन्म झाला. प्रकृतीपासून महत्तत्त्वाची निर्मिती झाली. हे तत्त्व सात्त्विक, राजस, तामस अशा तीन गुणांनी युक्त होते. यातूनच तीन अहंकार निर्माण झाले.

## आणि हे असे भारतवर्ष

भारतवर्षाचेही विस्ताराने वर्णन पद्मपुराणाने केले आहे. राजा प्रियमित्र, देव, वैवस्वत, मनू, पृथू, इक्ष्वाकू, ययाती, अम्बरीष, मान्धाता, नहुष, मुचुकुंद, कुबेर, गाधी, सोम, इत्यादी बलवान राजे या भारतवर्षात झाले. महेंद्र, मलय, सह्य इत्यादी सप्तपर्वत; गंगा, सिंधू, सरस्वती, गोदावरी, नर्मदा, वहुदा, शतद्रू, चंद्रभागा, यमुना, विपाशा, वितस्ता, शरावती, कावेरी, शरयू, चर्मण्वती, तापी, पापहारिणी बहुला, महानदी, क्षिप्रा, वरुणा, असी, पर्णाशा; इत्यादी विविध नद्यांनी भारतवर्षाची भूमी संपन्न केली आहे. कुरू, पांचाल, शाल्व, मात्रेय, जांगल, शूरसेन, पुलिंद, चेदी, मत्स्य, भोज, उत्कल, कोशल, मद्र, कलिंग, कुंती, अवन्ती, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, मालव, वंग, महिष, शशक इत्यादी जानपदांचा निर्देशही पद्मपुराण करते, द्रविड, केरल, प्राच्य, मूषिक, कर्णाटक, माहिषक, किष्किंधा, चोल, इत्यादी दक्षिण भारतीय जानपदांचा उल्लेखही आहे. यवन, कंबोज, या म्लेंच्छांचा निर्देश आहे. आभीर, दरद, पारसिक, किरातांच्या विविध जाती, तोमर, हन्यमान, करभंजक इत्यादी जानपदांचा उल्लेख करून पद्मपुराण पुढे पुष्कर, नर्मदा, कावेरी इत्यादी तीर्थस्थानांचे माहात्म्य विस्ताराने सांगते.

## हरिप्रिया तुलसीमंजिरी

पद्मपुराणाने वर्णन केलेले तुलसीमाहात्म्य विशेष महत्त्वाचे वाटते. तुलसीचे नाव उच्चारताच असुरांचा दर्प हरण करणारे श्रीविष्णू प्रसन्न होतात. माणसाच्या मनातील पाप नष्ट होते. याच्या दर्शनाने अनेक गायी दान दिल्याचे पुण्य मिळते. शालग्रामाच्या पूजेसाठी ज्याच्या घरापुढे तुलशीचे रोप आहे तो धन्य आहे. भगवान केशवाची पूजा तुलसीदलांनी केल्यास यमराजही संतुष्ट राहतो. वासुदेवाची पूजा तुलसी-

मंत्राने करावी.

तुलस्यमृतजन्मासि सदा त्वं केशवप्रिये ।
केशवार्थं चिनोमि त्वां वरदा भव शोभने ।।
त्वदङ्गसम्भवैर्नित्यं पूजयामि यथा हरिम् ।
तथा कुरु पवित्राङ्गि कलौ मलविनाशिनि ।।

(५९-११-१३)

तुलसी तू अमृतापासून निर्माण झालीस. तू केशवला सदाच प्रिय-आहेस. कल्याणी, मी भगवंताच्या पूजेसाठी नेहमी तुझीच पाने पसंत करतो. तू तर माझ्यासाठी वरदायिनी आहेस. तुझ्या अंगापासून निर्माण झालेली पाने व मंजिऱ्या यांनी मी श्रीहरीची पूजा करतो. पवित्रांगी तुलसी, तुझ्यामुळे कलिमलाचा नाश होतो. देवेश्वरी, थोर थोर देव-देवताही तुझा प्रभाव वर्णन करतात. मुनी, सिद्ध, गंधर्व, पातालनिवासी नागराज शेष यांना तुझा पूर्ण महिमा समजला नाही तरी भगवान श्रीविष्णू तुझे महत्त्व पूर्णपणाने जाणतात.

तुलसी, मी तुला प्रणाम करतो. साक्षात् श्रीकृष्णाने तुला गोमती-तीरावर प्रस्थापित केले. वृंदावनात भ्रमण करताना त्याने व गोप-गोपींनी तुझेच सेवन केले. जगत्प्रिया तुलसी, पूर्वी राक्षसांचा वध करण्याच्या हेतूनें प्रभू रामचंद्राने तुझी स्थापना शरयूच्या किनाऱ्यावर केली. तुलसीदेवी, तुला माझा नमस्कार असो. अशोकवनात सीतेने तुझेच ध्यान केले म्हणून तुझी कृपा तिच्यावर झाली. प्रभू रामाचे व तिचे मीलन झाले. फार पूर्वी पार्वतीने भगवान शंकरांच्या प्राप्तीसाठी तुझी स्थापना हिमालयावर केली. तुलसी, सर्व देवांगना तुझीच स्तुती करतात. तुलसी, तू या सर्व चराचर जगास व्यापून राहिली आहेस. तुलसीची पाने ज्या पाण्यात पडतात त्या पाण्याने स्नान केल्यास गंगा-स्नानाचे पुण्य मिळते. देवेश्वरी, हरिप्रिये, माझ्यावर प्रसन्न हो. माझ्यावर कृपा कर. तुला नमस्कार असो.

## ब्रह्मचाऱ्याचा आचार

पुराणे नुसत्याच कथा सांगतात, आख्याने सांगतात, स्तुतिस्तोत्रे

देतात असे नाही. हे सर्व कथामाध्यम कशासाठी ? या प्रश्नाचेही भान त्यांना सतत आहे असे वाटते. आपला आचार शुद्ध असावा, शास्त्रसंमत असावा, साधा असावा, दैवी गुणांनी समृद्ध असावा याची काळजी पद्मपुराणाने घेतली आहे. स्वर्गखंडातच आचारधर्माचे सविस्तर विवेचन आले आहे. अक्षय फल देणारा कर्मयोग, मग तो ब्रह्मचाऱ्याचा असो, गृहस्थाचा असो वा संन्याशाचा असो, पुराणांनी महत्त्वाचा मानला आहे. ब्राह्मणाने आठव्या वर्षी उपनयन झाल्यानंतर या आचारप्रधान कर्मयोगाचे महत्त्व जाणावयास हवे. वेदांच्या अध्ययनासाठी बटूने आता तत्पर असावे. दंड, मेखला, यज्ञोपवीत, हिंसारहित मृगचर्म धारण करून मुनिवेषात ब्रह्मचारी बटूने असावे. गुरूच्या घरी राहून, भिक्षा मागून विद्या संपादन करावी. ब्राह्मणाने आपले यज्ञोपवीत सतत धारण करावे. शेंडीस गाठ मारलेली असावी. वस्त्र सफेद अथवा भगव्या रंगाचे असावे. काळसर मृगचर्म सर्वांत उत्तम. यज्ञोपवीताच्या उपवीत, निवीत, प्राचीनावीत इत्यादी प्रकारांची माहिती असावी. मुंज गवताच्या तीन वेढयांची मेखला असावी. बांबू अथवा पलाशाचा दंड द्विजाने धारण करावा.

ब्राह्मणाने सकाळी व संध्याकाळी संध्यावंदन करावे. अग्निहोत्र करावे. देवदेवता, ऋषी, पितर यांना तर्पण करून पाणी, पत्र, फल, फूल इत्यादींनी देवाची पूजा करावी. जल, भिक्षा, समिधा प्रत्येक दिवशी या गोष्टी मिळवाव्यात. यांचा संग्रह उद्यासाठी करू नये. ब्राह्मणाची भेट झाली की, त्याचे कुशल विचारावे. क्षत्रियाला अनामय (दुःखराहित्य), वैश्याला क्षेम आणि शूद्राला आरोग्य विचारावे. उपाध्याय, पिता थोरला बंधू, राजा, मामा, सासरा, माता, आजी, गुरुपत्नी, आत्या, मावशी, सासू, थोरली बहीण आणि दूध पाजणारी दाई यांना गुरूप्रमाणे मान द्यावा. गुरुजनांस पाहताच उठून हात जोडून प्रणाम करावा. त्यांच्याबरोबर एका आसनावर बसू नये. त्यांच्याशी वाद करू नये. वृद्ध शूद्राचाही सन्मान करावा. ब्राह्मण, स्त्री, राजा, नेत्रहीन, वृद्ध, भारपीडित मनुष्य, रोगी, दुर्बल यांना मान द्यावा.

ब्रह्मचाऱ्याने सदा आनंदी असावे. जितेन्द्रिय व्हावे. गुरूच्या आज्ञेत राहावे. अधिक भोजनामुळे आरोग्य, आयुष्य यांचा नाश होत जातो.

पूर्वाभिमुख होऊन भोजन करावे. उत्तराभिमुख बनून कधीच भोजन करू नये. द्विजाचा आचमनविधी, स्नानविधी, भोजनविधी यांसंबंधी फार बारकाईने विधिनिषेध सांगितले आहेत. मलमूत्रांचा त्याग कसा करावा, कोठे करावा, यांसंबंधीही मार्गदर्शन आहे. संध्या कशी करावी, गायत्रीमंत्र कसा जपावा, गुरूचा सन्मान कसा वाढवावा, यांचे फार चांगले विवेचन पद्मपुराणाने केले आहे.

## गृहस्थाचा सदाचार

विद्या पूर्ण झाल्यावर गुरूचा निरोप घेऊन ब्राह्मणाने गृहस्थधर्म स्वीकारावा. ब्राह्मणाचा जोडा कसा असावा, पोशाख कसा असावा, नित्य व्यवहार कसा असावा, याचेही मार्गदर्शन पद्मपुराण करते. स्त्री शुभ गुणांनी युक्त, रूपवती, सुलक्षणा योनिगत दोषांपासून अलिप्त असावी. स्त्री-समागम केव्हा असावा याचाही विवेक पद्मपुराणाने केलेला आहे. षष्ठी, अष्टमी, पूर्णिमा, द्वादशी, चतुर्दशी या तिथी निषिद्ध आहेत. क्षमा, दया, विज्ञान, सत्य, दम, शम, नित्य अध्यात्मचिंतन या गुणांनी ब्राह्मण शोभतो. निंदा, पराजय, आक्षेप, हिंसा, बंधन, क्रोधोत्पादक दोष यांना सहन करणे म्हणजे क्षमा. सहा अंगे, चार वेद, मीमांसा, विस्तृत न्यायशास्त्र, पुराण, धर्मशास्त्र इत्यादी चौदा विद्या होत. या विद्यांचे यथार्थ ज्ञान म्हणजे विज्ञान होय. अविनाशी पदाची इच्छा अध्यात्मपदात असते.

ब्राह्मणाने कधीही असत्य भाषण करू नये. कुणाचीही हिंसा करू नये. चोरी करू नये. राजा, पतित, निंदित पुरुष यांच्यापासून ब्राह्मणाने दान कधी घेऊ नये. द्विजाने देव अथवा देवस्थान यांच्या धनाची इच्छा धरू नये. देवाचे वा ब्राह्मणाचे धन विष मानावे, देवपूजेसाठी नेहमी मालकाच्या अनुज्ञेशिवाय फुले तोडू नयेत. देवद्रोह, गुरुद्रोह होऊ नये. कुत्सित विचार, क्रियालोप, वेद न म्हणणे. ब्राह्मणाचा तिरस्कार, यांनी उत्तम कुल अधोगतीस जाते.

अनृतात् पारदार्याच्च तथाभक्षस्य भक्षणात् ।
अगोत्रधर्माचरणात् क्षिप्रं नश्यति वै कुलम् ॥
(५५–१८)

असत्य भाषण, परस्त्रीसंग, अभक्ष्यभक्षण, कुलधर्माविरुद्ध आचरण केल्याने कुलाचा नाश होतो. ज्या गावात अधार्मिक राहतात, जेथे रोगराई आहे तेथे राहू नये. जेथे कृष्णसार मृग विहार करतात, जेथे उत्तम नद्या वाहतात तेथे वस्ती करावी. एका अंथरुणावर झोपणे, एका बैठकीवर बसणे, एका पंक्तीत बसणे, एका ताटात खाणे, असे संकरता वाढविणारे प्रकार जाणूनबुजून टाळावेत. अकारण वैर करू नये. कुणाची चहाडी करू नये. दुसऱ्याच्या शेतात चरणाऱ्या गायीची चौकशी करू नये. जे वर्तन स्वतःस प्रतिकूल वाटते ते दुसऱ्यासाठी करू नये. रजःस्वला स्त्री व अपवित्र पुरुष यांच्याबरोबर भाषण करू नये. आपली प्रशंसा करू नये, दुसऱ्याची निंदा करू नये. वेदनिंदा, देवनिंदा करणाऱ्यांचा त्याग करावा.

## आणि हा शिष्टाचार

काही विशेष निमित्त असल्याखेरीज सूर्य व चंद्र यांचा उदयकाल पाहू नये. नग्न स्त्री वा पुरुष यांच्याकडे बघू नये. मलमूत्राकडे पाहू नये. मैथुनरत पुरुषाकडे पाहू नये. क्रोधाने आविष्ट झालेल्या गुरूकडेही पाहू नये. तेल व पाणी यांत आपली छाया पाहू नये. पत्नीच्या बरोबर भोजन करू नये. भोजन करीत असलेली, शिंकणारी, जांभई देणारी, आपल्याच आरामात आसनावर बसलेली भार्या पाहू नये. राग-द्वेषाचा त्याग करावा. नखाने जमीन कुरतडू नये. गायीवर जबरदस्ती न करावी. नग्न होऊन पाण्यात प्रवेश करू नये. सर्प व हत्यार यांच्याशी खेळू नये. आपल्या इंद्रियांना स्पर्श करू नये. अशिष्ट माणसाबरोबर यात्रा करू नये. हात, पाय, वाणी, नेत्र, शिश्न, उदर, कान इत्यादींना चंचल करू नये. ओंजळीने पाणी कधी पिऊ नये. हाताने, पायाने पाण्यावर आघात करू नये. मांडीवर घेऊन खाऊ नये, नाचगान फार करू नये. दोनही हातांनी आपले डोके खाजवू नये. द्यूत खेळू नये. पाण्यात मलमूत्र-त्याग करू नये. दातांनी नखे वा केस काढू नयेत, झोप घेणाऱ्याला जागे करू नये. कारण नसताना थुंकू नये. देवता, ब्राह्मण, गाय, वायू, अग्नी, राजा, सूर्य, चंद्र यांच्याकडे पाय पसरून झोपू नये. देवालय अथवा स्मशान

येथील वृक्ष तोडू नये. पाण्यात थुंकू नये. माल विकीत असताना खोटी किंमत सांगू नये. पशू, पक्षी, व्याघ्र यांची लढत लावू नये.

याच धर्तीवर गृहस्थासाठी भक्ष्याभक्ष्याचाही तपशिलाने विचार पद्मपुराणाने केला आहे. वानप्रस्थ आश्रमाच्या आचाराचे विवेचनही विस्ताराने आले आहे. संन्यास आश्रम, त्याचे नियम, संन्यासी माणसाचा आचार यांची चर्चा पद्मपुराण विस्ताराने करते. पतिव्रता स्त्रीची लक्षणे आणि तिचा सदाचारही या पुराणाने विस्ताराने सांगितला आहे. वैष्णवांचा आचारधर्म कसा असावा याचेही मार्गदर्शन आहे, नट, नृत्य करणारा, वेश्या इत्यादींच्याकडील अन्नाचा त्याग करावा. चोर, दारू विकणारे, रोगी, व्यभिचारी स्त्री, सोमरस विकणारे, कृपण, पापी, भीतीने राहणारे, परित्यक्त, ब्रह्मद्वेषी, संतानहीन स्त्री, कृतघ्न इत्यादींच्याकडे भोजन करू नये. शेतकरी, कुलमित्र, गोपाल, दास, न्हावी, आत्मसमर्पण करणारा पुरुष यांच्याकडील भोजनास बाधा नाही. दूषित अन्न खाऊ नये. दुसऱ्याने वापरलेले वस्त्र त्याज्य आहे. मांस भक्षण करू नये. मदिरेला स्पर्श करू नये. ती कुणाला देऊ नये. कुणाकडून घेऊ नये. मद्यासक्त द्विज आपल्या कर्मापासून ढळतो. दानधर्माचीही सविस्तर मीमांसा पद्मपुराणाने केलेली आहे.

## पतिव्रतेचा आचारधर्म

पतिव्रता स्त्रीने आपल्या सासूसासऱ्यांविषयी विशेष भक्ती बाळगली पाहिजे. तिने सर्वस्वी पतीच्या स्वाधीन असावे. धन खर्च करताना संयम राखावा. संभोगकालात संकोच न करावा व आपले शरीर सदा पवित्र राखावे. शेतातून, रानातून, गावाहून पती जेव्हा घरी येईल तेव्हा त्याचे उठून स्वागत करावे. आसन, जल देऊन त्याचे कुशल विचारावे. त्याला रुचकर भोजन द्यावे. घर झाडून स्वच्छ करून ठेवावे. दुसऱ्या पुरुषाशी वार्तालाप, असंतोष, दुसऱ्याची चर्चा, अधिक हसणे, अधिक रोष, अधिक क्रोध यांचा पतिव्रता स्त्रीने त्याग करावा. स्वामी परदेशी असेल तर केसांना तेल लावून न्हाणे, शरीराला सुगंधी उटी लावणे, मंजन लावून दात घासणे, भोजनासाठी उत्तम पदार्थ करणे, नवीन वस्त्र

वापरणे, शृंगार करणे या गोष्टी करू नयेत. रज:स्वला असताना स्त्रीने कसे वागावे याचेही मार्गदर्शन हे पुराण करते.

स्नान केल्यानंतर स्त्रीने प्रथम सूर्याचे दर्शन घ्यावे. गर्भिणी स्त्रीचा आचारही विशेष काळजीने पद्मपुराण सांगते. मुखावर प्रसन्न वृत्ती असावी. वाईट विचार मनात येऊ देऊ नयेत. दुसऱ्याच्या घरी भोजन करू नये. मनात घृणा उत्पन्न करणारी वस्तू गर्भिणीने पाहू नये. राग, द्वेष, मत्सर यांपासून अलिप्त असावे. परक्या पुरुषाचे मुखही तिने पाहू नये. पतीने बोलावताच पत्नीने त्वरित त्याच्यापाशी जावे. पतीने उत्साहाने गीत गायला सुरुवात केली तर पत्नीने ते कौतुकाने ऐकावे. पतीच्या जवळ उद्वेग, व्यग्रता, प्रेमशून्य कलह या गोष्टी करू नयेत. जोरजोराने पत्नीने विलाप करू नये. पतीची आज्ञा घेतल्यावाचून पत्नीने उत्सवादी प्रसंगी घराबाहेर जाऊ नये.

पती परदेशी असताना पत्नीने केवळ जीवन जगण्याइतकेच उपचार करावेत. सासूच्या जवळ तिने झोपावे. पतीचा कुशल समाचार सतत चिंतावा. पती परगावी असताना पत्नीने शृंगार करू नये. सुगंधी पुष्पांच्या माळा घालू नयेत. अधिक आळस, झोप, सदा कलह, जोरात हसणे, परक्या पुरुषाचे चिंतन, मनात येईल तसे भटकणे, परपुरुषाची शरीरसेवा करणे, एकवस्त्र नेसून बाहेर जाणे, निर्लज्जतापूर्ण भाषण करणे, काही कारण नसताना दुसऱ्यांच्या घरी जाणे, यांनी युवती स्त्रीच्या हातून पाप घडते. पतीला दु:ख होते. पती घरी असेल तर शुद्ध हळदीचे उटणे तिने आपल्या अंगास लावावे. सुंदर शृंगार करावा. मुखकमल प्रसन्न राखून पतीकडे तिने जावे. संतान, नाना प्रकारचे भोग, शय्या, आसन, चांगले वस्त्र, माला, गंध, कीर्ती या सर्व गोष्टी पत्नीला पतीपासूनच प्राप्त होतात.

* *

# अनुक्रमणिका

## ४. सृष्टिरचना



## ५. सदाचारदर्शन

★

# ४ सृष्टिरचना

एतदेव महापद्ममुद्भूतं यन्मयं जगत् ।
तद्वृत्तान्ताश्रयं यस्मात् पाद्ममित्युचते ततः ॥

## सृष्टिक्रमाचा विकास

भीष्म व पुलस्त्य यांच्या संवादातून सूत महर्षींना सृष्टिक्रमाचे वर्णन करतात. तो सच्चिदानंद परमात्मा हा सृष्टिरूप मूल प्रकृतीचा ज्ञाता व या भावात्मक पदार्थांचा द्रष्टा आहे. त्यानेच या लोकांची रचना केली आहे. तोच लोकतत्त्वाचा ज्ञाता व योगवेत्ता आहे. त्यानेच लोकतत्त्वाचा आश्रय घेऊन सर्व चराचर सृष्टीची रचना केली. तोच अखिल विश्वाचा स्वामी आहे. तो नित्य, सदसत्स्वरूप, अव्यक्त, सर्वांचे कारण असून तोच ब्रह्मतत्त्व महत्तत्त्वास घेऊन विशेषपर्यंत विशाल ब्रह्मांडाची रचना करतो. सर्वांत प्रथम हिरण्यमय (तेजोमय) अंडचातून ब्रह्मदेवांचा जन्म झाला. हे अंडे सर्व बाजूंनी जलाने घेरलेले आहे. जलाच्या बाहेर तेजाचे आवरण आहे. तेजाच्या बाहेर वायूचे आवरण आहे. वायू आकाशाने व आकाश भूतादींनी घेरलेले आहे. भूतादी अथवा तामस अहंकारास महत्तत्त्वाने घेरले असून महत्तत्त्व अव्यक्त मूल प्रकृतीने घेरलेले आहे. वर सांगितलेले अंडेच सर्व लोकांचे उत्पत्तिस्थान आहे.

भगवान ब्रह्मदेव साक्षात परमात्मा आहेत. ते परेहून पर व अत्यंत श्रेष्ठ आहेत. त्यांच्यांत रूप व वर्ण यांचा अभाव आहे. ते सर्वत्र व्याप्त असले तरी त्यांनीच ब्रह्मरूपाने या विश्वाची निर्मिती केली असल्याने त्यांना ब्रह्मा असे विद्वान ओळखतात. यांनीच सर्व सृष्टीची रचना केली. सृष्टीच्या प्रारंभकाली जेव्हा जगाचे स्वामी ब्रह्मदेव

कमळावरून उठले तेव्हा त्यांनी प्रथम महत्तत्त्व प्रकट केले. या महत्तत्त्वापासून वैकारिक (सात्त्विक), तैजस (राजस), भूतादिरूप (तामस) असा तीन प्रकारचा अहंकार त्यांनी निर्माण केला. यातूनच पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये, पंचमहाभूते यांची निर्मिती झाली. पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश ही पाच भूते आहेत. भूतादी तामस अहंकाराने शब्दतन्मात्रारूप आकाशास सर्वत्र आच्छादित केले. त्यातून बलवान वायू प्रकट झाला. या वायूचा गुण स्पर्श. वायुतत्त्वात विकार येऊन रूपतन्मात्राची निर्मिती झाली. ही वायूपासून अग्नीच्या रूपात प्रकट झाली. स्पर्शतन्मात्रारूप वायूने रूपतन्मात्रारूपास सर्व बाजूंनी आवृत केले. यातून अग्नितत्त्वाने विकाररूप अशा रसतन्मात्रास उत्पन्न केले. त्यातून रसमय जलाची निर्मिती झाली. जलतत्त्वाने गंधतन्मात्राची सृष्टी केली. यातूनच ही पृथ्वी निर्माण झाली. पृथ्वीचा गुण गंध आहे. त्वचा, चक्षू, नासिका, जिव्हा, श्रोत्र हे पाच इंद्रियसमूह शब्दादी विषयांचा अनुभव करून देतात. ही पाच ज्ञानेंद्रिये होत. गुद, उपस्थ, हात, पाय व वाणी ही पाच कर्मेंद्रिये होत.

आकाश, वायू, तेज, जल, पृथ्वी हे क्रमशः शब्दादी उत्तरोत्तर गुणांनी युक्त आहेत. आकाशाचा गुण शब्द, वायूचा गुण शब्द व स्पर्श, तेजाचा गुण शब्द, स्पर्श व रूप, जलाचा गुण शब्द, स्पर्श, रूप व रस, व पृथ्वीचा गुण शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध. हे सर्व गुण एकमेकांत मिसळून सुख, दुःख, मोह यांनी युक्त होतात. यांचे मीलन झाल्याखेरीज सृष्टीची निर्मिती होऊ शकत नाही. अशाच परस्परमीलनातून ब्रह्मदेवांनी अंड्याची निर्मिती केली. याच अंड्यापासून पर्वत, द्वीप, समुद्र, ग्रह, तारे, सर्व लोक, देव, असुर, मनुष्य, सर्व प्राणी यांची निर्मिती झाली.

## ब्रह्मदेवांची सृष्टिरचना

ब्रह्मदेव सर्वज्ञ व नारायणस्वरूप आहेत. ते नित्य आहेत. त्यांच्या स्वतःच्या परिमाणाने त्यांचे आयुष्य शंभर वर्षांचे आहे. ब्रह्मदेवांचे हे आयुष्य पर या नावाने ओळखले जाते. त्याचा अर्धा भाग म्हणजे परार्ध

होय. पंधरा निमेषांची एक काष्ठा होते. तीस काष्ठांची एक कला, तीस कलांचा एक मुहूर्त, तीस मुहूर्तांचा मनुष्याची एक दिवसरात्र होते. तीस दिवसरात्रींचा एक महिना. एका मासात दोन पक्ष असतात. सहा महिन्यांचे एक अयन. दोन अयनांचे एक वर्ष. अयने दोन. एक दक्षिणायन व दुसरे उत्तरायण. दक्षिणायन देवांची रात्र आहे उत्तरायण त्यांचा दिवस आहे. देवांच्या बारा हजार वर्षांची चार युगे होतात. सत्ययुग, त्रेता, द्वापर व कलियुग या नावांनी ही युगे प्रसिद्ध आहेत. आता या युगांची वर्षे पाहा. सत्ययुग आदींचे परिमाण क्रमशः चार, तीन, दोन व एक हजार दिव्य वर्षे आहेत.*

ब्रह्मदेवांच्या एका दिवसात चौदा मनू होतात. सप्तर्षी, देव, इंद्र, मनू. मनूचे पुत्र हे एकाच वेळी निर्माण झाले. शेवटी त्यांचा संहारही बरोबरच होतो. एकाहत्तर चतुर्युगांच्यापेक्षा थोडा अधिक काल एका मन्वंतराचा असतो. या प्रकाराने दिव्यवर्षगणनेनुसार आठ लाख, बावन हजार वर्षांचे एक मन्वंतर होते. मानववर्षांची गणना केल्यास मन्वंतराचा काल तीस कोटी, सदुसष्ट लाख वीस हजार वर्षांचा होतो. यापेक्षा अधिक नाही. या काळास चौदाने गुणिले की ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो. त्यानंतर नैमित्तिक नावाचा ब्राह्मप्रलय होतो.

या ब्रह्मदेवांनी सृष्टी कशी निर्माण केली ? कल्पाचा अंत झाल्यावर रात्री झोपून जागे झाल्यावर ब्रह्मदेवांनी पाहिल्यावर त्यांना सर्व लोक सुना दिसला. पृथ्वी एकार्णवाच्या जलात बुडून गेली हे त्यांनी पाहिले. ती पाण्यात आहे. तिला बाहेर काढण्यासाठी त्यांनी थोडा वेळ विचार केला. त्यांनी यज्ञमय वराहाचे रूप घेऊन पृथ्वीला जलाच्या बाहेर काढले भगवानांना पाताळात पाहून पृथ्वीदेवी भक्तीने विनम्र झाली व त्यांची स्तुती करू लागली. ती म्हणाली,

'भगवन्, आपण सर्वभूतस्वरूप परमात्मा आहात. आपणांस वारंवार नमस्कार असो. आपण या पाताळातून माझा उद्धार करावा. पूर्वकाळात मी आपणांपासूनच निर्माण झाले. आपणांस, परमात्मन्,

* विद्वानांनी गणित केले आहे की, ४,३२,००,००,०००० (चार अब्ज बत्तीस कोटी) वर्षांचा ब्रह्मदेवांचा एक दिवस होतो.

नमस्कार असो. आपणच सर्वांच्या अंतर्यामी आहात. आपणांस प्रणाम असो. प्रधान (कारण) व व्यक्त (कार्य) ही आपलीच स्वरूपं आहेत. काळ आपण आहात. आपणांस नमस्कार असो. प्रभो, या सृष्टीच्या आदिकाली आपणच ब्रह्मा, विष्णू, रुद्र या रूपांत असूनच आपणच सर्वांची उत्पत्ती, सर्वांचे पालन, सर्वांचा संहार करता. आपण मात्र या सर्वांच्या पलीकडे आहात. मुमुक्षू पुरुष आपलीच आराधना करून मुक्त होतात व परब्रह्म परमात्म्यास प्राप्त करून घेतात. आपली आराधना केल्याशिवाय मोक्ष कुणास मिळणार ? नाथ, आपणच माझं उपादान आहात. आपणच माझा आधार. आपणच माझी निर्मिती केली. मी आपणांसच शरण आहे. यासाठीच जगातील लोक मला 'माधवी' म्हणतात.'

पृथ्वीने अशी स्तुती करताच तेव्हा त्या कांतिमान भगवान धरणीधराने घर्घरा आवाजात गर्जना केली. सामवेद याच ध्वनीतून प्रकट झाला. त्याचे नेत्र उमललेल्या कमलाप्रमाणे शोभा पावत होते. शरीराचा रंग कमलाच्या पानांप्रमाणे श्याम होता. त्या महावराह-रूपधारी भगवानांनी पृथ्वीस रसातलातून वर आणले. त्या भगवानांचे उदर जलाने भिजलेले होते. भगवंतांनी त्या पृथ्वीस महासागराच्या जलावर स्थापित केले. तेव्हा ती एका नौकेप्रमाणे शोभू लागली. त्यानंतर भगवानांनी पृथ्वीचे अनेक भाग करून सात द्वीपांना निर्माण केले. भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक या चार लोकांची निर्मिती केली.

त्यानंतर भगवानांनी देव, प्राणी यांच्या रचनेस प्रारंभ केला. महत्तत्त्वापासून त्यांनी पहिली सृष्टी निर्माण केली. तन्मात्रांची दुसरी सृष्टी. हिलाच भूतसर्ग असेही म्हणतात. सात्त्विक अहंकारापासून वैकारिक इंद्रियांची उत्पत्ती झाली. ही तिसरी सृष्टी. हिलाच ऐन्द्रिय सर्ग म्हणतात. चौथ्या सृष्टीचे नाव आहे मुख्यसर्ग. पर्वत, वृक्ष आदी स्थावर वस्तू या सर्गात येतात. पशुपक्षी, कीटक, पतंग यांची सृष्टी तिर्यक स्रोतांची असून ही पाचवी सृष्टी होय. ऊर्ध्वरेता देवांची सहावी सृष्टी. अर्वाक् स्रोतांची म्हणजे मानवसर्गाची ही सातवी सृष्टी होय.

आठवा अनुग्रहसर्ग सात्त्विक व तामसपण आहे. नववा कौमार सर्ग हा प्राकृत व वैकृतपण असतो.

सर्व प्रजा आपल्या पूर्वकृत कर्मांनी प्रभावित राहाते. प्रलयकाली संहार झाला तरी ती पूर्व-संस्कारातून मुक्त होत नाही. ब्रह्मदेवांची सृष्टी तयार होऊ लागली तेव्हा देवांपासून स्थावरापर्यंत त्यांनी चार प्रकारची प्रजा तयार केली. ब्रह्मदेवांची ही मानस प्रजा होती. त्यानंतर प्रजापतीने देव, असुर, पितर, मनुष्य, हे चार प्राणी, जलसृष्टी यांची निर्मिती केली. प्रजापतीच्या जंघेपासून दुरात्मा असुरांची उत्पत्ती झाली. त्यानंतर ब्रह्मदेवांनी आपल्या वयस्पासून इच्छेनुसार पक्षी निर्माण केले. आपल्या भुजांपासून मेंढया व मुखापासून बकऱ्या निर्माण केल्या. याच प्रकाराने आपल्या पोटापासून गायी व म्हशी, पायांपासून घोडे, हत्ती, गाढवे, नीलगायी, हरणे, उंट, खेचर व इतर पशू यांची निर्मिती त्यांनी केली. त्यांच्या रोमावलीपासून फल, मूल व विविध प्रकारचे अन्न तयार झाले. गायत्री छंद, ऋग्वेद, त्रिवृत्स्तोम, रथन्तर, अग्निष्टोम यज्ञ हे प्रजापतीने आपल्या पूर्ववर्ती मुखापासून निर्माण केले. सामवेद जगती छंद, सप्तदशस्तोम, वैरूप व अतिरात्रभाग यांची निर्मिती पश्चिम मुखापासून झाली. एकविंशस्तोम, अथर्ववेद, आप्तोर्याम, अनुष्टुप्छंद, वैराज यांची उत्पत्ती त्यांच्या उत्तरवर्ती मुखापासून झाली. मोठमोठे प्राणी प्रजापतीच्या विचित्र अंगापासून तयार झाले.

कल्पाच्या प्रारंभी प्रजापती ब्रह्मदेवांनी देव, असुर, पितर, मनुष्य यांची निर्मिती करून यक्ष, पिशाच, गंधर्व, अप्सरा, सिद्ध, किन्नर, राक्षस, सिंह, पक्षी, मृग, सर्पे यांना निर्माण केले. अशा प्रकारे नित्य व अनित्य असे हे चराचर जग आदिकर्ता ब्रह्मदेव यांनी निर्माण केले. कल्पाच्या आरंभीच त्यांनी देव, प्राण्यांची नामे, त्यांची रूपे, कर्तव्ये यांचा विस्तार केला. ऋषी व अन्य प्राणी यांची नावे वेदानुकूल अशी ब्रह्मदेवांनीच निश्चित केली.

## ब्राह्मणादी वर्ण, अन्न, प्रजापती, मनू इत्यादी

सृष्टी निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवांनी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र

या चार वर्णांना उत्पन्न केले. ब्राह्मण मुखापासून, क्षत्रिय वक्षःस्थलापासून, वैश्य मांडयांपासून व शूद्र पायांपासून निर्माण झाले. हे चार वर्ण यज्ञाचे उत्तम साधन असल्याने यज्ञाच्या अनुष्ठानासाठीच ब्रह्मदेवांनी यांची निर्मिती केली. यज्ञाने तृप्त होऊन देव जलाची वृष्टी करतात. त्याने मनुष्य तृप्त होतो. धर्ममय यज्ञ सदा कल्याणदायी असतो. या यज्ञाच्या द्वारेच मनुष्य स्वर्ग व अपवर्ग यांची प्राप्ती करून घेतो. चातुर्वर्ण्यव्यवस्थेनुसार प्रजा उत्तम श्रद्धेने श्रेष्ठ आचाराचे पालन करू लागली. इच्छेस येईल तिकडे ती जाई. तिला कसलेच बंधन नव्हते. सर्व प्रजेचे अंतःकरण शुद्ध होते. ती स्वभावतःच परम पवित्र होती. धर्मानुष्ठानाने तिचे पावित्र्य आणखी वाढले होते. प्रजेच्या पवित्र अंतःकरणात भगवान श्रीहरीचा निवास असल्यामुळे सर्वांना शुद्ध ज्ञानाची प्राप्ती होत होती. या ज्ञानाने सर्वांना श्रीहरीच्या परब्रह्म या परमपदाची प्राप्ती साक्षात्काराने होत होती.

त्यानंतर प्रजा जीविताची साधने शोधू लागली. उद्योगधंदे, शेती यांची वाढ झाली. धान्य, जव, गहू, द्विदल धान्ये, तीळ, ज्वारी, उडीद, मूग, मसूर, मटार, कुलथी, डाळ, इत्यादी ग्रामीण धान्य तयार होत राहिले. या चौदा प्रकारच्या धान्यांनी यज्ञ होत राहिले. यज्ञ व अन्न यांनी प्रजेची वृद्धी केली. प्रजापतीने प्रजेचे स्थान व गुण पाहून तिच्या धर्ममर्यादा स्पष्ट केल्या. वर्ण व आश्रम यांचे वेगवेगळे धर्म निश्चित केले. योगी लोकांना अमृतस्वरूप अशा ब्रह्मधामाची प्राप्ती होत राहिली. हेच परमपद मानले गेले. तामिस्त्र, अंधतामिस्त्र, महारौरव, रौरव, घार, असिपत्रवन, कालसूत्र, अवीचिमान इत्यादी नरक वेदनिंदक यज्ञाचा उच्छेद करणारे, आपल्या धर्माचा त्याग करणारे यांच्यासाठी तयार झाले.

प्रजापती ब्रह्मदेवांनी प्रथम आपल्या संकल्पातूनच प्रजेची, चराचर प्राणिसृष्टीची निर्मिती केली. पण पुत्र, पौत्र इत्यादी क्रमाने तिची वाढ फारशी झाली नाही. तेव्हा प्रजापतींनी आपल्यासारखेच अन्य मानसपुत्र निर्माण केले. भृगू, पुलह, क्रतू, अंगिरा, मरीची, दक्ष, अत्री, वसिष्ठ हे प्रजापतीचे मानसपुत्र होत. या आधी त्यांनी सनंदन आदी पुत्र निर्माण

केले, पण ते पुत्र निर्माण करण्याच्या कार्यात उपयुक्त झाले नाहीत. ते सर्व विज्ञानाची प्राप्ती करून घेणारे वीतरागी, मात्सर्य आदी दोषांपासून मुक्त होते. सृष्टी निर्माण करण्याच्या बाबतीत ते उदासीन पाहून ब्रह्मदेवांना राग आला. त्यांच्या भुवया उंचावल्या गेल्या. कपाळावर क्रोध उमटला, याच वेळी त्यांच्या ललाटातून सूर्यासमान एक तेजस्वी रुद्र प्रकटला. त्याचे अर्धे शरीर स्त्रीचे व अर्धे पुरुषाचे होते. तो मोठा प्रचंड व विशालकाय होता. 'तू आपल्या शरीराचे दोन भाग कर' या ब्रह्मदेवाच्या आज्ञेने रुद्राने स्त्री व पुरुष अशा रूपांत आपल्या शरीराचे दोन भाग केले. पुरुषास पुन: अकरा भागांत विभक्त केले. स्त्रीचे सुद्धा अनेक रूपांत भाग केले. स्त्री व पुरुष या दोन भागांतूनच भिन्न भिन्न रूपे प्रकट झाली. सौम्य, क्रूर, शांत, श्याम, गौर आदी नाना प्रकार प्रकट झाले.

त्यानंतर ब्रह्मदेवांनी स्वत:पासूनच स्वायंभुव मनूस प्रजापालनासाठी प्रथम मनू म्हणून निर्माण केले. स्वायंभुव मनूच्या स्त्रीचे नाव शतरूपा होते. तपस्येमुळे ती पापरहित होती. देवी शतरूपाने स्वायंभुव मनूस दोन पुत्री व दोन कन्या यांची प्राप्ती करून दिली. प्रियव्रत व उत्तानपाद हे दोन पुत्र. प्रसूती व आकूती या दोन कन्या. मनूने प्रसूतीचा विवाह दक्षाशी व आकूतीचा विवाह रुची प्रजापतीशी लावून दिला. दक्षास प्रसूतीपासून चोवीस कन्या झाल्या. श्रद्धा, लक्ष्मी, धृती, पुष्टी, तुष्टी, मेधा, क्रिया, बुद्धी, लज्जा, वपू, शांती, सिद्धी, कीर्ती या तेरा कन्यांना भगवान धर्माने पत्नी म्हणून स्वीकारले. ख्याती, सती, संभूती, स्मृती, प्रीती, क्षमा, सन्नती, अनसूया, ऊर्जा, स्वाहा, स्वधा यांना अनुक्रमे भृगू, शिव, मरीची, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, अत्री, वसिष्ठ, अग्नी, पितर यांनी पत्नी म्हणून स्वीकारले. श्रद्धेने कामास, लक्ष्मीने दर्पास, धृतीने नियमास, तुष्टीने संतोषास, पुष्टीने लोभास जन्म दिला. मेधाने श्रुतास, क्रियाने दंडास, नयास व विनयास, बुद्धीने बोधास, लज्जाने विनयास, वपूने व्यवसायास, शांतीने क्षेमास, सिद्धीने सुखास, कीर्तीने यशास जन्म दिला. हे सर्व धर्माचे पुत्र होत. काम व त्याची पत्नी नंदी यांना हर्ष नावाचा पुत्र झाला. हा धर्माचा पौत्र होय. भृगू व ख्याती यांनी लक्ष्मीस जन्म दिला. ही देवाधिदेव नारायणांची पत्नी

झाली. भगवान रुद्रानें दक्षसुता सतीस पत्नी म्हणून स्वीकारले.

अधर्माच्या पत्नीचे नाव हिंसा त्यांना अनृत नावाचा मुलगा व निकृती नावाची एक कन्या यांची प्राप्ती झाली. या दोघांनी भय व नरक नावाचे पुत्र, माया व वेदना या कन्या यांना जन्म दिला. माया भयाची व वेदना नरकाची पत्नी झाली. मायाने सर्व प्राण्यांचा संहार करणाऱ्या मृत्यू या नावाच्या मुलास जन्म दिला व वेदनास नरकापासून दुःख झाला. मृत्यूपासून व्याधी, जरा, शोक, तृष्णा, क्रोध यांचा जन्म झाला. हे सर्व अधर्म-स्वरूप असून त्यांना कोणी स्त्री नव्हती की पुत्र नव्हते. सर्वच्या सर्व नैष्ठिक ब्रह्मचारी होते. ब्रह्मदेवांचे हे रौद्र रूप संहारकाळी नित्य प्रलयास कारण होते.

## देव, दानव, गंधर्व, नाग, राक्षस, यांची उत्पत्ती

असे सांगतात की, प्रथम प्रथम संकल्प, दर्शन, स्पर्श यांनीच सृष्टी निर्माण होई. पण प्रचेत्तांचे पुत्र दक्ष प्रजापतीपासून मैथुनापासून प्रजा निर्माण होऊ लागली. देव, ऋषी, नाग यांची निर्मिती करण्यासाठी प्रयत्न झाला, पण यश आले नाही. तेव्हा दक्षाने मैथुनाच्या द्वारे आपली पत्नी वीरिणी हिच्या गर्भातून साठ कन्यांना जन्म दिला. त्यांतील त्याने दहा धर्माला, तेरा कश्यपांना, सत्तावीस चंद्राला, चार अरिष्टनेमीस, दोन भृगुपुत्रास, दोन बुद्धिमान कृशाश्वास व दोन महर्षी अंगिरास विवाह करून दिल्या. त्यांच्या वंशाचा विस्तार ऐकण्यासारखा आहे.

या सर्व देवांच्या माता ठरल्या. अरुंधती, वसू, जामी, लंबा, भानू, मरुत्वती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या व विश्वा या दहा धर्माच्या पत्नी होत. विश्वापासून विश्वेदेव झाला. साध्याने साध्य नावाच्या देवांना जन्म दिला. मरुत्वतीने मरुत्वान नावाच्या देवांची निर्मिती केली. वसूचे आठ पुत्र आठ वसू झाले. भानूपासून भानू, मुहूर्तापासून मुहूर्ताभिमानी देव उत्पन्न झाले. लंबापासून घोष, जामीपासून नागवीथी कन्यां, अरुंधती-पासून पृथ्वीवरील प्राणी यांची निर्मितो झाली. संकल्पापासून संकल्प जन्मास आला.

आता वसूची सृष्टी पाहा. जो देवगण अत्यंत प्रकाशमान, सर्व

दिशांना भरून राहिलेला तो वसू. आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास हे आठ वसू होत. शांत, वैतंड, सांब, मुनिबभ्रू हे आपाचे चार पुत्र होत, हे सर्व यज्ञाचे रक्षण करणारे अधिकारी झाले. ध्रुवाचा पुत्र काल व सोमाचा वर्चा. द्रविण व हव्यवाह हे धराचे दोन पुत्र. प्राण, रमण, शिशिर हे अनिलाचे पुत्र. अनलास अग्नीसारखे अनेक पुत्र झाले. अग्नीचा पुत्र कुमार. त्याला शाख, उपशाख, नैगमेय हे तीन पुत्र झाले. कृत्तिकांचे संतान असल्याने कुमारास कार्तिकेयही म्हणतात. प्रत्यूषाचा पुत्र देवल नावाचे ऋषी होत. प्रभासापासून प्रजापती विश्वकर्म्याचा जन्म झाला. तो मोठा शिल्पज्ञ असून घरे, महाल, उद्यान, मूर्ती, प्रासाद, तलाव, उपवने, आभूषणे, कूप इत्यादींच्या निर्मितीत कुशल होता.

अजैकपाद, अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर, बहुरूप, त्र्यंबक, सावित्र, जयन्त, पिनाकी व अपराजित हे अकरा रुद्र असून ते गणांचे स्वामी झाले. यांचे मानसपुत्र म्हणते चौऱ्यांशी कोटी पुत्र रुद्रगण होत. ते त्रिशूल धारण करून असतात. त्यांना सर्वांना अविनाशी मानले गेले आहे. कश्यपांना अदिती, दिती, दनू, अरिष्टा, सुरसा, सुरभी, विनता, ताम्रा, क्रोधवशा, इरा, कद्रू, खसा, मुनी या नावांच्या पत्नी होत्या. देवी अदितीने मरीचिनंदन कश्यपापासून बारा आदित्यांना जन्म दिला. चाक्षुष मन्वन्तरात तुषित नावाचा जो देव झाला तोच वैवस्वत मन्वन्तरात बारा आदित्यांच्या रूपांनी प्रकट झाला. इंद्र, धाता, भग, त्वष्टा, मित्र, वरुण, अर्यमा, विवस्वान, सविता, पूषा, अंशुमान, विष्णू हे बारा आदित्य सहस्रकिरणांनी शोभू लागले. दितीचे दोन पुत्र. एक हिरण्यकशिपू व दुसरा हिरण्याक्ष. हिरण्यकशिपूस प्रल्हाद, अनुल्हाद, संल्हाद व ल्हाद हे चार पुत्र झाले. आयुष्यमान, शिबी, बाष्कली, विरोचन हे प्रल्हादाचे चार पुत्र होत. विरोचनास पुत्र झाला तो प्रख्यात बळी. बळीस शंभर पुत्र झाले. त्यांत बाण ज्येष्ठ होय. या बाणास एक हजार हात असून तो सर्व प्रकारची शस्त्रे चालविण्यात कुशल होता. त्रिशूलधारी शंकर त्याच्यावर खूष होऊन त्याच्याच नगरीत राहात. बाणासुरास महाकाल ही पदवी शिवांनीच दिली.

हिरण्याक्षास उलूक, शकुनी, भूतसंतापन, महाभीम हे चार पुत्र झाले. यांनी सत्तावीस कोटी पुत्री-पुत्रांना जन्म दिला. ते सर्व बलवान, अनेक रूपधारी व अत्यंत तेजस्वी होते. दनूपासून कश्यपांना शंभर पुत्र झाले. त्यांना वरदान मिळाले. म्हणून ते अति-उन्मत्त झाले. त्यांत सर्वांत ज्येष्ठ व बलवान विप्रचित्ती होता. दनूचे स्वर्भानू, वृषपर्वा आदी पुत्र होते. स्वर्भानूपासून प्रप्रभा व पुलोमा नावाच्या दानवापासून शची नावाची कन्या झाली. मयास तीन कन्या झाल्या. उपदानवी, मंदोदरी, कुहू या त्या तीन कन्या. सुंदरी शर्मिष्ठा व चंद्रा या वृषपर्वाच्या दोन मुली. पुलोमा व कालका या वैश्वानराच्या दोन मुली. या दोनही मोठ्या शक्तिशालिनी व अधिक संतान निर्माण करणाऱ्या झाल्या. या दोघींना साठ हजार दानव झाले. पुलोमाचे पुत्र पौलोम व कालकाचे कालकेय वा कालखंज झाले. ब्रह्मदेवांच्या वरदानाने हे मनुष्यांना अवध्य झाले. हिरण्यपुरात राहाणाऱ्या या पुत्रांना अर्जुनाने पुढे मारले.

विप्रचित्तीस सिंहिकेपासून एक भयंकर पुत्र झाला. सैंहिकेय अथवा राहू या नावाने त्याची प्रसिद्धी झाली. या सिंहिकेस एकूण तेरा पुत्र झाले. कंस, शंख, नल, वातापी, इल्वल, नमुची, खसृम, अंजन, नरक, कालनाभ, कल्पवीर्य व दनुवंशविवर्धन अशी त्यांची नावे. संल्हाद दैत्याच्या वंशात निवातकवचांचा जन्म झाला. ते गंधर्व, नाग, राक्षस, सर्व प्राणी यांकडून अवध्य होते. परंतु वीरवर अर्जुनाने त्यांना संग्रामात बलपूर्वक मारले. ताम्रास कश्यपापासून शुकी, श्येनी, भास्री, सुगृध्री, गृध्रिका, शुची या सहा मुली झाल्या. शुकीने शुक व उल्लू या नावांच्या पक्ष्यांना निर्माण केले. श्येनीने श्येनास (ससाण्यास) जन्म दिला. भास्रीने कुरर (क्रौंच) नावाच्या पक्ष्यांना जन्म दिला. गृध्रीपासून गृध्र (गिधाड), सुगृध्रीपासून कबूतर यांची निर्मिती झाली. शुचीने हंस, सारस, कारंड, प्लव इत्यादी पक्ष्यांना जन्म दिला.

विनतास पक्षिश्रेष्ठ गरुड व अरुण हे दोन पुत्र व सौदामिनी नावाची एक कन्या अशी अपत्ये झाली. आकाशात चमकणारी वीज ती हीच सौदामिनी. संपाती व जटायू हे अरुणाचे दोन पुत्र. ब्रभ्रू व शीघ्रग हे संपातीचे दोन पुत्र. कर्णिकार व शतगामी हे जटायूचे दोन पुत्र. या

पक्ष्यांना असंख्य पुत्र व प्रपौत्र झाले. सुरसाच्या गर्भापासून एक हजार सर्पांची उत्पत्ती झाली. व उत्तम व्रत पाळणाऱ्या कद्रूस हजार मस्तकांचे एक सहस्र नागपुत्र झाले. त्यांतील शेष, वासुकी, कर्कोटक, शंख, ऐरावत, कंबल, धनंजय, महानील, पद्म, अश्वतर, तक्षक, एलापत्र, महापद्म, धृतराष्ट्र, बलाहक, शंखपाल, महाशंख, पुष्पदंत, सुभावन, शंखरोमा, नहुष, रमण, पाणिनी, कपिल, दुर्मुख व पतंजलिमुख हे सव्वीस प्रमुख होत. यांच्या पुत्रपौत्रांना अंत नाही. त्यांतील अधिकांश नाग पूर्वकाळी राजा जनमेजयाच्या यज्ञमंडपात जळून गेले. क्रोधवशाने आपल्याच नावाचा क्रोधवश राक्षससमूह तयार केला. त्यांना मोठमोठ्या दाढा होत्या. त्यांतील दहा लाख क्रोधवश भीमसेनाकडून मारले गेले. सुरभीने कश्यपापासून रुद्रगण, गाय, म्हैस, सुंदर स्त्रिया यांना जन्म दिला. मुनीने मुनींचे समुदाय व अप्सरा यांची निर्मिती केली. अरिष्टाने अनेक किन्नर व गंधर्व यांना जन्म दिला. इरापासून तृण, वृक्ष, लता, झाडे इत्यादींची उत्पत्ती झाली. रवसाने कोट्यवधी राक्षस व यक्ष यांना जन्म दिला. कश्यपांची ही अशी संतानपरंपरा. सर्वांत शेवटी दितीने कश्यपापासून एकूणपन्नास मरुद्‌गणांना जन्म दिला. हे सर्व धर्म जाणणारे व देवांना प्रिय होते.

## मरुद्‌गणांची उत्पत्ती, चौदा मन्वन्तरे

देवासुरसंग्रामात भगवान विष्णू व देव यांच्याद्वारे स्वतःचे पुत्र-पौत्र मरण पावले तेव्हा दितीला फारच शोक झाला. ती आर्त होऊन परमउत्तम अशा भूलोकात आली व सरस्वती नदीच्या तटावर पुष्कर नावाच्या तीर्थस्थानी राहून सूर्यदेवाची आराधना करू लागली. तिने मोठी उग्र तपश्चर्या केली. दैत्यमाता दिती नियमांचे पालन करून फलाहार घेऊन राहायची. कृच्छ्र-चांद्रायण आदी कठोर व्रतांचे पालन करून तिने तपस्या आरंभिली. जरा व शोक यांनी व्याकुळ होऊन तिने शंभर वर्षांहून अधिक काळ तप केले. तिने वसिष्ठ आदी ऋषींना विचारले,

'मुनिवर, माझा पुत्रशोक नष्ट होईल असा एखादा नियम,

एखादं व्रत आहे ?'

मुनींनी सांगितल्यावरून दितीने ज्येष्ठी पूर्णिमेचे व्रत केले. या व्रताने प्रसन्न होऊन कश्यप मोठ्या प्रसन्नतेने दितीच्या आश्रमात आले. दितीचे शरीर तपस्येनें कठोर झाले होते. कश्यपांनी तिला पुनः रूप व लावण्य यांनी संपन्न केले. त्यांनी तिला वर मागण्यास सांगितले. ती म्हणाली,

'भगवन्, इंद्राचा वध करण्यासाठी मी एका समृद्धिशाली, तेजस्वी पुत्राची इच्छा करीत आहे.'

'शुभे, इंद्राचा घात करणारा बलिष्ठ पुत्र मी तुला देईन.'

कश्यपानें दितीच्या उदरात गर्भाची स्थापना केली. कश्यप तिला म्हणाले, 'देवी, तू शंभर वर्षं याच तपोवनात राहून या गर्भाचं रक्षण कर. गर्भिणीनं संध्याकाळी भोजन करता कामा नये. वृक्षाच्या मुळांशी जाऊ नये. पाण्यात एकदम घुसू नये. रिकाम्या घरात प्रवेश करू नये. मनात कधी उद्वेग धारण करू नये. शून्य घरात बसून नखांनी भूमीवर रेखा काढू नयेत. कधी आळसात राहू नकोस. कधी अधिक परिश्रम करू नकोस. लोकांशी कलह करू नकोस. आळोखेपिळोखे देऊ नकोस. केस मोकळे सोडून तू कधी राहू नकोस. कधी अपवित्र राहू नकोस. उत्तरेस कधी डोकं करून झोपू नकोस. नग्न होऊन, उद्वेगात, हातपाय न धुता कधीच शयन करू नकोस. तोंडातून अमंगल वचन काढू नकोस. अधिक हसणं, थट्टा करू नकोस. गुरूजनांशी आदरानं वागावं. मंगलकार्यात असावंस. औषधांनी युक्त अशा जलानं स्नान करावं. वाणीनं सर्वांचा सत्कार करावा. स्वामीचं सदा प्रिय करावं. सदा प्रसन्नमुख असावं. कोणत्याही अवस्थेत कधी पतीची निंदा करू नकोस.'

कश्यपजी निघून गेले. त्यांच्या सांगण्यानुसार दितीने आपले वर्तन ठेवले. यामुळे इंद्राला भय वाटले. देवलोक सोडून तो दितीपाशी आला व तिची सेवा करून राहिला. इंद्राच्या मनात विपरीत भावना होती. तो दितीचे छिद्र शोधीत होता. बाहेरून तो प्रसन्न दिसला तरी आतून खूप भ्याला होता. जेव्हा ठरल्याप्रमाणे शंभर वर्षे पूर्ण झाली, एक दिवस उरला होता, तेव्हा दितीस मोठा हर्ष झाला. ती स्वतःला कृतार्थ मानून

विस्मयविमुग्ध झाली. एकदा ती पाय न धुताच केस मोकळे सोडून झोपली. अशा अवस्थेत शचिपती इंद्राने दितीच्या गर्भात प्रवेश केला व आपल्या वज्राने तिच्या गर्भाचे त्याने सात तुकडे केले. तेव्हा ते सात तुकडे सूर्याप्रमाणे तेजस्वी अशा सात कुमारांच्या रूपांत परिणत होऊन रडू लागले. यावेळी दानवशत्रू इंद्राने त्यांना रडण्यापासून परावृत्त केले. पुन्हा त्याने प्रत्येकाचे सात सात तुकडे केले. हे एकूणपन्नास पुत्र जोर-जोराने रडू लागले. इंद्राने त्यांना 'मा रुदध्वम्-रडू नका.' असे सांगितले. पण ब्रह्मदेवांच्या प्रभावाने ते जिवंत राहिले. पौर्णिमेच्या व्रताचे हे फल असल्यामुळे वज्राच्या प्रभावातूनही हे जिवंत राहिले. हे कुमार अवध्य असल्याचे इंद्रालाही जाणवले. ही बालके इंद्राच्या ' मा रुद ' म्हणण्या-वरून मरुत् या नावाने ओळखली जाऊ लागली. हे मरुद्गण यज्ञभागाचे अधिकारी झाले. देवांनाही प्रिय झाले.

पृथू सर्व पृथ्वीचा राजा झाला. त्यावेळी ब्रह्मदेवांनी चंद्रास अन्न, ब्राह्मण, व्रत, तपस्या यांचा अधिपती बनविले. नक्षत्र, तारे, पक्षी, वृक्ष, झाडी, लता इत्यादींचा स्वामी हिरण्यगर्भ झाला. जलाचा वरुण, धनाचा कुबेर, आदित्यांचा विष्णू, वसूंचा अग्नी अधिपती झाला. दक्ष प्रजापतींचा, इंद्र देवांचा, प्रल्हाद दैत्यांचा व दानवांचा, यमराज पितरांचा, शूलपाणी भगवान शिव पिशाच, राक्षस, पशू, भूत, दक्ष, वेताल यांचा प्रमुख झाला. हिमालय पर्वतांचा, समुद्र नद्यांचा, चित्ररथ गंधर्वांचा, विद्याध-रांचा व किन्नरांचा, वासुकी नागांचा, तक्षक सर्पांचा, गजराज ऐराव-तांचा, गरुड पक्ष्यांचा, उच्चैःश्रवा घोडयांचा, सिंह मृगांचा, सांड गायींचा, सर्व वनस्पतींचा प्लक्ष अधिपती झाला. पूर्वकालात ब्रह्मदेवांनी अशा प्रकारे सर्व अधिपतींची नियुक्ती केली.

स्वायंभुव मन्वन्तरात याम्य नावाचा एक प्रसिद्ध देव होता. मरीची आदी मुनीच सप्तर्षी मानले जात होते. आग्नीध्र, अग्निवाहू, विभू, सवन, ज्योतिष्मान, द्युतिमान, हव्य, मेधा, मेधातिथी, वसू हे दहा स्वायंभुव मनूस पुत्र झाले. त्यांनी वंशाचा विस्तार केला. यानंतर स्वारो चिष मन्वंतर आले. या स्वारोचिष मनूस नभ, नभस्य, प्रसृती व भावन हे चार पुत्र झाले. यांत भावनने खूप विस्तार केला. दत्तात्रेय, अत्री,

च्यवन, स्तंब, प्राण, कश्यप व बृहस्पती हे सात ऋषी झाले. याच वेळी तुषित नावाचा एक देव होता. हवीन्द्र, सुस्कृत, मूर्ती, आप, ज्योतिरथ हे वसिष्ठांचे पाच पुत्र स्वारोचिष मन्वन्तरात प्रजापती होते. हे झाले द्वितीय मन्वन्तराचे वर्णन. यानंतर औत्तम मन्वन्तर येते. या तिसऱ्या मनूचे नाव होते औत्तमी. ईष, ऊर्ज, तनूज, शुची, शुक्र, मधू, मानव, नभस्य, नभ, सह हे या मनूचे दहा पुत्र. यांत सह सर्वांत छोटा होता. हे सर्व उदार व यशस्वी झाले, त्यावेळी भानू नावाचा देव होता. ऊर्ज नावाचे सप्तर्षी होते. कौकिंभिड, कुतुंड, दाल्भ्य, शंख, प्रवाहित, मित, सम्मित हे सात योगवर्धन ऋषी होते.

चौथे मन्वन्तर तामस या नावानें प्रसिद्ध आहे. यात कवी, पृथू, अग्नी, अकपी, कपी, जन्य, धामा हे सात मुनी सप्तर्षी होते. साध्यगण देव होते. अकल्मष, तपोधन्वा, तपोमूल, तपोधन, तपोराशी, तपस्य, सुतपस्य, परंतप, तपोभागी, तपोयोगी हे दहा तामसाचे पुत्र होते. हे धर्म व सदाचार यांत तत्पर असून सदाचार वाढविणारे होते. वंशाचा विस्तार करणारे होते. पाचवा रैवत मन्वन्तर असून देवबाहू, सुबाहू, पर्जन्य, सोमप, मुनी, हिरण्यरोमा, सप्ताश्व हे सात या मन्वन्तराचे सप्तर्षी होत. भूतरजा व प्रकृती हे देव होते. वरुण, तत्त्वदर्शी, चितिमान, हव्यप, कवी, मुक्त, निरुत्सुक, सत्त्व, विमोह, प्रकाशक हे दहा या रैवत मनूचे पुत्र होत. धर्म, पराक्रम, बल यांत ते श्रेष्ठ होते.

यानंतर चाक्षुष मन्वन्तरात भृगू, सुधामा, विरज, विष्णू, नारद, विवस्वान, अभिमानी हे सात सप्तर्षी झाले. लेख नावाचा एक प्रसिद्ध देव होता. याशिवाय ऋभू, पृथग्भूत, वारिमूल, दिवौका या नावांचेही देव होते. चाक्षुष मनूस रुरू आदी दहा पुत्र झाले. सातवा मन्वन्तर वैवस्वत नावाचा झाला. या वेळी अत्री, वसिष्ठ, कश्यप, गौतम, योगी भरद्वाज, विश्वामित्र, जमदग्नी हे सप्तर्षी झाले. भविष्यात होणाऱ्या सावर्ण्य मन्वन्तराचे वर्णन असे आहे. अश्वत्थामा, ऋष्यशृंग, कौशिक्य, गालव, शतानंद, काश्यप, परशुराम हे सप्तर्षी होतील. धृती, वरीयान, यवस्, सुवर्ण, धृष्टी, चरिष्णू, आद्य, सुमती, वसू व पराक्रमी शुक्र हे भविष्यातील सावर्णी मनूचे पुत्र होत. याशिवाय रौच्य आदी दुसऱ्या मनूंची

नावेही यतात. प्रजापती रुचीचा पुत्र रौच्य होईल. भूतीचा पुत्र भौत्य नावाचा एक मनू होईल. त्यानंतर मेरुसावर्णी नावाच्या मनूचा अधिकार येईल. हा ब्रह्मदेवाचा पुत्र मानला गेला आहे. मेरुसावर्णीच्या नंतर क्रमशः ऋभू, वीतधामा, वि-वक्सेन या नावांचे मनू होतील. या चौदा मनूंचा अधिकार एकूण एक हजार चतुर्युगांपर्यंत राहील.

## पृथूचे चरित्र व सूर्यवंश

स्वायंभुव मनूच्या वंशात एक अंग नावाचा प्रजापती होता. त्याने मृत्युकन्या सुनीथाशी विवाह केला होता. या सुनीथाचे मुख मोठे कुरूप होते. तिला वेन नावाचा एक अधर्मी पुत्र झाला. तो नेहमी लोकांचे वाईट करी. परस्त्रीस तो त्रास देई. एकदा महर्षींनी त्याला नीट समजाविले. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. तेव्हा ऋषींनी त्याला शाप देऊन मारले. अराजकता येऊ नये म्हणून पापरहित ब्राह्मणांनी वेनाच्या शरीराचे बलपूर्वक मंथन केले. प्रथम त्याच्या शरीरातून म्लेंच्छ बाहेर पडले. त्यांचा रंग काळा होता. त्याच्या उजव्या हातापासून एक दिव्य, तेजोमय, धर्मात्मा पुरुष बाहेर पडला. तो धनुष्य, बाण, गदा, रत्नकवच यांनी शोभत होता. हाच पुरुष पृथू या नावाने प्रसिद्ध झाला. त्याच्या रूपाने साक्षात भगवान विष्णूच अवतीर्ण झाले होते. ब्राह्मणांनी त्याला राज्यावर बसविले.

राजा झाल्यावर पृथूच्या ध्यानी आले की लोकांत धर्म राहिलाच नाही. कोठे स्वाध्याय होत नव्हता, यज्ञकर्म होत नव्हते. तेव्हा त्याने क्रोधाने बाण खेचला व तो पृथ्वी विदीर्ण करायला निघाला. पृथ्वीने गायीचे रूप घेतले. ती पळत असताना पृथूने तिचा पाठलाग केला. ती एका स्थानावर उभी राहून म्हणाली,

'राजन्, मला कोणती आज्ञा देता ? मी काय करू ?'

'सुव्रते, सर्व चराचर जगास जे अभीष्ट असेल ते तू कर.'

'ठीक आहे.'

त्यानंतर पृथूने स्वायंभुव मनूस त्या गायीचे वासरू बनवून पृथ्वी-

पासून दूध प्राप्त करवून घेतले. त्यानंतर ऋषींनीही या गोरूपी पृथ्वीचे दोहन केले. त्यावेळी चंद्रमाही तिचे वत्स बनला. धार काढणारे वनस्पती, वेद दुधाचे पात्र, तपस्या हे दूध होते. देवांनीही पृथ्वीस दुहिले. मित्र देव दोग्धा झाले. इंद्र वत्स झाला. ओज व बल हे दूधरूपानें प्रकटले. देवांचे दोहनपात्र सुवर्णाचे तर पितरांचे चांदीचे होते. पितरांच्या बाजूनें अंतकानें दुहण्याचे काम केले. यमराज वत्स झाला. स्वधाच्या रूपाने दूध प्रकट झाले. धृतराष्ट्र नावाच्या नागानेही विषरूपी दुधाचे दोहन केले. असुरांनी लोखंडी पात्र घेऊन या पृथ्वीस मायारूपी दुधाने दुहिले. यावेळी प्रल्हादकुमार विरोचन वत्स झाला. त्रिमूर्धाने दोहण्याचे काम केले. यक्षांना अंतर्धान होण्याची विद्या हवी होती. त्यांनी कुबेराला वत्स केले. त्यांनी एका कच्च्या पात्रात अंतर्धान होण्याच्या विद्येचे दूध काढले. गंधर्व व अप्सरा यांनी चित्ररथास वत्स बनविले व कमळाच्या पानांत पृथ्वीपासून सुगंधाचे दोहन केले. अथर्ववेद जाणणाऱ्या सुरुचीनेही या पृथ्वीस दुहिले. आयुष्य, धन, सुख यांसाठी अनेकांनी पृथ्वीस दुहिले. पृथूच्या शासनकाळात कोणी दरिद्री नव्हता, रोगी नव्हता, निर्धन नव्हता, पापी नव्हता. कोणास कसलीच पीडा नव्हती. सर्व प्रसन्न होते. रोग नव्हता की शोक नव्हता.

महाबली पृथूने आपल्या धनुष्याच्या टोकाने मोठमोठे पर्वत हटवून पृथ्वीस समतल केले. नीट गावे वसली. सर्व लोक धार्मिक होते. राजा पृथूने ज्यांना जसे हवे होते तसे दूध प्राप्त करून दिले. ही भूमी धर्मात्मा पृथूची कन्या झाली म्हणून हिला पृथ्वी म्हणू लागले.

आता सूर्यवंश थोडक्यात पाहाण्यासारखा आहे. पूर्वकाळी कश्यप व अदिती यांना विवस्वान नावाचा एक पुत्र झाला. संज्ञा, राका व प्रभा या त्याच्या तीन पत्नी. राज्ञास रैवत नावाचा पुत्र झाला. प्रभापासून प्रभात झाला. संज्ञा विश्वकर्म्याची कन्या होती. तिने वैवस्वत मनूस जन्म दिला. काही काळानंतर संज्ञेच्या गर्भापासून यम व यमुना ही दोन जुळी संताने जन्मली. तिला विवस्वानाचे तेज सहन झाले नाही म्हणून तिनें आपल्या शरीरापासून समान रूपाची एक नारी प्रकट केली. तिचे नाव

छाया. छाया तिच्या समोर उभी राहून म्हणाली,

'देवी, मला काय आज्ञा आहे ?'

'छाया, तू माझ्या स्वामींची सेवा कर. माझ्या संतानांची पण आई हो. त्यांचं पालन नीटपणानं कर.'

'तथास्तु' म्हणून छाया भगवान सूर्यापाशी गेली. सूर्याने तिला उत्तम व्रतांचे पालन करणारी संज्ञा मानले. छायाने सूर्यापासून सावर्ण मनूस उत्पन्न केले. त्याचा वर्ण वैवस्वत मनूच्या समान असल्याने त्याला सावर्ण मनू असे नाव पडले. त्यानंतर भगवान भास्कराने छायेपासून शनैश्चर नावाचा पुत्र व तपती आणि त्रिष्टी नावांच्या दोन कन्यांची प्राप्ती करवून घेतली.

एकदा महायशस्वी यमराज वैराग्य उत्पन्न होऊन पुष्करतीर्थास आला. त्याने तेथे फल, वायू यांचा आहार घेऊन उग्र तपस्या केली. त्याने शंभर वर्षेपर्यंत तेथे ब्रह्मदेवांची आराधना केली, ब्रह्मदेवांनी त्याला प्रसन्न होऊन लोकपालाचे पद, पितृलोकाचे अक्षय राज्य, धर्माधर्म जगाची देखरेख यांची प्राप्ती करून दिली. छायेचा पुत्र शनैश्चर यानेही तपश्चर्या करून ग्रहांची समानता मिळविली. यमुना व तपती या दोन सूर्यकन्या नद्या झाल्या. विष्टीचे स्वरूप भयंकर असल्याने ती काल-रूपात स्थित झाली. वैवस्वत मनूच्या दहा महाबली पुत्रांत 'इल' हा सर्वांत ज्येष्ठ होता. इक्ष्वाकू, कुशनाभ, अरिष्ट, धृष्ट, नरिष्यंत, करूष, शर्याती, पृषध्र व नाभाग हे उरलेले नऊ पुत्र. हे सर्व दिव्य मनुष्य होते. राजा मनूने आपल्या ज्येष्ठ व धर्माच्या पुत्रास– इलास राज्यावर बसवून तो वनात तपस्येसाठी निघून गेला. त्याच्या तपाने ब्रह्मदेव संतुष्ट होऊन प्रकट झाले व म्हणाले,

'मनू, तुझं कल्याण असो तुझ्या इच्छेनुसार तू वर माग.'

'स्वामी, आपल्या कृपेनं पृथ्वीचे सर्व राजे धर्मपरायण, ऐश्वर्य-शाली व माझ्या अधीन व्हावेत.' ब्रह्मदेवांनी 'तथास्तु' म्हटल्यावर मनू आपल्या राजधानीत आला व पूर्वीप्रमाणे राज्य करू लागला. राजा इल अर्थसिद्धीसाठी बाहेर पडून भूमंडलावर भटकू लागला. त्याने सर्वत्र

भ्रमण करून सर्व राजांना आपल्या काबूत आणले. एके दिवशी हा प्रतापी इल रथात बसून भगवान शंकरांच्या एका उपवनात गेला. ते उपवन कल्पवृक्षांनी, लतांनी समृद्ध असून शरवण या नावाने प्रसिद्ध होते. तेथे देवाधिदेव चन्द्रार्धशेखर भगवान शिव पार्वतीबरोबर क्रीडा करीत होते. पूर्वी एकदा महादेवांनी उमेजवळ शरवणात प्रतिज्ञा केली होती की, जो कोणी पुरुष या वनात आपल्यासमोर येईल तो उपवनात येताच स्त्री होईल. राजा इलास ही प्रतिज्ञा माहीत नव्हती. शरवणमध्ये प्रवेश होताच त्याच्यात स्त्रीत्व दिसू लागले. तो स्त्री झाला. त्याचा घोडा घोडी बनली. राजाने सर्व अंग स्त्रीस अनुकूल असे बनून 'इलची' 'इला' झाली.

आता या वनात भटकत असताना ती मनात विचार करू लागली. 'माझे मातापिता कोण ?' एवढ्यात चंद्राच्या पुत्राने, बुधाने तिला पाहिले. सुंदरी इलाच्या रूपावर बुध लुब्ध झाला. इलाचे मनही बुधावर जडून गेले. या वेळी बुध हा ब्रह्मचारीवेषात होता. झाडांच्या मागूनतो पुढे आला व म्हणाला,

'सुंदरी, ही संध्याकाळची वेळ आहे. विहार करायची वेळ. ये आपण क्रीडा करू. सुवासिक फुलांनी सजून, नटून थटून तू ये.'

'तपोधना, मी हे सारं विसरून गेले आहे. मला सांगा पाहू, मी कोण आहे ? आपण कोण आहात ? माझे स्वामी कोण ? माझं कुल कोणतं आहे ?'

'सुंदरी, तू इला आहेस. मी तुला चाहणारा बुध आहे. मी खूप विद्या शिकलो आहे. तेजस्वी कुलात माझा जन्म झाला आहे. ब्राह्मणांचा राजा चंद्र हा माझा पिता आहे.'

बुधाचे वचन ऐकून इलाने त्याच्या घरात प्रवेश केला. ते सर्व प्रकारच्या भोगांनी संपन्न होते. वैभवाने तर इंद्रभवनासारखे वाटत होते. तेथे राहून इलाने बुधाबरोबर वनात विहार केला. इकडे इलचे बंधू इक्ष्वाकू आदी मनुकुमार आपल्या भावाचा शोध करण्यास निघाले. ते शरवणाच्या जवळ आले. त्यांनी नानाप्रकारच्या स्तोत्रांनी पार्वती व महादेव यांची स्तुती केली. तेव्हा ते प्रकट झाले व म्हणाले, 'राजकुमारांनो,

माझी तर प्रतिज्ञा होती. इल आता इला बनली आहे. पण एक उपाय सुचतो. पाहा करून. अश्वमेधयज्ञ करून त्याचं फल मला द्यावं. यामुळंहा वीरवर इल पुनः पुरुष होईल.'

शिवांच्या या सांगण्यानुसार इक्ष्वाकूने अश्वमेधयज्ञ केला. त्यामुळे इला ' किंपुरुष ' झाली. तो एक महिना पुरुष व एक महिना स्त्री बनला. बुधाच्या घरी स्त्रीरूपाने असताना तिने अनेक गुणवान पुत्रांना जन्म दिला. त्या पुत्रांना जन्म देऊन बुध स्वर्गलोकी निघून गेला. हा प्रदेश त्यानंतर इलावृनवर्ष या नावाने प्रसिद्ध झाला. ऐल चंद्राचा वंश-विस्तार करणारा झाला. अशा प्रकारे इलाकुमार पुरूरवा चंद्रवंशाची व राजा इक्ष्वाकू सूर्यवंशाची वाढ करणारे झाले. ' इला ' किंपुरुष अवस्थेत सुद्युम्न या नावाने ओळखला जाई. त्यानंतर सुद्युम्नास तीन पुत्र झाले. उत्कल, गय व हरिताश्व ही त्यांची नावे. हरिताश्व मोठा पराक्रमी होता. उत्कलाची राजधानी उत्कल झाली. हरिताश्व कुरू प्रदेशाचा स्वामी झाला व त्याने दक्षिणेसही राज्य केले. सुद्युम्नाने आपल्या पुत्रास, पुरूरवास प्रतिष्ठानपुराचे राज्य दिले.

इक्ष्वाकू हा मनूचा सर्वांत मोठा पुत्र. त्याने मध्यप्रदेशात राज्य केले. त्याच्या शंभर पुत्रांत पंधरा श्रेष्ठ होते. ते मेरूच्या उत्तरेकडे राजे झाले. त्यांच्या शिवाय एकशे चौदा पुत्रांनी मेरूच्या दक्षिणेस राज्य केले. इक्ष्वाकूच्या ज्येष्ठ पुत्रास ककुत्स्थ नावाचा पुत्र झाला. यास सुयोधन झाला. या सुयोधनाचा पुत्र पृथू व पृथूचा पुत्र विश्वावसू त्याचा पुत्र आर्द्र व आर्द्रचा युवनाश्व, याचा पुत्र महापराक्रमी शावस्त झाला. यानेच अंग देशात शावस्ती नावाची राजधानी स्थापन केली. या शावस्तास बृहदश्व व बृहदश्वास कुवलाश्व झाला. हा कुवलाश्व धुंधू नावाच्या राक्षसास मारून धुंधुमार या नावाने विख्यात झाला. त्याला दृढाश्व, दंड व कपिलाश्व हे तीन पुत्र. यांत कपिलाश्व पराक्रमी निघाला. दृढाश्वचा पुत्र प्रमोद व प्रमोदचा पुत्र हर्यश्व. हर्यश्वाचा निकुंभ व निकुंभाचा संहताश्व. यास दोन पुत्र झाले. एक अकृताश्व व दुसरा रणाश्व. रणाश्वाचा पुत्र युवनाश्व. युवनाश्वाचा पुत्र मांधाता. या मांधात्यास पुरुकुत्स, धर्मसेतू, मुचुकुंद हे तीन पुत्र झाले. यांतील मुचुकुंद

प्रतापी असून इंद्राचा मित्र होता.

पुरुकुत्साचा पुत्र संभूत असून याचा विवाह नर्मदेशी झाला होता. संभूतापासून संभूती, संभूतीपासून त्रिधन्वाचा जन्म झाला. याचा पुत्र त्रैधारुण. त्याचा पुत्र सत्यवान. त्याचा सत्यरथ, त्याचा हरिश्चंद्र, त्याचा पुत्र रोहित. रोहितास वृक व वृकास बाहू झाला. बाहूचा पुत्र परम धर्मात्मा राजा सगर झाला. या सगरास दोन स्त्रिया. एक प्रभा व दुसरी भानुमती. या दोघींनी पुत्रप्राप्तीसाठी और्व नावाच्या मुनींना प्रार्थना केली. त्यांच्या वरामुळे एकीस साठ हजार पुत्र झाले. दुसरीस एक पुत्र झाला. प्रभाने बहुपुत्र मान्य केले. भानुमतीस एकच पुत्र असमंजस झाला. यदुकुलकन्या प्रभाने साठ हजार पुत्रांना जन्म दिला. हे पुत्र अश्वाच्या शोधासाठी गेले होते तेव्हा महात्मा कपिलमुनींकडून दग्ध झाले असमंजसाचा पुत्र अंशुमान. याचा पुत्र दिलीप. या दिलीपाचा पुत्र भगीरथ. यानेच तपस्या करून स्वर्गातून गंगा पृथ्वीवर आणली. या भगीरथाचा पुत्र नाभाग. नाभागाचा अंबरीष. अंबरीषाचा सिंधुद्वीप. यास अयुतायू व ऋतुपर्ण झाले. ऋतुपर्णास कल्माषपाद व त्यास सर्वकर्मा पुत्र झाला. यास आरण्य, त्यास निघ्न व निघ्नास दोन पुत्र. एक अनुमित्र व दुसरा रघू. रघुस दिलीप. दिलीपास अज. अजास दीर्घबाहू व दीर्घबाहूस प्रजापाल झाला. प्रजापालापासून दशरथ झाला. यास भगवान नारायणस्वरूपाचे चार पुत्र झाले. रामास लव व कुश हे दोन पुत्र. कुशास अतिथी, अतिथीस निषध, निषधास नल, नलास नभा, नभास पुंडरीक व पुंडरीकास क्षेमधन्वा झाला. त्यास देवानीक पुत्र झाला. त्याचा पुत्र अहीनगू यास सहस्राश्व, यास चंद्रावलोक, यास तारापीड, यास चंद्रगिरी, यास चंद्र, यास श्रतायू झाला व तो भारतीय युद्धात मारला गेला. वीरसेनाचा एक पुत्र, निषधाचा एक पुत्र नल या नावानेच प्रसिद्ध होते इक्ष्वाकुवंशाचे हे प्रधान सूर्यवंशी राजे होत.

## चंद्राची उत्पत्ती व यदुवंशवर्णन

पूर्वकालात ब्रह्मदेवांनी अत्रींना सृष्टी निर्माण करण्याची आज्ञा दिली. तेव्हा त्यांनी निर्माणशक्ती प्राप्त करून घेण्यासाठी अनुत्तर

नावाची तपस्या केली. मन व इंद्रिये यांचा संयम करून त्यांनी परमानंदमय ब्रह्माचे चिंतन केले. एके दिवशी महर्षींच्या डोळ्यांतून पाण्याचे बिंदू ठिपकू लागले. त्यांच्या प्रकाशाने सारे जग प्रकाशित झाले. दिशांच्या अधिष्ठात्री देवांनी स्त्रीरूपात येऊन पुत्रप्राप्तीसाठी त्या जलास ग्रहण केले. त्यांच्या उदरांत ते जल गर्भरूपाने स्थित झाले. त्यांना धारण करणे दिशांना अवघड झाले. त्यांनी त्या गर्भाचा त्याग केला. ब्रह्मदेवांनी त्या गर्भास आश्रय दिला व त्यापासून एक पुरुष प्रकट केला. तो सर्व प्रकारची आयुधे धारण करणारा होता. त्या तरुण पुरुषाला त्यांनी देवशक्तिसंपन्न सहस्र नावाच्या रथावर बसवून आपल्या लोकास नेले. त्यांनी ब्रह्मर्षींना म्हटले, 'हे आपले स्वामी आहेत.' त्यानंतर ऋषी, देव, गंधर्व, अप्सरा यांनी त्याची स्तुती केली. त्यावेळी त्याचे तेज वाढले. त्या विस्तारलेल्या तेजापासून दिव्य औषधी वनस्पती उत्पन्न झाल्या.

चंद्र या वनस्पतींचा स्वामी बनला. त्याची द्विजांत गणना झाली. तो शुक्लपक्षात वाढू लागला व कृष्णपक्षात क्षीण होऊ लागला. प्रजापती दक्षाने आपल्या रूपवान व सुलक्षणी सत्तावीस कन्या चंद्रास पत्नी म्हणून अर्पण केल्या. त्यानंतर चंद्राने श्रीविष्णूंची उग्र तपस्या केली. चंद्रास भगवान प्रसन्न झाले. चंद्राने त्यांना वर मागितला, 'मी इंद्रलोकात राजसूययज्ञ करीन. आपणांसहित सर्व देव त्या यज्ञात यज्ञभाग ग्रहण करण्यासाठी यावेत. शूलधारी भगवान शंकरांनी माझ्या यज्ञाचं रक्षण करावं.' 'तथास्तु' म्हणून भगवान विष्णूंनी स्वतः यज्ञाची तयारी केली. अत्री होता, भृगू अध्वर्यू, ब्रह्मदेव उद्‌गाता झाले. यज्ञ पूर्ण झाल्यावर चंद्रास दुर्लभ असे ऐश्वर्य मिळाले. आपल्या तपस्येच्या प्रभावाने तो सात लोकांचा स्वामी झाला.

चंद्रापासून बुध झाला. बुधास इलापासून धर्मात्मा पुत्र झाला. त्याने अश्वमेधयज्ञाचे अनुष्ठान केले. तोच पुरूरवा नावाने प्रसिद्ध झाला. या पुरूरवाने हिमालयाच्या रमणीय शिखरावर ब्रह्मदेवांची आराधना केली. तो सातही द्वीपांचा स्वामी झाला. केशी इत्यादी दैत्यांनी त्याचे स्वामित्व पत्करले. ऊर्वशी नावाची एक अप्सरा त्याच्यावर मोहित

झाली व त्याची पत्नी होऊन राहिली. राजा पुरूरवाने सर्व द्वीपे, वन, पर्वत भूमंडल यावर धर्मपूर्वक राज्य केले. ऊर्वशीस आठ पुत्र झाले. आयू, दृढायू, वश्यायू, घनायू, वृत्तिमान, वसू, दिविजात व सुबाहू हे ते आठ पुत्र, बल व पराक्रम यांनी ते संपन्न होते. यांतील आयूस पाच पुत्र झाले. नहुष, वृद्धशर्मा, रजी, दंभ व विपाम्पा हे पाचही महारथी होते. रजीस शंभर पुत्र झाले. ते सर्व राजेय या नावाने प्रसिद्ध झाले. या रजीने पापसंपर्कापासून दूर होऊन भगवान नारायणांची आराधना केली. त्यांच्या वराने त्याने देव, असुर, मनुष्य यांना जिंकले.

नहुषास सात पुत्र झाले. ते सर्व धर्मात्मा होते. यती, ययाती, संयाती, उद्भव, पर, वियती व विद्यसाती अशी त्यांची नावे असून त्यांनी आपला वंश वाढविला. त्यांतील यती कुमारावस्थेतच वानप्रस्थ झाला. ययाती राज्य करू लागला. दानवराजाची कन्या शर्मिष्ठा व शुक्राचार्यांची कन्या देवयानी या त्याच्या दोन पत्नी होत. ययातीस पाच पुत्र झाले. देवयानीस यदू व तुर्वसू व शर्मिष्ठेस द्रह्यू, अनू, पुरू या नावांचे पुत्र झाले यदू व पुरू यांनी वंशाचा विस्तार केला. यदूपासून यादवांची उत्पत्ती झाली. याच कुलात पृथ्वीचा भार उतरणारे व पांडवांचे हित जपणारे श्रीकृष्ण झाले. बलराम झाले. यदूस पाच पुत्र झाले. सहस्रजित, क्रोष्टू, नील, अंजिक व रघू अशी त्यांची नावे होत.

सहस्रजिताच्या पुत्रास, शतजितास हैहय, हय व उत्तालहय हे तीन पुत्र झाले ते मोठे धर्मात्मा होते. हैहयाचा पुत्र धर्मनेत्र. याचा कुंभी, याचा संहत, याचा महिष्मान पुत्र. महिस्मानचा पुत्र भद्रसेन. हा काशीपुरीचा राजा होता. या भद्रसेनाचा पुत्र राजा दुर्दर्श. याचा पुत्र भीम व भीमाचा कनक पुत्र. या कनकाचे पुत्र कृताग्नी, कृतवीर्य, कृतधर्मा व कृतौजा. कृतवीर्याचा पुत्र अर्जुन एक हजार भुजांनी संपन्न असून पराक्रमी होता. या कार्तवीर्याने दहा हजार वर्षे राज्य केले. यानेच दत्तात्रेयांची उपासना केली. यांच्याच कृपेने त्याला एक हजार हातांची प्राप्ती झाली. आणखीही तीन वर त्याला मिळाले. राजा सहस्रार्जुनाने क्षात्रधर्मानुसार सर्व पृथ्वीस जिंकले. त्याने यज्ञात सुवर्णमय दक्षिणा दिली. त्याच्या यज्ञांत सुवर्णाचे यूप व सुवर्णाच्या वेदी असत. या महाराजा

कार्तवीर्य सहस्रार्जुनाने पंचवीस हजार वर्षांपर्यंत राज्य केले. माहिष्मती-पुरी ही त्याची राजधानी समृद्ध होती.

एकदा कार्तवीर्याने आपल्या पाच बाणांनी अभिमानी रावणास सेनेसह मूर्च्छित करून आपल्या राजधानीस आणून त्यास कैदेत ठेविले. तेव्हा पुलस्त्यांनी अर्जुनास सांगून रावणाची मुक्तता केली. कार्तवीर्याच्या हजार भुजा भृगुनंदन परशुरामाने तोडून टाकल्या. यालाही शंभर पुत्र होते. शूरसेन, शूर, धृष्ट, कृष्ण व जयध्वज हे त्याचे पाच पुत्र धर्मात्मे, शूर, महान व्रतधारी होते. जयध्वजाचा पुत्र महाबली तालजंघ. त्यालाही शंभर पुत्र झाले. या हैहयवंशी राजाची पाच कुले प्रसिद्ध झाली. वीतिहोत्र, भोज, अवंती, तुंडकेर व विक्रांत ही ती पाच कुले. हे सर्व तालजंघ या नावानेच प्रसिद्ध झाले. वीतिहोत्राचा पुत्र अनंत हा मोठा पराक्रमी होता. त्याला दुर्जय नावाचा पुत्र झाला. त्यानेही शत्रूंचा संहार केला.

## यदुवंशीय क्रोष्टूचा वंश

याच क्रोष्टूच्या कुलात वृष्णिवंशात भगवान श्रीकृष्णांचा अवतार झाला. क्रोष्टूचा महान पुत्र वृजिजीवान. त्याच्या पुत्राचे नाव स्वाती. स्वातीपासून कुशंकूचा जन्म झाला कुशंकूपासून चित्ररथ झाला, हाच शशबिंदू नावाने चक्रवर्ती राजा झाला. याला दहा हजार पुत्र झाले. हे बुद्धिमान, सुंदर, वैभवशाली व तेजस्वी होते. त्यांतही शंभर महत्त्वाचे होते. पृथुश्रवा, पृथुयशा, पृथुतेजा, पृथूद्भव, पृथुकीर्ती, पृथुमती, यांपैकी पृथुश्रवा हा श्रेष्ठ झाला. त्याला उशना नावाचा एक पुत्र झाला. याचा पुत्र शिनेयू. याचा रुक्मकवच. यानेच एकदा अश्वमेधयज्ञ केला होता. दक्षिणेच्या रूपात याने सर्व पृथ्वी ब्राह्मणांना दान दिली. यास रुक्मेष, पृथुरुक्म, ज्यामध, परिघ, हरी असे पाच पुत्र होते. परिघ व हरी यांनी विदेह देशावर राज्य केले. रुक्मेषू राजा झाला व पृथुरुक्म त्याच्या अधीन होऊन राहू लागला. त्या दोघांनी आपल्या बंधूस, ज्यामघास घरातून बाहेर काढले.

ज्यामध ऋक्षमान पर्वतावर जाऊन जंगली फलमूलांवर निर्वाह

करू लागला. त्याची पत्नी शैब्या मोठी साध्वी स्त्री होती. तिला विदर्भ नावाचा पुत्र झाला. या विदर्भास तीन पुत्र झाले. ऋथ, कैशिक व लोमपाद हे ते तीन पुत्र. राजकुमार ऋथ व कैशिक हे मोठे विद्वान व लोमपाद परम धर्मात्मा होता. यानंतर विदर्भास आणखीही पुत्र झाले. ते सर्व युद्धकर्मात कुशल होते. लोमपादाचा पुत्र बभ्रू. याचा पुत्र हेती. कैशिकास चिदी नावाचा पुत्र झाला. यापासूनच चैद्य राजांची उत्पत्ती झाली.

विदर्भाच्या ऋथ नावाच्या पुत्रास कुंती नावाचा एक पुत्र झाला. कुंतीस धृष्ट व धृष्टास पुष्ट झाला. पुष्ट मोठा प्रतापी राजा होता. त्याच्या पुत्राचे नाव निर्वृती होते. हा परम धर्मात्मा व शत्रुवीरांचा नाश करणारा होता. निर्वृतीस दाशार्ह नावाचा पुत्र होता. यालाच विदूरथ म्हणत. दाशार्हाचा पुत्र भीम व भीमाचा जीमूत पुत्र. जीमूताचा पुत्र विकल. विकलास भीमरथ झाला. भीमरथाचा पुत्र नवरथ, याचा दृढरथ, याचा पुत्र शकुनी. याचा करंभ व याचा देवरात. देवराताचा महायशस्वी पुत्र देवक्षत्र. याचा पुत्र मधू अत्यंत तेजस्वी होता. मधूचा कुरुवश. कुरुवशाचा पुत्र पुरुष. हा पुरुषांत श्रेष्ठ होता. त्याची पत्नी विदर्भकुमारी भद्रावती. त्यांना जंतू नावाचा पुत्र झाला. याचेच दुसरे नाव पुरद्वसू होते. जंतूची पत्नी वेत्रकी होती. त्यांना सत्त्वगुणसंपन्न असा सात्वत झाला. याची पत्नी कौसल्या. यांना भजिन, भजमान, दिव्य राजा देवावृध, अंधक, महाभोज, वृष्टी असे पुत्र झाले. यांतून चार वंशांचा विस्तार झाला. भजमानाची पत्नी सृञ्जय-कुमारी सृञ्जयी. यांना भाज नावाचा पुत्र झाला. भाजापासून भाजकांची निर्मिती झाली. भाजास दोन स्त्रिया. त्या दोघींनाही पुष्कळ पुत्र झाले. विनय, करुण, वृष्णी अशी त्यांची काही नावे होत. वृष्णीने शत्रूंवर विजय मिळविला.

देवावृधापासून बभ्र या नावाचा सर्वगुणसंपन्न असा पुत्र झाला. देवावृध देवांसमान व बभ्रू सर्व मनुष्यांत श्रेष्ठ झाला. देवावृध व बभ्रू यांच्या उपदेशाने शाहत्तर हजार मनुष्यांना मोक्षाची प्राप्ती झाली. बभ्रूपासून भोज झाला. हा यज्ञ, दान, तपस्या करून रूपवान व तेजस्वी झाला. शरकान्ताची कन्या मृतकावती ही भोजाची पत्नी. यांना कुकुर,

भजमान. समीक व बलर्वाहिष हे चार पुत्र झाले. कुकुरचा पुत्र धृती, धृतीचा कपोतरोमा, याचा नैमित्ती, याचा सुसुत व याचा पुत्र नरी झाला. नरी मोठा विद्वान होता. याचेच दुसरे नाव चंदनोदक दुर्दुभी होते. त्यास अभिजित व त्यास पुनर्वसू झाला. शत्रुविजयी पुनर्वसूस एक पुत्र झाला. एक कन्या झाली. पुत्राचे नाव आहुक, कन्येचे आहुकी. भोजवंशात कोणीही असत्यवादी, तेजहीन, यज्ञ न करणारा, हजाराहून कमी दान करणारा, अपवित्र व मूर्ख झाला नाही. हा भोजवंश आहुक-पर्यंत येऊन समाप्त झाला.

आहुकाने आपली वहीण आहुकीचा विवाह अवंती देशात केला. आहुकास एक कन्या होती तिचे दोन पुत्र. एक देवक व दुसरा उग्रसेन. हे दोनही देवकुमारांप्रमाणे तेजस्वी होते. देवकास चार पुत्र देवासमान झाले. ते सुंदर व वीर होते. देववान, उपदेव, सुदेव, देवरक्षक ही त्यांची नावे होत. त्यांना बहिणी सात होत्या. त्यांचा विवाह वसुदेवाशी झाला होता. देवकी, श्रुतदेवा, यशोदा, श्रुतिश्रवा, श्रीदेवा, उपदेवा व सुरूपा ही त्यांची नावे होत. उग्रसेनास नऊ पुत्र झाले. त्यांत कंस सर्वांत मोठा होता. न्यग्रोध, सुनामा, कंक, शंकू, सुभू, राष्ट्रपाल, वध्द्मुष्टी व सुमुष्टिक ही उरलेल्यांची नावे. कंसा, कंसवती, सुरभी, राष्ट्रपाली, कंडा या त्यांच्या पाच बहिणी. त्या सर्व अतिशय सुंदर होत्या, संतानां-सह हा उग्रसेनापर्यंत कुकुर वंशाचा विस्तार होय.

भोजाचा दुसरा पुत्र भजमान. त्याचा विदूरथ हा रथियांत श्रेष्ठ होता. त्याला दोन पुत्र झाले. एक राजाधिदेव व दुसरा शूर. या राजाधिदेवास दोन पुत्र. एक शोणाश्व व दुसरा श्वेतवाहन. शोणाश्वास पाच पुत्र शूर व युद्धकर्मात कुशल झाले. शमी, गदचर्मा, निमूर्त, चक्रजित व शुची ही त्यांची नावे होत. शमीचा पुत्र प्रतिक्षत्र, प्रति-क्षत्राचा भोज, भोजाचा हृदिक. हृदिकास भयानक पराक्रम दर्शविणारे दहा पुत्र झाले. त्यांत कृतवर्मा हा सर्वांत वडील होता. त्याच्यापेक्षा लहान म्हणजे शतधन्वा, देवार्ह, सुभानू, भीषण, महाबल, अजात, विजात, कारक व करंभक हे होत. देवार्हाचा पुत्र कंवलर्वाहिष. हा मोठा विद्वान पुरुष होता. समौजा व असमौजा हे त्याचे दोन पुत्र.

अजाताच्या पुत्राचेही समौजा नावाचे दोन पुत्र होते. समौजास सुदृश, सुरांश व कृष्ण हे तीन धार्मिक व पराक्रमी पुत्र झाले.

सात्वताचा कनिष्ठ पुत्र वृष्णी. याच्या वंशात अनमित्र नावाचा एक प्रसिद्ध राजा झाला. त्याला शिनी नावाचा एक पुत्र झाला. अनमित्रास युधाजित या नावाचाही एक पुत्र होता. ऋषभ व क्षत्र हे आणखी त्याचे दोन पुत्र. ऋषभाने काशिराजाची कन्या पत्नी म्हणून स्वीकारली. त्यांना जयन्त नावाचा पुत्र झाला. याची पत्नी जयंती. यांचा पुत्र अक्रूर. हा यज्ञ करणारा, धैर्यवान, शास्त्रज्ञ व अतिथिप्रेमी होता. या अक्रूराने रत्नकुमारी शैब्यावरोबर विवाह केला. त्यांना अकरा महाबली पुत्र झाले. अक्रूरास शूरसेनेपासून देववान व उपदेव असे दोन पुत्र झाले. याच प्रकारे त्याला अश्विनी नावाच्या पत्नीपासूनही काही पुत्र झाले.

विदूरथची पत्नी ऐक्ष्वाकीने मीढुष नावाच्या पुत्राला जन्म दिला. त्याच दुसरे नाव शूर असेही होते. शूराने भोजाच्या गर्भातून दहा पुत्रांना जन्म दिला. त्यांत आनकदुंदुभी नावाचा प्रसिद्ध महाबाहू वसुदेव श्रेष्ठ होता. याच्याशिवाय देवभाग, देवश्रवा, अनाधृष्टी, कुनी, नंदी, सकृद्यशा, श्याम, समीढू व शंसस्यू ही त्याच्या भावांची नावे होत. शूरास पाच कन्याही झाल्या. श्रुतिकीर्ती, पृथा, श्रुतिदेवी, श्रुतश्रवा व राजाधिदेवी अशी त्यांची नावे होत. श्रुतदेवीचा विवाह वृद्ध नावाच्या राजाशी झाला. त्यांना कारूष नावाचा एक पुत्र झाला. श्रुतिकीर्तीने केकयनरेशाच्या अंशापासून संतर्दनास जन्म दिला. श्रुतश्रवा चेदिराजाची पत्नी होती. त्यांना सुनीथ म्हणजे शिशुपाल झाला. राजाधिदेवीच्या गर्भातून धर्माची भार्या अभिमर्दिताचा जन्म झाला. शूराची मैत्री राजा कुंतिभोजाशी होती. म्हणून त्याने आपली कन्या पृथा त्याला मांडीवर दिली. अशा प्रकारे वसुदेवाची बहीण पृथा कुंतिभोजाची कन्या झाली व कुंती म्हणून वाढली. कुंतिभोजाने महाराज पांडूच्या वरोबर कुंतीचा विवाह केला. युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन हे कुंतीचे तीन पुत्र. अर्जुन इंद्रासारखा पराक्रमी होता. पांडूची दुसरी राणी माद्रवती वा माद्री हिच्यापासून नकुल व सहदेव हे दोन पुत्र झाले. हे दोघे रूपवान व

सत्त्वगुणी होते. वसुदेवाची दुसरी पत्नी पुरुवंशीय कन्या रोहिणी नावाची होती. तिचा ज्येष्ठ पुत्र बलराम. त्यानंतर तिला रणप्रेमी सारण, दुर्धर, दमन, पिंडारक इत्यादी पुत्र झाले. वसुदेवाची पत्नी देवकीच्या पोटी श्रीकृष्ण जन्मास आले. विजय, रोचमान, वर्धमान, देवल हे सर्व उप-देवीचे पुत्र. श्रुतदेवीने गवेषणास जन्म दिला,

श्रीकृष्णाच्या जन्माची व वृद्धीची कथा रोज जो ऐकतो तो सर्व पापांतून मुक्त होतो.

**कृष्णस्य जन्माभ्युदयं यः कीर्त्तयति नित्यशः ।**
**श्रुणोति वा नरो नित्यं सर्वपापैः प्रमुच्यते ।।**

पूर्वकाळी प्रजांचे स्वामी महादेव श्रीकृष्ण होऊन या वेळी मनुष्यरूपात आले. पूर्वजन्मी वसुदेव व देवकी यांनी तपस्या केली होती. म्हणून देवकीस भगवान पुत्र रूपाने लाभले. त्यावेळी त्यांचे नेत्र कमलांप्रमाणे शोभा पावत होते. त्यांना चार हात होते. त्यांचे दिव्य रूप माणसांना मोहवीत होते. श्रीवत्सचिन्ह, शंख, चक्र, गदादी आयुधे यांनी भगवानांची मूर्ती शोभत होती. तिला पाहून वसुदेव म्हणाला, 'प्रभो, आपण या रूपास आवरून घ्या. मी कंसापासून भितो आहे. म्हणून असं म्हणतो. त्यानं माझे सहा पुत्र मारले.' वसुदेवाचे बोलणे ऐकून भगवानांनी आपले दिव्य रूप आवरून घेतले. भगवानांच्या आज्ञेने वसुदेवाने नवजात बालक गोकुळात नंदाच्या घरी नेले व नंदाच्या स्वाधीन करून म्हटले, 'आपण या बालकाचं रक्षण करावं. याच्या हातून कंसाचा वध होणार आहे. सर्व यादवांचं हा कल्याण करील. पृथ्वीवरील सर्व दुष्ट राजांचा हा संहार करील. हाच अर्जुनाचं सारथ्य करील. सर्व यदुवंशास हा देव-लोकात नेईल.'

यदुवंशीयांची सर्व हकीगत पुलस्त्य सांगत असताना भीष्मांनी विचारले, 'ब्रह्मन्, हा वसुदेव कोण ? देवकीदेवी कोण ? हे नंदगोप कोण ? त्याची पतिव्रता यशोदा कोण ?'

पुलस्त्यांनी या सर्व प्रश्नांची उत्तरे दिली. पुरुष वसुदेव कश्यप असून त्याची पत्नी देवकी अदिती आहे. कश्यप ब्रह्मदेवांचा अंश व अदिती पृथ्वीचा. याच प्रकाराने द्रोण नावाचा वसू नंदगोप नावाने

विख्यात झाला. त्याची पत्नी यशोदा धरा आहे. देवी देवकीने पूर्वजन्मात अजन्मा परमेश्वरास प्रार्थना केली होती, तीनुसार महाबाहू श्रीकृष्णांनी ती पूर्ण केली. यज्ञानुष्ठान बंद झाले होते. धर्माचा उच्छेद होत होता. अशा अवस्थेत धर्माची स्थापना व असुरांचा संहार करण्यासाठी भगवान श्रीविष्णू वृष्णिकुलात प्रकट झाले. रुक्मिणी, सत्यभामा, नग्नजिताची पुत्री सत्या, सुमित्रा, शैब्या, गांधारराजकुमारी लक्ष्मणा, सुभीमा, मद्रराजकुमारी कौसल्या, विरजा आदी सोळा हजार स्त्रिया श्रीकृष्णांच्या पत्नी होत्या.

रुक्मिणीस दहा पुत्र झाले. हे सर्व युद्धकर्मात कुशल असून त्यांची नावे प्रद्युम्न, रणशूर, चारुदेष्ण, सुचारू, चारुभद्र, सदश्व, ह्रस्व, चारुगुप्त, चारुभद्र, चारुक, चारुहास, अशी होती. यांत प्रद्युम्न सर्वांत मोठा व चारुहास सर्वांत लहान होता. रुक्मिणीच्या एका कन्येचे नाव चारुमती होते. सत्यभामास भानू, भीमरथ, क्षण, रोहित, दीप्तिमान, ताम्रबंध व जलंधम हे सात पुत्र झाले. या सातांना एक छोटी बहीणही होती. जांबवतीचा पुत्र सांब मोठा सुंदर होता. तो सौरशास्त्राचा प्रणेता आणि मूर्ती व मंदिरे यांचा निर्माता होता. मित्रविंदाने सुमित्र, चारुमित्र, मित्रविंद यांना जन्म दिला. सत्याचे पुत्र मित्रबाहू, सुनीथ आदी. या प्रकाराने श्रीकृष्णास हजारो पुत्र झाले.

प्रद्युम्नास विदर्भकुमारी रुक्मवतीपासून अनिरुद्ध नावाचा एक परमबुद्धिमान पुत्र झाला. अनिरुद्ध संग्रामात उत्साहपूर्वक लढणारा होता. अनिरुद्धास मृगकेतन झाला. राजा सुपार्श्वाची पुत्री काम्या. तिने सांबापासून तरस्वी नावाचा पुत्र प्राप्त करून घेतला. प्रमुख वीर व महात्मा यादवांची संख्या तीन कोटी साठ लाख अंदाजे होती! ते सर्व पराक्रमी व महाबली होते. त्यांची सर्वांची उत्पत्ती देवांच्या अंशापासून झाली. महाबली असुरांचा संहार करण्यासाठीच भगवान यदुकुलात अवतीर्ण झाले. महात्मा यादवांचीच शंभर कुले होती. भगवान श्रीकृष्ण त्या सर्वांचे नेते होते. सर्व यादवही भगवानांच्या आज्ञेत राहून ऋद्धिसिद्धींनी संपन्न झाले होते.

## भारतवर्षाचे वर्णन व पुष्करतीर्थ

महर्षींसाठी सूताने भारतवर्षाचे वर्णन संक्षेपाने केले. राजा प्रियमित्र, देव, वैवस्वत, मनू, पृथू, इक्ष्वाकू, ययाती, अंबरीष, मांधाता, नहुष, मुचुकुंद, कुबेर, उशीनर, ऋषभ, पुरूरवा, राजा नृग, राजर्षी कुशिक, गाधी, सोम, राजर्षी दिलीप, आदी अनेक बलिष्ठ राजांनी व सर्व भूतांनी हा भारतवर्ष समृद्ध केला आहे. या देशात महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्षवान, विंध्य, पारियात्र हे सात कुलपर्वत आहेत. यांच्या आसपासही हजारो पर्वत आहेत. गंगा, सिंधू, सरस्वती, गोदावरी, नर्मदा, बाहुदा, शतद्रू, चंद्रभागा, यमुना, दृषद्वती, विपाशा, वेत्रवती, कृष्णा, वेणी, इरावती, वितस्ता, पयोष्णी, देविका, वेदस्मृती, वेदशिरा, त्रिदिवा, सिंधुलाकृमी, करीषिणी, चित्रवहा, त्रिसेना, गोमती, चंदना, कौशिकी, हृद्या, नाचिता, रोहितारणी, रहस्या, शतकुंभा, सरयू, चर्मण्वती, हस्तिसोमा, दिशा, शरावती, भीमरथी, कावेरी, बालुका, तापी, नीवारा, महिता, सुप्रयोगा, पवित्रा, कृष्णला, वाजिनी, पुरुमालिनी, पूर्वाभिरामा, वीरा, मालावती, पापहारिणी, पलाशिनी, महेन्द्रा, पाटलावती, असिक्नी, कुशवीरा, मरुत्वा, प्रवरा, मेना, होरा, घृतवती, अनाकती, अनुष्णी, सेव्या, कापी, सदावीरा, अधृष्या, कुशचीरा, रथचित्रा, ज्योतिरथा, विश्वामित्रा, कपिंजला, उपेन्द्रा, बहुला, कुवीरा, वैनन्दी, पिंजला, वेणा, तुंगवेगा, महानदी, विदिशा, कृष्णवेगा, ताम्रा, कपिला, धेनू, सकामा, वेदस्वा, हविःस्रावा, महापथा, क्षिप्रा, पिच्छला, भारद्वाजी, कौणिकी, शोणा, चंद्रमा, अंतःशिला, ब्रह्ममेध्या, परोक्षा, रोही, जंबूनदी, सुनासा, तपसा, दासी, सामान्या, वरुणा, असी, नीला, धृतिकरी, पर्णाशा, मानवी, वृषभा, भाषा अशा अनेक लहानमोठ्या नद्यांचे जल भारतवर्षीय लोक पीत असतात.

भारतवर्षात अनेक जनपदे आहेत. कुरू, पांचाल, शाल्व, मात्रेय, जांगल, शूरसेन (मथुरेच्या आसपासचा भाग), पुलिंद, बौध, माल, सौगंध, चेदी, मत्स्य, (जयपूरच्या आसपासचा भूखंड), कुरूष, भोज, सिंधू, उत्तम, दशार्ण, मेकल, उत्कल, कोशल, नैकपृष्ठ, युगंधर, मद्र,

कलिंग, काशी, अपरकाशी, जठर, कुकुर, कुंती, अवंती, अपरकुंती, गोमंत, मल्लक, पुंड्र, नृपवाहिक, अश्मक, उत्तर, गोपराष्ट्र, अधिराज्य, कुशट्ट, मल्लराष्ट्र, मालव, उपवास्य, वक्रा, वक्रातप, मागध, सद्म, मलज, विदेह, विजय, अंग, वंग, यकृल्लोमा, मल्ल, सुदेष्ण, प्रल्हाद, महिष, शशक, बाल्हिक, वाटधान, आभीर, कालतोयक, अपरांत, परांत, पंकल, चर्मचंडक, अटवीशेखर, मेरुभूत, उपावृत्त, अनुपावृत्त, सुराष्ट्र, केकय, कुट्ट, माहेय, कक्ष, सामुद्र, निष्कुट, अंध, बहू, अंतर्गिरी,बहिर्गिरी, मलद, सत्वतर, प्रावृषेय, भार्ग, भार्गव, भासुर, शक, निषाद, निषध, आनर्त्त, नैर्ऋत, पूर्णल, पूतिमत्स्य, कुंतक, कुशक, तीरग्रह, ईजिक, कल्पकारण, निलभाग, मसार, मधुमत्त, ककुंदक, काश्मीर, सिंधुसौवीर गांधार, दर्शक, अभीसार, कुद्रुत, सौरिल, दर्वी, दर्वावात, जामरथ, उरग, बलरट्ट, सुदामा, सुमल्लिक, बंध, करीकष, कुलिंद, गांधिक, वानायू, दश, पार्श्वरोमा, कुशबिंदू, कच्छ, गोपालकच्छ, कुरुवर्ण, किरात, बर्बर, सिद्ध, ताम्रलिप्तिक, औड्रम्लेच्छ, सैरिंद्र, पर्वतीय ही सर्व उत्तर भारताची जनपदे होत.

आता दक्षिण भारताची जनपदांचे वर्णन पाहा. द्रविड, केरल, प्राच्य, मूषिक, वालमूषिक, कर्णाटक, माहिषक, किष्किंध, झल्लिक, कुंतल, सौहृद, नलकानन, कोकुट्टक, चोल, कोण, मणिवालव, सभंग, कनंक, कुकुर, अंगार, मारिष, ध्वजिनी, उत्सव, संकेत, त्रिगर्भ, माल्यसेनी, व्यूढक, कोरक, प्रोष्ठ, संगवेगधर, विंद्य, रुलिक, बल्वल, मलर, अपरवर्तक, कालद, चंडक, कुरट, मुशल, तनवाल, सतीर्थ, पूती, सृंजय, अनिदाय, शिवाट, तपान, सूतप, ऋषिक, विदर्भ, तंगण, परतंगण; इत्यादी जनपदे दक्षिण भारतात आहेत. म्लेच्छांची जनपदेही सांगता येतात. यवन, कांबोज, कृघृह, पुलटय, हूण, पारसिक, दशमानिक इत्यादींचा निर्देश करता येण्यासारखा आहे. क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांनाही स्थाने होती. शूरवीर आभीर, दरद, काश्मीर, खांडीक, तुषार, पद्माव, गिरिगव्हर, आत्रेय, भारद्वाज, स्तनपोषक, द्रोषक, कलिंग, अशा काही किरातांच्या जाती आहेत. तोमर, हन्यमान, करभंजक अशीही काही जनपदे आहेत.

वसिष्ठ व दिलीप यांच्यांतील संवादांतून या तीर्थमय भारत-वर्षांची माहिती चांगली आली आहे. वसिष्ठम्हणाले,

'तीर्थ ऋषींचा परम आश्रय आहे. जो सत्यवादी आहे, दृढ-प्रतिज्ञ आहे, सर्व भूतांविषयी ज्याचा समभाव आहे त्यालाच तीर्थाचं फल प्राप्त होतं. दरिद्री मनुष्यासही उत्तम यज्ञाचं, व्रताचं फल देणारं व्रत म्हणजे पुष्करची यात्रा होय. पुष्करास गेल्यानं मनुष्य देवरूप होतो. दिव्य शक्तिसंपन्न देव, दैत्य, ब्रह्मर्षिगण यांनी इथं तपस्या केली आहे. या तीर्थात पितामह ब्रह्मदेव सदा प्रसन्नतापूर्वक निवास करून आहेत. या पुष्करात येऊनच देव व ऋषी महान पुण्यवान बनून परमसिद्धीस जातात. इथं स्नान केल्यानं, पितरांचं पूजन केल्यानं, अश्वमेधाच्या दश-पटीनं पुण्य मिळतं. पुष्कराचं चिंतन प्रातःकाली व सायंकाली केल्यास सर्व तीर्थांत स्नान केल्याचं पुण्य मिळतं. तिथं गेल्यानं जन्मभराची पापं नष्ट होतात. पुष्कर सर्व तीर्थांचे आदितीर्थ आहे. पुष्करात नियम व पवित्रतापूर्वक बारा वर्षं निवास केला तर मनुष्यास संपूर्ण यज्ञांचं फल मिळतं. तो अंतकाळी ब्राह्मलोकास जातो.'

* *

# ५ सदाचारदर्शन

## श्राद्धाची विविध अंगे

इतर पुराणांप्रमाणेच पद्मपुराणाचा भर सदाचारावर विशेष प्रकारचा आहे. पितरांचा श्राद्धविधी, त्याचे प्रकार, अन्नदानासारखी पुण्यकृत्ये, विविध प्रकारची व्रते, उत्सव, वर्ण आणि आश्रम यांनुसार अत्यावश्यक आचार, रोजचा पूजापाठ, प्रार्थना, स्तुती, विविध पुण्यमय कर्मे व त्यांनुसार फलप्राप्ती, विविध प्रकारची मासमाहात्म्ये व मासां नुसार पुण्यकर्मे, विविध एकादशींचा माहिमा, भगवंताचा महिमा श्रवण-करणे, गीतेच्या प्रत्येक अध्यायाचे माहात्म्य श्रवण करणे, एकंदर वर्त-नाचा आदर्श घालून देणे, इत्यादीवर पद्मपुराणाने भर दिला आहे. स्वर्ग-नरकातील सुख-दुःखे वर्णन करूनही आचाराचा, सदाचाराचा

निर्देश या पुराणात केला आहे.

स्वर्गात पितरांचे सात गण असतात. तीन मूर्तिरहित व चार मूर्तिमान असून ते सर्व तेजस्वी आहेत. जे मूर्तिरहित पितृगण आहेत ते वैराज प्रजापतीची संताने असून त्यांची प्रसिद्धी वैराज नावानेच आहे. देवगण त्यांच्यासाठी यजन करतात. सोमपथ नावाच्या प्रसिद्ध लोकात कश्यपाचे पितृगण निवास करतात. देव नेहमीच त्यांचा सन्मान करतात. अग्निष्वात्त नावाचे प्रसिद्ध यज्वा पितृगण त्याच लोकात निवास करतात. स्वर्गात विभ्राज नावाचा आणखी एक तेजस्वी लोक असून त्यात बर्हिषद्संज्ञेचे पितृगण निवास करतात. तेथे मोरांना जोडलेली अनेक विमाने असून संकल्पवृक्षही अनेंक असतात. या लोकातील आपल्या पितरांसाठी जे श्राद्ध करतात ते विभ्राज नावाच्या लोकात जाऊन समृद्धशाली भवनांत आनंद भोगतात. तेथेच पुलत्स्यांचे शेकडो पुत्र तपस्या, योगबल यांत संपन्न असून सौभाग्यशाली व भक्तांना अभय देणारे आहेत.

मार्तंडमंडल नावाच्या लोकात मरीचिगर्भ नावाचे पितृगण राहतात. ते अंगिरामुनींचे पुत्र असून ते हविष्मान नावाने विख्यात आहेत. ते राजीचे पितर असून स्वर्ग, मोक्ष देणारे आहेत. तीर्थांत स्नान करणारे क्षत्रिय या लोकात जातात. कामदुध नावाच्या लोकात इच्छेनुसार भोग मिळतो. यात सुस्वध नावाचे पितर राहत असून त्यांची आज्यप या नावाने प्रसिद्धी आहे. ते प्रजापती कर्दमाचे पुत्र होत. पुलहच्या थोरल्या भावापासून निर्माण झालेले वैश्य या पितरांची पूजा करतात. श्राद्ध करणारे पुरुष या लोकात जाऊन हजारो जन्मांचे परिचित असे माता, बंधू, पिता, सासवा, मित्र, संबंधी हे सर्व बरोबरच राहतात. यानंतर चौथा गण ब्रह्मलोकाच्यावर सुमाजस नावाचा असून सोमप नावाचे सनातन पितर तेथे राहतात. ते सर्व ब्रह्मदेवांपेक्षाही मोठे असून धर्ममय स्वरूप धारण करणारे आहेत. स्वधापासून त्यांची निर्मिती झाली. ते योगी असून ब्रह्मभावात स्थिर होऊन मानससरोवरात राहतात. या पितरांची कन्या नर्मदा नदी आहे. या सोमप पितरांपासून सर्व प्रजासृष्टीचा विस्तार झाला असल्याने मनुष्याने नेहमी धर्मभावनेने

त्यांचे श्राद्ध करावे.

पितरांचे श्राद्ध कसे करावे ? श्राद्धाच्या वेळी चांदीच्या पात्रांचा उपयोग व्हावा. 'स्वधा' शब्दाच्या उच्चाराने पितरांसाठी श्राद्धदान करावे. विद्वान पुरुषाने अग्निहोत्री वा सोमपात्री ब्राह्मणांच्या द्वारेच अग्नीत हवन करावे. अग्नीच्या अभावी ब्राह्मणाच्या हातात, जलात, शिव-स्थानानजिक पितरांना दान करावे. हीच पितरांसाठी निर्मल स्थाने आहेत. पितृकार्यात दक्षिण दिशा उत्तम मानली गेली आहे. यज्ञोपवीतास अप-सव्य म्हणजे उजव्या खांद्यावर करून केलेले तर्पण वा तिलदान व 'स्वधा' शब्द उच्चारून केलेले श्राद्ध पितरांना नेहमीच तृप्ती देते. कुश, उडीद, तांदूळ, गायीचे दूध, मध, गायीचे तूप, जव, मूग, शुभ्र फुले, या सर्व वस्तू पितरांना प्रिय असतात. मसूर, मटार, राजमाष, कमळ, बिल्व, धोतरा, बकरीचे दूध इत्यादी पदार्थ श्राद्धात निषिद्ध आहेत. भक्तिभावाने पितरांना तृप्त करणाऱ्यास ते तृप्ती देतात. पुष्टी, आरोग्य, संतान, स्वर्ग यांना देऊन ते संतुष्ट करतात. पितृकार्य देवकार्यापेक्षाही मोठे सांगितले गेले आहे. देवांना तृप्त करण्याआधी पितरांना तृप्त करावे. पितृगण शीघ्र प्रसन्न होणारे आहेत. ते सदा प्रिय बोलतात. भक्तांचे प्रेम राखतात. त्यांना सुख देतात. पितर पर्वांचे देव असल्याने प्रत्येक पर्वास पितरांचे पूजन करावे. हविष्मान पितरांचा अधिपती सूर्यदेव ही एक श्राद्धाची देवता मानली गेली आहे.

अन्न व जल, दूध वा फलमूल देऊन पितरांना संतुष्ट करावे. श्राद्ध तीन प्रकारचे असते. एक नित्य, दुसरे नैमित्तिक, तिसरे काम्य. पहिल्या नित्य श्राद्धात अर्घ्य, आवाहन या क्रिया नसतात. हे अदैव असल्याने यात विश्वेदेवांना भाग दिला जात नाही. पर्वाच्या दिवशी जे श्राद्ध केले जाते त्यास पार्वण म्हणतात. या पार्वण श्राद्धासाठी पंचाग्नीचे सेवन करणारा स्नातक, त्रिसौपर्ण ( 'ब्रह्ममेतु माम्' ) इत्यादी तीन अनुवाकांचे नियमपूर्वक अध्ययन करणारा, वेदाची व्याकरण आदी सहा अंगे जाणणारा. श्रोत्रिय, श्रोत्रियाचा पुत्र, वेदांच्या विधिवाक्यांचा विशेषज्ञ सर्वज्ञ, वेदांचा स्वाध्यायी, मंत्र जपणारा, ज्ञानवान, त्रिणा-

चिकित (द्वितीय कठाच्या 'अयं वाव यःपवनें' इत्यादी तीन अनुवाकांचा स्वाध्याय करणारा), त्रिमधु ('मधु वाता ऋतायते' इत्यादी तीन ऋचांचा पाठ करणारा), अन्य शास्त्रे जाणणारा, पुराणांचा विद्वान, स्वाध्यायशील, ब्राह्मणभक्त, पित्याची सेवा करणारा, सूर्यदेवाचा भक्त, वैष्णव, ब्रह्मवेत्ता, योगशास्त्राचा ज्ञाता, शांत, आत्मज्ञ, अत्यंत शीलवान, शिवभक्तिपरायण, असाच ब्राह्मण निमंत्रित करावा. या ब्राह्मणाने श्राद्धप्रसंगी भोजन करावे. पतित, पतिताचा पुत्र, नपुंसक, चुगलखोर, रोगी अशा ब्राह्मणास श्राद्धप्रसंगी आमंत्रण देऊ नये. निमंत्रित केलेल्या ब्राह्मणाच्या शरीरात पितरांचा आवेश होत असतो. ते वायूरूपानें त्याच्यात प्रवेश करतात.

दक्षिण दिशेस गोमयाने सारवलेल्या स्थानावर श्राद्ध करावे. आहिताग्नी पुरुषाने पितरांसाठी चरू (खीर) बनवावा. पितरांचा उच्चार करून त्यांना दक्षिण दिशेस ठेवावे. त्यात तूप, मध आदी मिसळून आपल्या समोर तीन निर्वापस्थान (पिंडदानाच्या वेदी) तयार करावीत. खैराच्या तीन दर्वी कराव्यात. जलपात्र, कास्यपात्र, प्रोक्षण, समिधा, कुश, तिलपात्र, उत्तम वस्त्र, गंध, धूप, चंदन इत्यादी सर्व वस्तू दक्षिण दिशेस ठेवाव्यात. यावेळी जानवे उजव्या खांद्यावर असावे. असे सर्व सामान एकत्र झाले की, गोमयाने सारवलेल्या जमिनीवर गोमूत्राने एक मंडल तयार करावे. अक्षत व फुले घेऊन ब्राह्मणाचे पाय धुऊन त्यांना वारंवार वंदन करावे. विधिपूर्वक आचमन करून त्यास दर्भांच्या आसनावर बसवावे. देवकार्यांत (वैश्वदेव श्राद्धात) दोन व पितृकार्यांत तीन ब्राह्मणांना भोजन द्यावे. प्रथम विश्वेदेवसंबंधी व नंतर पितृसंबंधी ब्राह्मणांची अर्घ्य आदीने विधिवत पूजा करून त्यांच्या आज्ञेने अग्नीत यथाविधी हवन करावे. गृह्यसूत्रात सांगितल्याप्रमाणे घृतयुक्त चरूचे अग्नी व स्तोम यांच्या तृप्तीसाठी हवन करावे. अशा प्रकारे देवांची तृप्ती करून तो यज्ञकर्ता श्रेष्ठ ब्राह्मण साक्षात अग्नीचे रूप मानला जातो. देवांसाठी करावयाचे हवन जानवे डाव्या खांद्यावर ठेवून करावे. पितरांच्या विधीच्या वेळी ते उजव्या खांद्यावर असावे.

हवन व विश्वेदेवास अर्पण करून उरलेल्या अन्नाचे अनेक पिंड

तयार करून एक एक पिंड उजव्या हातात घेऊन तिळ व जल यांच्या-बरोबर दान करावा. श्राद्धकाळात मन व इंद्रिये यांच्यावर ताबा ठेवून मात्सर्यांचा त्याग करावा. पिंड देण्यासाठी तयार केलेल्या वेदीवर रेखा करून त्यांवर अवनेजनपात्रात पाणी घेऊन स्थानशोधनक्रिया करावी. दक्षिणाभिमुख होऊन वेदीवर कुश पसरावेत, व एक एक करून सर्व पिंड क्रमश: त्या कुशांवर ठेवावेत. त्यावेळी पिता, पितामह यांच्या नामांचा, गोत्राचा उच्चार संकल्पपूर्वक करावा. पिंडदानानंतर आपला उजवा हात पिंडाधारभूत कुशांवर धरावा. हा पितरांचा लेपभागभोजी असल्याने त्यावेळी 'लेपभागभुजः पितरस्तृप्यंन्तु' इत्यादी वाक्यांचा उच्चार करावा. यानंतर पुन्हा प्रत्यवनेजन करून, अवनेजनपात्रात जल घेऊन त्याने प्रत्येक पिंडास स्नान घालावे. जलयुक्त पिंडास नमस्कार करून श्राद्धकल्पोक्त वेदमंत्रद्वारे पिंडांवर पितरांसाठी आवाहन करावे. व चंदन, धूप, पूजासामग्री यांनी त्यांची पूजा करावी.

त्यानंतर पितरांच्या उद्देशाने आवाहनीय ब्राह्मणांना जलाबरोबर एक एक दर्वी (खैराची पळी) प्रदान करावी. पिंडांच्यावर कुश राखून पितरांचे विसर्जन करावे. त्यानंतर क्रमश: सर्व पिंडांतून थोडा थोडा भाग घेऊन त्या सर्वांना एकत्र करावे. व ब्राह्मणांना प्रथम ते वाढावेत. कारण त्या पिंडांचे अंश फक्त ब्राह्मणच घेतात. यासाठीच अमावास्येच्या दिवशी केलेल्या पार्वण श्राद्धास 'अन्वाहार्य' म्हणतात. प्रथम आपल्या हातात पवित्रीसहित तिळ व जल घेऊन पिंडांच्या पुढे सोडून 'एषां स्वधा अस्तु' हे पिंड स्वधारूप व्हावेत. असे म्हणावे. त्यानंतर पवित्र व उत्तम अन्न वाढून ब्राह्मणांना भोजन द्यावे. त्यावेळी भगवान श्री-नारायणांचे स्मरण करावे. क्रोधाचा त्याग करावा, ब्राह्मण तृप्त झाल्या-वर विकिरान्नाचे दान करावे, या विकिरान्नदानाचाही एक विधी आहे. तिलसहित अन्न व जल घेऊन त्याला कुशांवर पृथ्वीवर ठेवावे. ब्राह्मणाने आचमन केल्यावर पुन्हा पिंडावर जल शिंपावे. फूल, अक्षत आदी वाहून पिंड वर उचलावा. प्रथम देवश्राद्धाची समाप्ती करावी, नंतर पित-रांच्या श्राद्धाची समाप्ती करावी. त्यानंतर नतमस्तक होऊन ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी.

आहिताग्नी पुरुषांसाठीं हे अन्वाहार्य पार्वण श्राद्ध सांगितले आहे. अमावास्येस हे श्राद्ध केले जाते म्हणून यास पार्वण श्राद्ध म्हणतात. हेच नैमित्तिक श्राद्ध होय. श्राद्धाचा पिंड गाय अथवा बकरीस खायला द्यावा. ब्राह्मणास द्यावा अथवा जलाच्या धारेत सोडून द्यावा. शेतात विखरून टाकला तरी चालेल. संतानांची इच्छा करणाऱ्या स्त्रीने त्याचे सेवन केले तरी चालेल. त्यावेळी मात्र 'आधत्त पितरोगर्भम्' इत्यादी मंत्राचे उच्चारण करायला हवे. पिंडांच्या विसर्जनानंतर श्राद्धकर्म समाप्त होते. त्यानंतर बलिवैश्वदेव करणे अगत्याचे आहे. त्यानंतर आपल्या बंधु-बांधवांसह पितरांचा प्रसाद म्हणून भोजन करावे. श्राद्ध करणारा व त्याचे भोजन घेणारा यांनी एके दिवशी दुसऱ्यांदा जेवता कामा नये. प्रवास करू नये. मैथुन करू नये. स्वाध्याय, कलह, दिवसा झोप यांचा या दिवशी त्याग करावा. अशा विधीने केलेले श्राद्ध धर्म, अर्थ, काम यांची प्राप्ती करून देणारे असते. कन्या, कुंभ, वृषभ राशीत सूर्य असताना कृष्ण पक्षात श्राद्ध करावे.

सर्वसाधारण स्वरूपाचे श्राद्धही भोग व मोक्षरूप फल देणारे असते. उत्तरायण व दक्षिणायनाचे प्रारंभ दिवस, विषुव नावाचा योग, प्रत्येक अमावास्या, प्रतिसंक्रान्त, पौष, माघ, फाल्गुन, आश्विन मासांची कृष्ण-पक्षातील अष्टमी, पौर्णिमा, आर्द्रा, मघा, रोहिणी ही नक्षत्रे, अशा वेळी श्राद्ध करणे उत्तम. श्राद्धाचा योग उत्तम असावा. पदार्थ उत्तम करावेत. सुपात्र ब्राह्मण असावा. व्यतिपात, विष्टी, वैधृती योगाचे दिवस, वैशाखाची तृतीया, कार्तिकाची नवमी, माघाची पूर्णिमा, भाद्रपदाची त्रयोदशी अशा तिथीस श्राद्धाचे अनुष्ठान करावे. या तिथींना युगादी म्हणतात. पितरांना या उपकारक असतात. मन्वन्तरादी तिथींनाही विद्वान पुरुष श्राद्ध करतात. आश्विन शुक्ल नवमी, कार्तिक शुक्ल एकादशी, चैत्र व भाद्रपद शुद्ध तृतीया, फाल्गुनाची अमावास्या, पौष शुद्ध एकादशी, आषाढ शुद्ध दशमी, माघ शुद्ध सप्तमी, श्रावण कृष्ण अष्टमी, आषाढ, कार्तिक, फाल्गुन व ज्येष्ठ यांची पूर्णिमा या तिथींना मन्वन्तरादी म्हणतात. या तिथी दिलेल्या दानास अक्षय करतात. वैशाखी पूर्णिमा, ग्रहणाचा दिवस, कोठला तरी उत्सव, महालयाचे दिवशी तीर्थ, मंदिर,

गोशाला, द्वीप, उद्यान, घर इत्यादी ठिकाणी श्राद्ध करावे.

प्रथम विश्वेदेवांना आसन देऊन पुष्पांनी त्यांची पूजा करावी. विश्वेदेवांना दोन आसने असतात. एकावर पिता-पितामहादीसंबंधी आसनस्थ होतात. दुसऱ्यावर माता-मातामहादीसंबंधी आसनस्थ असतात. त्यांच्यासाठी दोन अर्घ्यपात्र जव व जल आदींनी भरून घ्यावीत. त्यांना कुशाच्या पवित्रीवर ठेवावे. 'शन्नोदेवीरभीष्टये' इत्यादी मंत्रांनी जल व 'यवोऽसि' इत्यादी द्वारे जवांनी ती पात्रे भरावीत. गंध, पुष्प आदींनी पूजा करून विश्वेदेवांची स्थापना करावी. 'विश्वे देवास–' इत्यादी मंत्रानी विश्वेदेवांना आवाहन करावे, त्यांना जवांनी पूजावे. म्हणावे, 'जवा, तू सर्व अन्नांचा राजा आहेस. तुझा देव वरुण आहे. वरुणापासून तुझी उत्पत्ती. तुझ्यात मधूचा अंश आहे. तू सर्व पापांना दूर करणारा आहेस. पवित्र व मुनींच्या द्वारे प्रशंसित आहेस.

**यवोऽसि धान्यराजस्तु वारुणो मधुमिश्रितः ।**
**निर्णोदः सर्वपापानां पवित्रमृषिसंस्तुतम् ।।**

यानंतर अर्घ्यपात्रास चंदन, फूल यांनी सजवून 'या दिव्या आपः' हा मंत्र म्हणून विश्वेदेवांना अर्घ्य द्यावा. त्यानंतर त्यांची पूजा करून गंध इत्यादी देऊन पितृयज्ञास आरंभ करावा. प्रथम पिता आदीसाठी कुशाच्या तीन आसनांची कल्पना करून तीन अर्घ्यपात्रांची पूजा करावी. त्यांना पुष्प आदींनी सजवावे. प्रत्येक अर्घ्यपात्रास कुशाच्या पवित्रीने युक्त करून 'शन्नोदेवीरभीष्टये' या मंत्राने सर्वत्र जलाने शिंपडावे. त्यानंतर 'तिलोऽसि सोमदेवत्यो' या मंत्राने चंदन, पुष्पे, इत्यादी वाहावे. अर्घ्यपात्र पिंपळादीच्या लाकडाचे, चांदीचे वा समुद्रातून निघालेल्या शंखाचेही असावे. सोने, चांदी, तांबे यांचे पात्र पितरांना अभीष्ट आहे. चांदीची चर्चा ऐकूनच पितर संतुष्ट होतात. चांदीचे दर्शन व दान त्यांना प्रिय आहे. चांदीच्या पात्रातून पितरांना जल दिल्यास ते अक्षय होते. पितरांच्या पिंडावर अर्घ्य देण्यासाठी चांदीचे पात्र उत्तम मानले गेले आहे. चांदी भगवान शंकरांच्या नेत्रांतून प्रकट झाली आहे. म्हणून ती पितरांना अधिक प्रिय आहे,

अशा प्रकाराने उपर्युक्त वस्तू जशा मिळतील त्यांच्या योगाने

अर्घ्यपात्र बनवून जल, तिल, गंधपुष्प आदींनी 'या दिव्या आपः' हा मंत्र म्हणून पित्याचे नाव व गोत्र उच्चारून आपल्या हातात कुश घ्यावेत. 'पितृन् आवाहयिष्यामि'–'पितरांना आवाहन करीन' असा मंत्र म्हणून पितरांना निमंत्रण करावे, आलेल्या ब्राह्मणांची अनुमती घेऊन 'आयन्तु नः पितरः' या दोन ऋचांचा पाठ करून पितरांना आवाहन करावे. 'या दिव्या आपः' म्हणून पितरांना अर्घ्य देऊन गंध, पुष्प यांनी त्यांची पूजा करावी,

अन्न वाढण्यापूर्वी अग्निकार्य प्रथम करावे. थोडे अन्न हातात घेऊन 'अग्नये कव्यवाहनाय स्वाहा' व 'सोमाय पितृमते स्वाहा' या दोन मंत्रांनी अग्नी व सोम यांना अग्नीत आहुती द्याव्यात. त्यानंतर अन्न वाढावे. वाढताना 'उशनस्त्वा निधीमहि' इत्यादी मंत्रांचा उच्चार करावा. उत्तम, गुणकारी भाजी, नाना प्रकारचे भक्ष्य पदार्थ, दही, दूध, तूप, साखर आदींनी युक्त असे अन्न पितरांना तृप्तिकारक होते, अन्न वाढून पितृसंबंधी ऋचांचा पाठ करावा. याशिवाय पुराण, ब्रह्मा, विष्णू, सूर्य, रुद्र यांची स्तोत्रे, इंद्र, रुद्र, सोम यांची सूक्ते, पावमानी ऋचा, बृहद्रथन्तर, ज्येष्ठमाससमाहात्म्य, शांतीचा अध्याय, मधुब्राह्मण, मंडल ब्राह्मण; इत्यादींचे यावेळी श्रवण करावे. महाभारताचा पाठ पितरांना अत्यंत प्रिय असतो. ब्राह्मणांचे भोजन झाल्यावर जे अन्न व जल उरेल त्यास त्यांच्यापुढे जमिनीवर विखरून ठेवावे. संस्कारहीन अशा अधमगतीच्या प्राण्यांचा अधिकार त्यावर असतो.

ब्राह्मणांचे भोजन झाल्यावर त्यांना हात-तोंड धुण्यासाठी पाणी द्यावे. यानंतर गायीच्या शेणाने सारवलेल्या जमिनीवर दक्षिणाग्र कुश अंथरून त्यांवर यत्नपूर्वक पितृयज्ञासाठी पिंडदान करावे. पिंडदानाच्या अगोदर पितरांचे नामगोत्र उच्चारून अवनेजनासाठी जल द्यावे. पिंड दिल्यानंतर पिंडांवर प्रत्यवनेजनाचे जल शिंपडून त्यांवर पुष्प आदी वहावे. सव्यापसव्याचा विचार नीट असावा. पित्याप्रमाणेच मातेचे श्राद्धही हातात कुश घेऊन विधिवत करावे. दीप लावावेत. पुष्पे आदींनी पूजा करावी. ब्राह्मणांच्या आचमनानंतर स्वतः आचमन करून एकदा सर्वांना जल द्यावे. फूल, अक्षत देऊन तिलसहित अक्षयोदक दान करावे.

नामगोत्र उच्चारून शक्तीनुसार दक्षिणा द्यावी. गाय, भूमी, सोने, वस्त्र, उत्तम बिछाना यांचे दान करावे. ब्राह्मणांना दिलेले दान पितरांना पोचते. त्यानंतर स्वधावाचन करून विश्वेदेवांना जल देऊन ब्राह्मणांचा आशीर्वाद घ्यावा. पुरुषाने पूर्वाभिमुख होऊन म्हणावे, 'अघोराः पितरः सन्तु-माझे पितर शांत व मंगलमय व्हावेत. ब्राह्मण नंतर म्हणतात, 'तथा संतु-तुमचे पितर शांत होतील.' त्यानंतर श्राद्धकर्त्याने म्हणावे, 'गोत्रं तो वर्धताम्– आमचे गोत्र वाढावे.' यावर ब्राह्मण म्हणतात, 'तथास्तु' त्यानंतर यजमानाने म्हणावे, 'दातारो मेऽभिवर्धन्ताम्–वेदाः सन्ततिरेवच-एताः सत्या आशिषः सन्तु–माझे दाते वाढावेत. माझ्या कुलात वेदांचे अध्ययन वाढावे. सुयोग्य संततीची वृद्धी व्हावी. हे सर्व आशीर्वाद खरे व्हावेत.' यावर ब्राह्मण म्हणतात, 'सन्तु सत्या आशिषः हे सर्व आशीर्वाद सत्यच आहेत.' यानंतर भक्तिपूर्वक पिंड हुंगून स्वस्तिवाचन करावे. भाऊ, स्त्रीपुत्र यांच्यासहित प्रदक्षिणा करून आठ पावले चालावे. त्यानंतर परत येऊन प्रणाम करावा.

या प्रकारे श्राद्धविधी पूर्ण झाल्यावर मंत्रवेत्ता पुरुष अग्नी प्रज्वलित करून बलिवैश्वदेव करतो व बली अर्पण करतो. त्यानंतर पुत्र, बांधव, सेवक यांच्यासह पितरांना समर्पित झालेल्या अन्नाचे भोजन करावे. यास नैमित्तिक श्राद्धही म्हणतात. संपूर्ण मनकामना पूर्ण करणारे हे श्राद्ध आहे. स्त्रीरहित अथवा विदेशस्थ मनुष्यसुद्धा भक्तिपूर्ण मनाने हे श्राद्ध करू शकतो. शूद्रही अशा प्रकारे श्राद्ध करतो. फक्त त्यास वेदमंत्रांचा उच्चार करता येत नाही.

तिसरे श्राद्ध काम्य अथवा वृद्धिश्राद्ध होय. उत्सव, आनंदाचा प्रसंग, संस्काराचा समय, यज्ञ, विवाह आदी मंगलकार्य यांत हे श्राद्ध केले जाते. यात माता, पितामही, प्रपितामही यांची पूजा प्रथम होते. त्यानंतर पिता, पितामह, प्रपितामह, यांचे पूजन होते. यात विश्वेदेवांची पूजा असते. या आभ्युदायिक श्राद्धात दक्षिणावर्त क्रमाने पूजा होते. दही, अक्षत, फल, जल यांनी पूर्वाभिमुख होऊन पितरांना पिंडदान करावे. 'संपन्नम्' चा उच्चार करून अर्घ्य व पिंडदान करावे, सपत्नीक ब्राह्मणास दान द्यावे, श्रेष्ठ ब्राह्मणांच्या द्वारे मंगलपाठ

करावेत, हे श्राद्ध शूद्रही करू शकतो, बुद्धिमान शूद्राने 'पित्रे नमः' इत्यादी नमस्कारमंत्रांनी दान करावे. त्याच्यासाठी दानच प्रधान आहे, दानानेच त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात.

## श्राद्धोपयोगी तीर्थस्थाने

पुलस्त्यऋषींनी भीष्मांना एकोदिष्ट श्राद्धाचा विधी वर्णन करून सांगितला. पिता मृत्यू पावल्यावर अशौच कसे पाळावे याचेही त्यांनी विवेचन केले. हे अशौच सात पिढ्यांपर्यंत पाळणे अगत्याचे आहे. चूडाकरणाच्या आधीच बालकाचा मृत्यू झाला की एक रात्र अशौच पाळावे, अस्थिसंचयनानंतर अशौचग्रस्त पुरुषास स्पर्श करता येतो. प्रेतासाठी बारा दिवसपर्यंत प्रत्येक दिवशी पिंडदान सांगितले आहे. ते प्रेताचे पाथेय असते. बारा दिवसांनंतर प्रेत यमलोकात नेले जाते. दहा रात्री त्याला आकाशात दूध द्यावे. त्याने अग्नीची शांती होऊन त्याचे मार्गातील परिश्रमही निवारण होतात. सुतकापासून निवृत्ती झाली की, आपल्या गोत्राचे अकरा ब्राह्मण बोलावून त्यांना भोजन द्यावे. दुसऱ्या दिवशी एकोद्दिष्ट श्राद्ध करावे. यात आवाहन नसते. अग्नीत हवन नसते. विश्वेदेवांचे पूजन नसते. तिल व जल यांनी युक्त असे दान ब्राह्मणास द्यावे. विधिपूर्वक शय्यादान, फलवस्त्रसमन्वित कांचनपुरुषाची पूजा, द्विजदंपतीचे पूजन इत्यादी आवश्यक आहे.

एकादशाह श्राद्धाचे वर्णन केल्यावर हव्यकव्य दानाचा विधी, ब्राह्मणाकरवी अन्नदान पितरांना कसे पोचते हेही पुलस्त्यांनी समजावून दिले आहे. पिता वसूच्या, पितामह रुद्राच्या व प्रपितामह आदित्याच्या स्वरूपात असतात. पितरांचे नाम व गोत्र यांचा उच्चार त्यांना हव्यकव्य पोचते करणारा आहे. मंत्राची शक्ती व हृदयातील भक्ती श्राद्धाचा सारभाग पितरांना पोचविते. अग्निष्वात आदी दिव्यपितर पितामह आदींचे अधिपती आहेत. तेच त्यांच्यापर्यंत श्राद्धाचे अन्न पोचवितात. शुभ कर्मांनी पिता वा माता दिव्य योनीत गेले असतील तर श्राद्धात दिले गेलेले अन्न अमृत बनून त्यांना पोचते. हे अन्न दैत्ययोनीत भोगरूपाने, पशुयोनीत तृणरूपाने, सर्पयोनीत वायुरूपाने, यक्षयोनीत पान-

रूपाने पोचते. हे श्राद्धकर्म पुष्पाप्रमाणे असून त्याचे फल ब्रह्माची प्राप्ती हेच आहे. श्राद्धाने प्रसन्न झालेले पितर आयुष्य, पुत्र, धन, विद्या, राज्य, लौकिक सुख, स्वर्ग, मोक्ष यांची प्राप्ती करून देतात.

पुष्कर नावाचे एक तीर्थ सर्व तीर्थात श्रेष्ठ आहे. तेथे केलेले दान श्राद्ध, जपादी विधी निश्चितच फलदायी होतात. पितर व ऋषी यांना हे तीर्थ अतिशय प्रिय आहे. याशिवाय नंदा, ललिता, मायापुरी (हरिद्वार) ही तीर्थेही पुष्करासारखीच उत्तम आहेत. मित्रपद, केदार, गंगासागर, ब्रह्मसर, शतद्रू (सतलज) नैमिषारण्य ही सर्व तीर्थे फल देणारी आहेत. नैमिषारण्यात गोमतीत गंगेचा सनातन प्रभाव प्रकट झाला आहे. तेथे भगवान वराह यज्ञरूपाने असतो. देवाधिदेव शूलपाणी विराजत असतो. येथे सुवर्णाचे दान दिले जाते. येथे महादेवांची अठरा हातांची मूर्ती आहे. पूर्वकाळात येथे धर्मचक्राची नेमी जीर्णशीर्ण होऊन पडली होती. हेच स्थान नैमिषारण्य म्हणून प्रसिद्ध झाले. येथे तीर्थांचा निवास आहे. कोकामुख नावाचे एक तीर्थ आहे. हा इंद्रलोकाचा मार्ग असून ब्रह्मदेवांच्या पितृतीर्थाचे दर्शन येथेच होते. येथे भगवान ब्रह्मदेव पुष्करारण्यात निवास करतात. कृत नावाचे एक तीर्थ सर्व पापांचा नाश करणारे आहे. आदिपुरुष भगवान नरसिंहरूपात येथे आहे. इक्षुमती तीर्थ पितरांना नेहमीच प्रिय असते. गंगा-यमुनासंगमात प्रयाग येथे पितर नेहमीच संतुष्ट असतात. कुरुक्षेत्र अत्यंत पुण्यमय तीर्थ आहे. येथील पितृतीर्थ सर्व अभीष्ट फले देणारे आहे.

नीलकंठ हे एक तीर्थ पितरांचे म्हणून प्रसिद्ध आहे. भद्रसर, मानस-सरोवर, मंदाकिनी, अच्छोदा, विपाशा, पुण्यसलिला, सरस्वती, सर्वमित्र-पद, महाफलदायक वैद्यनाथ, अत्यंत पावन क्षिप्रा नदी, कालिंजर गिरी, तीर्थोद्भेद, हरोद्भेद, गर्भभेद, महालय, भद्रेश्वर, विष्णुपद, नर्मदाद्वार, गयातीर्थ ही सर्व पितृतीर्थेच. महर्षी असे सांगतात की, या ठिकाणी पिंडदान करून फलप्राप्ती करून घ्यावी. ओंकारतीर्थ, कावेरी नदी, कपिलेचे जल, चंडवेगा नदी, अमरकंटक हीही पितृतीर्थेच. शुक्लतीर्थ, सोमेश्वरतीर्थ याही तीर्थांना पितरांच्या दृष्टीने महत्त्व आहे. कोणा एका ब्राह्मणाच्या घरी शिवांचा अवतार जेथे झाला ते कायावरोहणतीर्थ

पुण्यतीर्थ आहे. चर्मण्वतीनदी, शूलतापी, पयोष्णी, पयोष्णीसंगम, महौषधी, प्रर्वातिनी पुण्यसलिला महावेणा नदी, महाशालतीर्थ, गोमती, वरुणा, अग्नि-तीर्थ, चारणा, नागतीर्थ, भैरवतीर्थ, भृगुतीर्थ, गौरीतीर्थ, वैनायकतीर्थ, वस्त्रेश्वरतीर्थ, पापहरतीर्थ, पावनसलिला वेत्रवती नदी, महारुद्रतीर्थ, महालिंगतीर्थ, दशार्ण, महानदी, शतरुद्रा, पितृपदपुर, अंगारवाहिका नदी, शोण नदी, घर्घर नावाचे दोन नद, कालिका नदी, शुभदायिनी पितरा नदी; ही सर्व पितृतीर्थे असून स्नान व दान यांसाठी उत्तम आहेत. शतवटा नदी, ज्वाला, शरद्वी नदी, श्रीकृष्णतीर्थ द्वारका, उदकसरस्वती, मालवती नदी, गिरिर्कणिका, दक्षिण समुद्रावरील भूतपापतीर्थ, गोकर्ण-तीर्थ, गजकर्णतीर्थ, चक्रनदी, श्रीशैल, शाकतीर्थ, नारसिंहतीर्थ, महेंद्रपर्वत, पावनसलिला महानदी, या तीर्थांत श्राद्ध केले तर ते अक्षय्य, फलदायी होते.

पुण्यमयी तुंगभद्रा, चक्ररथी, भीमेश्वरतीर्थ, कृष्णावेणा, कावेरी, अंजना, पावनसलिला गोदावरी, उत्तम त्रिसन्धातीर्थ, त्र्यंबकतीर्थे; हीही महत्त्वाची आहेत. पावन श्रीपर्णा नदी, व्यासतीर्थ, मत्स्यनदी, राका, शिवधारा, भवतीर्थ, पुण्यतीर्थ, रामेश्वरतीर्थ, वेणायू, अमृतपुर, मंगलतीर्थ, आत्मदर्शतीर्थ अलंबुशतीर्थ, व त्सव्रतिश्वरतीर्थ गोकामुखतीर्थ, गोवर्धन, हरिश्चंद्र, पुरश्चन्द्र पृथूदक, सहस्राक्ष, हिरण्याक्ष, कदली नदी, नामधेय-तीर्थ, सौमित्रिसंगमतीर्थ, इंद्रनील, महानद, प्रियमेलक; ही श्राद्धासाठी उत्तम तीर्थे आहेत. पावन नदी बाहुदा, सिद्धवट, पाशुपततीर्थ, पर्यंटिका नदी यांत केलेले श्राद्ध फलदायी होते. पंचतीर्थ, गोदावरी नदी, जामदन्यतीर्थ, मोदायतनतीर्थ, सहस्रलिंग, राघवेश्वर, शालग्रामतीर्थ, शीणपत, वैश्वानराशय, सारस्वत, स्वामी, मलंदरा नदी, कौशिकी नदी, चंद्रका, विदर्भा, वेगा, प्रांमुखा, कावेरी, उत्तरांगा, जालंदरगिरी, या तीर्थांत केलेले श्राद्ध सफल होते. लोहदंडतीर्थ, चित्रकूट, कुब्जाम्रक, उर्वशीपुलिन, संसारमोचन व ऋणमोचनतीर्थ यांत केलेला श्राद्धविधी सफल होतो. अट्टहासतीर्थ, गौतमेश्वरतीर्थ, वसिष्ठतीर्थ, भारततीर्थ, ब्रह्मावर्त, कुशावर्त, हंसतीर्थ, पिंडारकतीर्थ, शंखोद्धारतीर्थ, भांडेश्वर-तीर्थ, बिल्वकतीर्थ, नीलपर्वत, राजाधिराज बदरीतीर्थ, वसुधारातीर्थ, रामतीर्थ, जयंती, विजय व शुक्लतीर्थ येथे पिंडदान केल्याने परम-

पदाची प्राप्ती होते.

मातृगृहतीर्थ करवीरपुर, सप्तगोदावरी तीर्थ ही अत्यंत थोर फले देणारी तीर्थे आहेत. मगधदेशात गया व राजगृह ही दोन पावन तीर्थे आहेत. येथे च्यवनमुनींचा आश्रम, पुनःपुन्हा (पुनपुन) नदी, विषयाराधनतीर्थ ही सर्व पुण्यमय स्थाने आहेत. गयाक्षेत्रात धर्मपृष्ठ, ब्रह्मसर, गयाशीर्षवट ही महत्त्वाची स्थाने आहेत. गयेत पिंडदान केल्यास प्रेतत्वापासून सुटका होते. यांखेरीस सत्यतीर्थ आहे. दयातीर्थ आहे. इंद्रियनिगृहतीर्थ आहे, मनोनिग्रहही तीर्थ आहे. सायंकाळ ही राक्षसीवेळ असल्यामुळे त्यावेळी श्राद्ध करू नये. तीर्थयात्रेकरूंनी, जलात प्रवेश करून पितरांसाठी तिल व जल यांची अंजली सपर्मण करावी. हातात कुश घेऊन घरी श्राद्ध करावे.

## पुष्करक्षेत्रवासी पुरुषांचा आश्रमधर्म

पुष्करक्षेत्रात राहणाऱ्या पुरुषांसाठी आश्रमधर्म विशेष प्रकारचा असावा. पूर्वी जेव्हा विष्णू इत्यादी देव तेथे आले होते तेव्हा सर्वांच्या उपस्थितीत स्वतः ब्रह्मदेवांनी क्षेत्रनिवासींच्यासाठी कर्तव्याचा उपदेश केला होता. येथे राहाणाऱ्या पुरुषांनी ममता व अहंकार यांना जवळ येऊ देऊ नये. आसक्त व संग्रहवृत्ती यांचा त्याग करावा. पत्थर व सुवर्ण यांना त्यांनी समान समजावे. प्रतिदिन नाना प्रकारची शुभकर्मे करून त्यांनी सर्व प्राण्यांना अभयदान द्यावे. नित्य प्राणायाम व परमेश्वराचे ध्यान करावे. जपाने स्वतःचे अंतःकरण शुद्ध राखावे. यतिधर्माच्या कर्तव्याचे पालन करावे. सांख्ययोगाच्या विधीस जाणून सर्व संशयांचा उच्छेद करून ब्रह्माचा बोध करून घ्यावा. या पुष्करात मरणारे म्लेच्छ, शूद्र, स्त्री, पशू, पक्षी, मृग आदी सर्व प्राणी स्वर्गलोकास जातात. तिर्यग्योनीत पडलेले पशू-पक्षी, किडे, मुंग्या, जलचर, स्वेदज, अंडज, उद्भिज, जरायुज इत्यादी सर्व प्राणी पुष्करवनात प्राण सोडून ब्रह्मलोकात जातात. समुद्राशिवाय दुसरा जलाशय नाही, तसे पुष्करासारखे दुसरे तीर्थ नाही.

**यथा महोदधेस्तुल्यो न चान्योऽस्ति जलाशयः ।**
**तथा वै पुष्करस्यापि समं तीर्थं न विद्यते ।।**

धर्मतत्त्व जाणणाऱ्या पुरुषाने आपल्या आयुष्याचा एक चतुर्थांस भाग ब्रह्मचर्यव्रताचे पालन करून गुरूजवळ घालवावा. अध्ययन करण्यासाठी श्रद्धा व आदर यांनी युक्त होऊन गुरूचा आश्रय घ्यावा. गुरुगृही राहिल्यास गुरू झोपल्यानंतर शिष्याने झोपावे व त्यांच्या आधी उठावे. सर्व प्रकारची सेवा करून शिष्याने गुरूच्या जवळ उभे राहावे. गुरूचा सेवक बनून नेहमी शिष्याने सेवा करावी. गुरूस प्रिय वाटणारे उत्तर द्यावे. इंद्रियांना जिंकून शांतभावाने गुरूकडे पाहावे. गुरूच्या आधी भोजन कधी करू नये. गुरू उभे असतील तर शिष्याने बसू नये. ते झोपले म्हणजे शयन करावे. गुरूच्या उजव्या पायास आपल्या उजव्या हाताने स्पर्श करून डाव्या पायास डाव्या हाताने स्पर्श करून गुरूचे पाय हळूहळू दाबावेत. त्यांना प्रणाम करीत म्हणावे, 'भगवन्, मला शिकवा.' गुरूने सांगितलेले कार्य करून पुढील कामाची अनुज्ञा मागावी. गुरुमुखातून वेदांचा अर्थ ऐकावा. भिक्षेच्या अन्नावर जीवन चालवावे. जमिनीवर झोपावे.

वेदोक्त व्रताचे पालन करून गुरूस दक्षिणा देऊन विधिपूर्वक समावर्तन संस्कार करावा. धर्मपूर्वक प्राप्त झालेल्या स्त्रीसह गार्हपत्यादी अग्नींची स्थापना करून प्रतिदिन हवनाने त्यांची पूजा करावी. गृहस्थ ब्राह्मणाने यज्ञ करणे, यज्ञ करवून घेणे, वेदांचा अभ्यास करणे, वेद शिकविणे, दान देणे, दान घेणे या कर्मांचे अनुष्ठान करावे. गृहस्थाच्या व्रताखेरीज दुसरे मोठे तीर्थ नाही. गृहस्थ पुरुषाने केवळ स्वतःच्यासाठी अन्न शिजवू नये. पशूंची हिंसा करू नये. दिवसा कधी झोप घेऊ नये. रात्रीच्या पहिल्या व शेवटच्या प्रहरी झोपू नये. सूर्योदय व सूर्यास्तप्रसंगी भोजन करू नये. असत्य बोलू नये. कोणी ब्राह्मण अतिथी आला व तो न जेवता गेला असे कधी गृहस्थाच्या घरी होऊ नये. अतिथीस भोजन दिल्याने देव व पितर संतुष्ट होतात. म्हणून गृहस्थ पुरुषानें नेहमी अतिथीचा सत्कार करावा. वेदविद्यांत, व्रतांत पारंगतता, श्रोत्रिय, जितेंद्रिय, क्रियावान, तपस्वी अशा श्रेष्ठ पुरुषांच्या सत्कारासाठीच हव्यकव्याचे विधान व्हावे. जो आसक्त आहे, कर्मभ्रष्ट आहे, ज्याने अग्निहोत्र सोडले आहे, गुरूची जो वृथा निंदा करतो, असत्य भाषण

जो करतो, त्याला पितरांना देण्यासारखे अन्न स्वीकारण्याचा अधिकार नाही. गृहस्थाच्या संपत्तीत सर्व प्राण्यांच्या भाग असतो. यज्ञातून वाचलेले अन्न हविष्याच्या समान अमृतमय मानले जाते.

गृहस्थ पुरुषाने केवळ स्वतःच्याच पत्नीशीच अनुराग राखावा. त्याने स्वतःच्या मनास वश करून ठेवावे. कोणाचेही दोष पाहू नयेत. ऋत्विक, पुरोहित, आचार्य, अतिथी, शरणागत, वृद्ध, बालक, रोगी, वैद्य, कुटुंबी, संबंधी, बांधव, माता, पिता, जावई, भाऊ, पुत्र, स्त्री, कन्या, दासदासी यांच्याशी वाद घालू नये. जो यांच्याशी वादविवाद करीत नाही तो सर्व पापांपासून मुक्त होतो. आचार्य ब्रह्मलोकाचे स्वामी, पिता प्रजापति– लोकाचे स्वामी, अतिथी सर्व लोकांचे स्वामी, ऋत्विक वेदांचे अधिष्ठान आहे. जावई अप्सरांच्या लोकांचा अधिपती असतो. कुटुंबी विश्वेदेवलोकांचा अधिष्ठाता आहे. संबंधी, बांधव दिशांचे व माता, मामा भूलोकाचे स्वामी होत. वृद्ध, बालक, रोगी आकाशाचे प्रभू आहेत. पुरोहित ऋषिलोकाचे व शरणागत साध्यलोकांचे अधिपती आहेत. वैद्य अश्विनीकुमारांच्या लोकांचे, बंधू वसुलोकाचे स्वामी आहेत. पत्नी वायुलोकाची ईश्वरी व कन्या अप्सरांच्या घरची स्वामिनी असते. मोठा भाऊ पित्यासमान असतो. पत्नी व पुत्र आपलेच शरीर मानावेत. दासवर्ग छायेप्रमाणे असतो, म्हणून कोणत्याही व्यक्तीस अपमानकारक असे काही बोलू नये. कधी क्रोध वा दुःख प्रकट करू नये.

स्वतःच्या शरीरास सुरकुत्या पडल्या की, डोक्याचे केस पांढरे झाले की, पुत्रास पुत्र झाले की, गृहस्थाने वनात जाण्याची तयारी करावी. प्रत्येक द्विजाने आपल्या आयुष्याचा तिसरा भाग वानप्रस्थ आश्रमात खर्च करावा. तेथेही अग्नीचे सेवन करावे. देवांची पूजा करून नियमपूर्वक राहावे. नियमित भोजन करावे. भगवान विष्णूंत भक्ती ठेवावी, संपूर्ण अंगांनी यज्ञांचे सेवन करावे. प्रतिदिन अग्निहोत्र करावे. वानप्रस्थी लोक वर्षाकाळी खुल्या मैदानात आकाशाच्या खाली बसतात. हेमंत ऋतूत जलाचा आश्रय घेतात. ग्रीष्मात पंचाग्नीची सेवा करतात. कंदमूल, फल, आपोआप मिळणारे धान्य हा त्यांचा आहार असतो.

चौथा आश्रम हा संन्यास होय. उपनिषदांच्या द्वारे त्याचे प्रति-

पादन झाले आहे. प्राचीन युगात सर्वार्थदर्शी ब्राह्मणांनी संन्यासधर्माचा आश्रय घेतला होता. अगस्त्य, सप्तर्षी, मधुच्छन्दा, गवेषण, सांकृती, सुदिव, भांडी, यवप्रोथ, कृतश्रम, अहोवीर्य, काम्य, स्थाणू, मेधातिथी, बुध, मनोवाक, शिनीवाक, शून्यपाल, अकृतश्रम हे धर्मतत्त्वाचे जाणकार होते. त्यांना धर्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला होता. हे सर्व मायेचे बंधन तोडून वनात गेले होते. सर्वस्वाचे दान करून मुमुक्षूने आत्म्याचे हित साधावे. विषयांतील मन काढून आत्म्यात रममाण व्हावे.

हा चतुर्थ आश्रम सर्वांत श्रेष्ठ आहे. तीन आश्रमांनंतर काषाय-वस्त्र धारण करून संन्यास घ्यावा. सर्वस्वाचा त्याग हाच खरा संन्यास होय. संन्यासी एकटाच मोक्षसिद्धीसाठी धर्मसाधन करतो. त्याने अग्नि-होत्र पाळण्याची जरूरी नाही. स्वतःसाठी निवासस्थान बांधू नये. केवळ भिक्षा मागण्यासाठीच गावात प्रवेश करावा. उद्यासाठी कोणत्याच वस्तूचा संग्रह करू नये. मौन धारण करून शुद्ध भावाने राहावे. थोडे व नियमित भोजन करावे. प्रत्येक दिवशी त्याने एकदाच जेवावे. भोजना-साठी, पाणी पिण्यासाठी त्याने नरोटीसारखे पात्र वापरावे. वृक्षाच्या खाली निवास करावा, मलिन वस्त्र धारण करावे, एकटेच राहावे, सर्व प्राण्यांकडे उदास वृत्तीने पाहावे. कटू वचन बोलणाऱ्यासही संन्यासी कधी कटू शब्द बोलत नाही. तो कधी कोणाची निंदा करीत नाही, ऐकत नाही. जे काही मिळेल त्यावर तो पोट भरतो, जागा मिळेल तेथे तो झोपतो. देव त्याला ब्राह्मणच मानतात. मान व अपमान झाला तर तो कधी हर्षित होत नाही, की कष्टी होत नाही. तो जीवनाचे व मरणाचे अभिनंदन करीत नाही. त्याचे चित्त रागद्वेषास वशीभूत होत नाही. तो इंद्रियांना स्वाधीन ठेवतो. त्याची बुद्धी कधीच दूषित होत नाही. तो सर्व प्राण्यांपासून निर्भय असतो. सर्व प्राणी त्याच्यापासून निर्भय असतात. हत्तीच्या पदचिन्हात जसे सर्व जीवांना स्थान मिळते तसे त्याच्या चित्तात सर्व प्रकारचे ज्ञान लीन होऊन जाते. त्याचे सर्व धर्म, त्याचे वर्तन अहिंसामय असते.

## सप्तर्षींच्या आश्रमातील धर्मचर्चा

एकदा अत्री, वसिष्ठ, पुलह, अंगिरा, च्यवन, कश्यप, गौतम, जमदग्नी, विश्वामित्र इत्यादी ऋषी पुष्करात आपल्या पुत्रांसह, शिष्यांसह आले. सप्तर्षींच्या आश्रमात राहून इंद्रियसंयम, तपस्या, धैर्य, सत्य, क्षमा, सरलता, दया, दान इत्यादी गुणांची प्रतिष्ठा वाढत होती. याचवेळी एक मोठा कोरडा दुष्काळ पडला. सर्व लोकांना भुकेनें मोठी पीडा केली. त्या समयास सप्तर्षींच्या आश्रमातील ऋषींनाही त्रास झाला हे पाहून तेथील राजाने त्या मुनिवरांना म्हटले, 'मुनिवर, ब्राह्मणांना प्रतिग्रह ही उत्तम वृत्ती आहे. आपण आता माझ्याकडून उत्तम दान स्वीकारावं. धान्य, तूप, दूध, रत्न, सुवर्ण, दूध देणाऱ्या गायी, असं दान आपण घ्यावं.' त्यावर ते ऋषी म्हणाले,

'राजन्, प्रतिग्रह ही फार भयंकर बाब आहे. ती चवीनं गोड असली तरी परिणामी विषासमान आहे. आपण ही गोष्ट जाणीत आहात. आम्हांस मग या लोभात कशासाठी पाडता ? दहा कसावांच्या समान एक कुंभार वा तेली. दहा तेल्यांच्या समान एक दारू विकणारा, दहा शराबविक्रेत्यांबरोबर एक वेश्या, दहा वेश्यांबरोबर एक राजा होतो. राजाचा प्रतिग्रह अत्यंत भयंकर असता जो ब्राह्मण मोहाने वश होऊन राजाचा प्रतिग्रह स्वीकारतो तो तमिस्त्र आदी घोर नरकात जातो. म्हणून महाराज, आपण आपल्या दानासह येथून निघून जावं. आपलं कल्याण होईल. हे दान आपण दुसऱ्यांना द्यावं.'

इतके म्हणून सप्तर्षी निघून गेले. राजाच्या सेवकांनी फळांत सोने इत्यादी भरून जमिनीवर विखरून टाकले. ऋषी अन्नाचे दाणे शोधण्यासाठी आले असताना त्यांना ही फळे दिसली. त्यांनी ती हातातही घेतली. त्यांचे वजन जास्त पाहून अत्री ऋषी म्हणाले, 'हे फल ग्रहण करण्यास योग्य नाही. आमच्या ज्ञानशक्तीवर मोहाचा पडदा पडलेला नाही. आम्ही मंदबुद्धीचे नाही. आम्ही समजदार ज्ञानी आहोत. आम्ही जाणतो की, या फळांत सुवर्ण भरलेलं आहे. या लोकात धनानं आनंद होतो. मृत्यूनंतर तर त्याचे कटू परिणाम भोगावे लाग-

तात. जो खऱ्या सुखाची वा अनंतपदाची इच्छा करतो त्यानं या सुवर्णास स्पर्शही करू नये.' त्यावर वसिष्ठ मुनी म्हणाले,

'या लोकात धनसंचयापेक्षा तपस्येचा संचय श्रेष्ठ आहे. सर्व प्रकारच्या लौकिक संग्रहाचा जो त्याग करतो त्यालाच शांतता प्राप्त होते. संग्रह करणारा कोणताही मनुष्य सुखी नसतो. ब्राह्मण जसजसा प्रतिग्रहाचा त्याग करतो तसतसं त्याचे ब्रह्मतेज वाढतं. महात्मा पुरुषानं संग्रह करू नये.' यानंतर कश्यपमुनी म्हणाले, 'धनसंपत्ती मोहात टाकणारी असते. मोह नरकात नेतो. म्हणून कल्याण साधू इच्छिणारा पुरुष अनर्थांचं साधन अर्थ दूर सारीत असतो. ज्याला धर्मासाठीच धनाची इच्छा असते, त्याला त्या इच्छेचा त्यागच श्रेष्ठ वाटावा. पायांना चिखल लागल्यावर तो धुण्यापेक्षा तो लागू नये याचीच काळजी घ्यावी. धनापासून धर्मसाधन जे होतं ते क्षयशील असतं.' यानंतर भरद्वाज म्हणाले, 'जेव्हा मनुष्याचं शरीर जीर्ण होतं तेव्हा तेव्हा त्याचे दात हालतात, केस पांढरे होतात. पण धनाची व जीवनाची आशा वृद्धावस्थेतही कमी होत नाही. ती सारखी नव्यानं वाढतच असते. शिंपी जसा सुईनं वस्त्रात प्रवेश करतो त्याचप्रमाणं तृष्णारूपी सुईनं संसाररूपी वस्त्राचा विस्तार होतो. तृष्णेचं पोट भरणंही कठीण असतं. या तृष्णेमुळेच सर्व अनर्थ होतात. तृष्णेचा त्याग केला पाहिजे.'

गौतमऋषी म्हणाले, 'इंद्रियांचं लोभग्रस्त होणं हेच सर्व मनुष्यांना संकटात टाकतं. ज्याच्या चित्तात संतोष आहे त्याच्यासाठी सर्वत्र धनसंपत्ती भरून राहिलेली आहे. संतोषरूपी अमृतानं जो तृप्त आहे, त्याला जे सुख आहे ते धनाच्यासाठी इकडं तिकडं धावणाऱ्यास कसं प्राप्त होईल ? असंतोष हेच सर्वांत मोठं दुःख आहे. संतोष हे सर्वांत मोठं सुख आहे. म्हणून सुखाची इच्छा करू इच्छिणाऱ्यासच नेहमी संतुष्ट ठेवलं पाहिजे.

असंतोषः परं दुःखं सन्तोषः परमं सुखम् ।
सुखार्थी पुरुषस्तस्मात्सन्तुष्टः सततं भवेत् ॥

यानंतर विश्वामित्रांनी सांगितले, 'कोणा एखाद्याची एक इच्छा पूर्ण झाली की, पुन्हा दुसरी तयार होऊन त्याला बाणाप्रमाणं टोचू

लागते. भोगाची इच्छा उपभोगानं कधी तृप्त होत नाही. अग्नीत तूप टाकल्यावर तो जसा भडकतो तशी ती उपभोगानं अधिकच वाढते. भोगांची इच्छा करणारा पुरुष कधीच सुखी होत नाही.' जमदग्नी यावर म्हणाले, 'प्रतिग्रह घेण्याची शक्ती असून जो पुरुष तो कधीच घेत नाही त्याला सनातन लोकाची प्राप्ती होते. जो ब्राह्मण राजापासून धन घेतो, त्या मूर्खाला नरकयातना भोगाव्या लागतात. प्रतिग्रह घेण्याचं सामर्थ्य असलं तरी तो टाळावा व ब्रह्मतेजाचं रक्षण करावं.'

यानंतर अरुंधती म्हणाली, 'तृष्णेला खरं म्हणजे आदी नाही की अंत नाही. ती सर्व शरीरास व्यापून राहिली आहे. शरीर जीर्ण झालं तरी ती जीर्ण होत नाही. ती तर एखाद्या प्राणान्तकारी रोगाप्रमाणे आहे. या तृष्णेचा त्याग केला तरच सुख लागेल.'

अशा निर्लोभवृत्तीची चर्चा करीत ऋषी चालले होते. त्यांनी त्या सुवर्णयुक्त फळांकडे लक्ष दिले नाही. फिरत फिरत ते मध्यपुष्करात आले. त्यांना तेथे शुनःसख या नावाचा एक परिव्राजक भेटला. त्याच्या बरोबर ते कोठल्या तरी वनात गेले. त्याने तेथे एक मोठे सरोवर त्यांना दाखविले. हे सरोवर सर्वत्र कमलफुलांनी आच्छादिलेले होते. ते सर्व सरोवराच्या काठी बसले व कल्याणदायक चिंतन करू लागले. त्यावेळी शुनःसख क्षुधेने पीडलेला होता. त्याने या भुकेसंबंधीचा प्रश्न केल्यावर ऋषी त्याला म्हणाले,

'शक्ती, खड्ग, गदा, चक्र, तोमर इत्यादी बाणांनी पीडित होणाऱ्या माणसास जी वेदना होते तशीच भुकेनंही होते. दमा, खोकला, क्षय, ज्वर, मृगी आदी रोगांनी पीडलेल्या मनुष्यासही भुकेचं दुःख सतावीत असतं. सूर्यकिरण पृथ्वीवरचं सारं जल शोषून घेतात, त्याप्रमाणे पोटातील आग सर्व नाड्या सुकवून टाकते. क्षुधेनं पीडलेला मनुष्य डोळ्यांनी पाहू शकत नाही. त्याचं सारं अंग जळत राहातं. सुकत जातं. भुकेनं पीडलेला मनुष्य मुका, बहिरा, जड, पंगू, भयंकर व मर्यादाहीन बनतो. लोक क्षुधेनं पीडित होऊन माता, पिता, स्त्री, पुत्र, बंधू व स्वजन यांचाही परित्याग करतात. भुकेनं व्याकुळ झालेला मनुष्य पितरांची,

देवांची, गुरूंची पूजा नीट करू शकत नाही. अतिथींचा आदर तो करीत नाही.

'या प्रकारे अन्न न मिळाल्यानं देहधारी प्राण्यांत सर्व प्रकारचे दोष येतात. म्हणून या जगात अन्नाशिवाय मोठा पदार्थ दुसरा नाही. अन्न हेच जगाचं मूळ आहे. सर्व काही अन्नाच्या आधारावर टिकून आहे. तप, जप, सत्य, होम, ध्यान, योग, उत्तम गती, स्वर्गसुख या सर्व गोष्टी अन्नानं सुलभ होतात. चंदन, अगर, धूप, शीतलाईत इंधन यांचं दान अन्नदानाच्या सोळाव्या भागाबरोबरही नसतं. अन्न हेच प्राण, हेच बल. हेच तेज. अन्न हाच पराक्रम आहे. अन्नापासूनच तेज निर्माण होतं, म्हणून अमावास्येच्या श्राद्धात अन्नदान महत्त्वाचं आहे. ते पितरांना आजीवन संतुष्ट करतं.

'इंद्रियसंयम व मनोनिग्रह यांनी ब्राह्मण सुखी व धर्माचा भागीदार होतो. दम, दान, यम हे तीन प्रमुख धर्म होत दम हा ब्राह्मणाचा सनातनधर्म आहे. दम तेज वाढवीत असल्यानं परम पवित्र व उत्तम आहे. दमानं पुरुष पापरहित व तेजस्वी होतो. या जगात जे काही नियम धर्म, शुभ कर्म, यज्ञाचं फल असतं, या सर्वांपेक्षा दमाचं महत्त्व अधिक आहे. दमाशिवाय दानक्रिया शुद्ध होत नाही. दमानंच यज्ञ, दमानंच दान शोभतं. ज्यानं इंद्रियांचं दमन केलं नाही त्यानं वनात राहून काय उपयोग ? ज्यानं मनाचं दमन केलं आहे त्याला कोणत्याही आश्रमात राहाण्याची जरूरी नाही. जितेन्द्रिय पुरुष जिथं राहातो तेच त्याचं वन, तोच त्याचा आश्रम. विषयासक्त माणसांच्या वनात राहाण्यानंही दोष निर्माण होतात. घरात राहून इंद्रियांचं दमन केलं तर तीच एक तपस्या आहे. शुभकर्मास प्रवृत्त झालेल्या वीतरागी माणसाचं घर हेच तपोवन आहे. केवळ शब्दशास्त्री व्याकरणात रमणाऱ्या लोकांना मोक्ष मिळत नाही. जो एकान्तात राहून दृढपूर्वक इंद्रियसंयमन करतो, आसक्तीस दूर सारतो, अध्यात्मतत्त्वाचं चिंतन करतो, अहिंसा व्रताचं पालन करतो, त्यालाच मोक्ष मिळतो. जितेन्द्रिय मनुष्य सुखानं झोपतो. सुखानं जीवन जगतो.

'मांसभक्षी प्राणी, अजितेन्द्रिय मनुष्यापासून लोकांना सतत भय

असतं. त्याच्यासाठी ब्रह्मदेवांनी दंडाची योजना केली आहे. दंडच प्राण्यांचं, प्रजेचं रक्षण करतो. पातकी लोकांना पापापासून दंडच परावृत्त करतो. मनुष्याचा शासक दंडच आहे. त्यावरच धर्म टिकून आहे. उदारता, कोमलता, संतोष, दोषदृष्टीचा अभाव, गुरूची शुश्रूषा, प्राण्यांवर दया, चहाडी न करणं, यांनाच दम म्हणतात. धर्म, मोक्ष, स्वर्ग, हे सर्व या दमावर अवलंबून आहेत. जो आपला अपमान होऊनही क्रोध करीत नाही, सन्मान होऊनही ज्यास हर्ष होत नाही. ज्याच्या दृष्टीत सुख व दुःख समान आहे, तोच प्रशान्त पुरुष मानावा. ज्याचा अपमान होतो तो साधुपुरुष सुखानं झोपतो, सुखानं जगतो. त्याची वृद्धीही कल्याणदायी असते. पण अपमान करणारा मनुष्य मात्र स्वतःच नष्ट होऊन जातो. अपमानित पुरुषानं अपमान करणाऱ्याचं कधी वाईट चिंतू नये. आपल्या धर्मावर दृष्टी ठेवून असावं. दुसऱ्या धर्माची निंदा करू नये.

'ज्यानं इंद्रियांचं दमन केलं नाही त्याचं शास्त्राध्ययनही व्यर्थ आहे. कारण मन व इंद्रियं यांचा संयम हेच शास्त्राचं मूळ आहे. सनातनधर्म तो हाच. सर्व व्रतांचा आधार दम हाच आहे. दमहीन पुरुषास, वेदही पवित्र करू शकणार नाही. ज्यानं इंद्रियांचं दमन केलं नाही त्यांचं सांख्य, योग, उत्तम कुल, जन्म, तीर्थस्थान हे सर्व व्यर्थ आहे. योगवेत्त्या द्विजानं अपमानास अमृत म्हणून सेवन करावं. सन्मानास विष समजून त्याचा त्याग करावा. अपमानानं त्याच्या तपाची वृद्धी होते. सन्मानानं त्याचा क्षय होतो. पूजा व सत्कार स्वीकारणारा ब्राह्मण धार काढलेल्या गायीप्रमाणं रिता होतो. गवत व जल सेवन करून गाय जशी पुष्ट होते तसेच ब्राह्मण जप व होम यांनी तेजस्वी होतो. या जगात निंदा करणारा मोठाच मित्र समजावा. कारण तो आपलं पाप नेतो व स्वतःचं पुण्य देत असतो.

आक्रोशकसमो लोके सुहृदन्यो न विद्यते ।
यस्तु दुष्कृतमादाय सुकृतं स्वं प्रयच्छति ।।

'निंदा करणाऱ्याची आपण कधीच निंदा करू नये. आपल्या मनाला आवरावं. याप्रमाणं मनास आवरणारा जणू अमृतानं स्नान करतो, वृक्षाच्या खाली राहाणं, साधारण वस्त्र वापरणं, एकटं राहाणं,

कुठलीच अपेक्षा न ठेवणं, ब्रह्मचर्याचं पालन करणं, यांमुळं परमगतीची प्राप्ती होते. ज्यानं काम व क्रोध यांना जिंकलं त्यानं जंगलात कशासाठी जावं ? अभ्यासानं शास्त्रांचं, शीलानं कुलाचं, सत्यानं क्रोधाचं, मित्रामुळे प्राण्यांचं रक्षण होतं. ज्यानं क्रोधाला व भयाला जिंकलं त्याच्यासारखा वीर या पृथ्वीवर आहे कोण ?'

अशा प्रकारची चर्चा करून ऋषिमुनींनी शुन:सखाच्या समोर धर्मतत्त्वांचे सार उभे केले. यानंतर ते दुसऱ्या एका वनात गेले. त्यांना तेथेही एक विस्तृत जलाशय दिसला. पद्मकमलांनी तो समृद्ध होता. त्यांनी मृणाल बाजूस सारून जलाने संपन्न होणारी संध्यातर्पणादी क्रिया केली. त्या ऋषींनी मृणालकंद बाजूस काढून ठेवले होते ते त्यांना काठावर दिसेनात. त्यांच्यांत चर्चा सुरू झाली. आपण क्षुधेने कष्टी आहोत, पण कोणा पाप्याने या मृणालांना चोरून नेले ? कश्यपमुनी म्हणाले, 'ज्यानं या मृणालांची चोरी केली असेल तो मोठाच चोर असला पाहिजे दंभपूर्वक दंभाचं आचरण तो करीत असावा. राजाची सेवा, मद्य व मांस यांचं सेवन, खोटं बोलणं, व्याजावर जगणं, रुपये घेऊन कन्या विकणं या पापांचा धनी तो होईल.' वसिष्ठ म्हणाले, 'हा मृणालचोर ऋतुकालाआधीच मैथुन करणारा असेल. दिवसा झोपणं, ब्राह्मण असून शूद्र स्त्रीशी संबंध ठेवणं, यांत त्याला गोडी असेल,' भरद्वाज म्हणाले, 'हा मृणाल चोरणारा सर्वांना क्रूर वाटेल. धनाचा अभिमानी असेल. चुगलखोर असेल.' गौतमऋषी म्हणाले, 'मृणालाची चोरी करणारा शूद्राचं अन्न खाणारा असेल, परस्त्रीगामी असेल, दुसऱ्यास न देता घरात मिष्टान्न खाणारा असेल.' विश्वामित्र म्हणाले, 'मृणालचोर सदा कामपरायण, दिवसा मैथुन करणारा, नित्य पातकी, दुसऱ्याची निंदा करणारा, परस्त्रीगामी असेल.'

जमदग्नीऋषी म्हणाले, 'या मृणालचोरानं आपल्या मातापित्यांचा अपमान केला असेल. आपल्या कन्येस त्यानं विकलं असणार. दुसऱ्याच्या स्वयंपाकगृहात हा जेवणारा असेल. परस्त्रीशी संपर्क ठेवणारा असेल गायीची त्यानं विक्री केलेली असणार.' पराशर म्हणाले, 'हा दुसऱ्यांचा दास असेल. क्रोधी असेल.' ऋषींची ही चर्चा ऐकून शुन:सख

म्हणाला, 'ज्यांनं मृणालांची चोरी केली असेल तो न्यायपूर्वक वेदांचं अध्ययन करणारा होईल. त्याची अतिथींवर प्रीती असेल. तो सत्य बोलणारा असेल. तो विधिवत अग्निहोत्र करणारा असेल. प्रत्येक दिवशी यज्ञ करून ब्रह्मलोकास जाईल.' शुन:सखाची ही वचने ऐकून ऋषी म्हणाले, 'शुन:सखा, तू जे म्हणालास तेच तर द्विजाचं अभीष्ट आहे. तू तर या मृणालांची चोरी केली नाहीस ?' त्यावर तो म्हणाला, 'ब्राह्मणांनो, आपणांकडून आचारधर्म समजावून घ्यावा म्हणून तर मी हे मृणाल मुद्दाम लपवून ठेवले होते. मला तुम्ही इंद्र समजावे. मुनींनो, आपण लोभावर विजय मिळवून अक्षय सुख मिळवलं आहे.' त्यावर ऋषींनी इंद्रास ओळखले. ते त्याला म्हणाले 'देवराज, या मध्यमपुष्करात स्नान केल्यानं तीन रात्री इथं राहून उपवासपूर्वक निवास केल्यानं अक्षय फलाची प्राप्ती होते.'

## नाना व्रते, स्नाने, तर्पणविधी इत्यादी

पुलस्त्यांनी नाना प्रकारची व्रते, स्नाने, तर्पणविधी, अन्नादींची दाने यांचे सविस्तर वर्णन केले. ज्येष्ठ पुष्करात गायी, मध्यम पुष्करात भूमी व कनिष्ठ पुष्करात सुवर्ण दान केल्याने पुण्य लाभते. येथे प्रथम देव ब्रह्मदेव, द्वितीय भगवान विष्णू, तिसरे भगवान रुद्र आहेत. सर्व व्रतांत श्रेष्ठ व महापातकनाशक असे एक व्रत भगवान शंकरांनी सांगितले आहे. रात्री अन्न तयार करून कुटुंबवत्सल ब्राह्मणास बोलावून, त्याला भोजन देऊन एक गाय, सुवर्णमय चक्राने युक्त असे त्रिशूल व दोन वस्त्रे यांचे दान करावे. असे केल्याने शिवलोकात वास्तव्याची प्राप्ती होते. एके दिवशी एकभुक्त-व्रती राहून, एकदाच भोजन करून दुसऱ्या दिवशी तिलमयी धेनूचे व वृषभाचे दान करावे. भगवान शंकरांचे पद प्राप्त होईल. पाप व शोक नाश करणारे हे 'रुद्रव्रत' आहे. एक वर्षभर एक दिवसाच्या अंतराने रात्री भोजन करून वर्ष पूर्ण होताच नीलकमल सुवर्णमय कमल, साखरेने भरलेले पात्र व एक बैल यांचे दान करावे, या 'नीलव्रताने' भगवान विष्णूच्या धामाची प्राप्ती होते.

जो मनुष्य आषाढापासून चार महिन्यांपर्यंत तेलाचे मालिश सोडून

देतो, भोजनाची सामग्री दान करतो, तो भगवान श्रीहरीच्या धामास जातो. मनुष्यास प्रसन्न करणारे हे 'प्रीतिव्रत' आहे. चैत्र महिन्यात जो दही, दूध, तूप व गूळ यांचा त्याग करतो, गौरीस प्रसन्न करून घेण्यासाठी जो ब्राह्मणदंपतीस पूजून वस्त्र व रस भरलेले पात्र अर्पण करतो त्याला गौरी प्रसन्न होते. हे 'गौरीव्रत' आहे. आषाढादी चातुर्मासांत जो फळ खात नाही, चार महिन्यांनंतर जो तूप व गूळ यांच्याबरोबर एक घडा व कार्तिकी पूर्णिमेस काही सुवर्ण ब्राह्मणास दान देतो तो रुद्रलोकास जातो. हे 'शिवव्रत' आहे. हेमंत व शिशिर ऋतूंत जो पुष्पाचे सेवन सोडतो, आपल्या शक्तीस अनुसरून जो सुवर्णाची तीन फुले बनवून फाल्गुनी पौर्णिमेस शिव व विष्णू यांच्या प्रसन्नतेसाठी दान करतो तो परमपदास जातो. हे 'सौम्यव्रत' आहे.

जो फाल्गुनापासून प्रारंभ करून प्रत्येक महिन्याच्या तृतीयेस मीठ सेवन करीत नाही, वर्ष पूर्ण होताच भवानीच्या प्रसन्नतेसाठी ब्राह्मण-दंपतीचे पूजन करतो, त्यांना शय्या आदी सामग्री दान करतो, गृहाचे दान करतो, तो एक कल्पपर्यंत गौरीलोकात निवास करतो. याला 'सौभाग्यव्रत' म्हणतात. जो ब्राह्मण एक कल्पपर्यंत मौनभावाने संध्या करतो, वर्षाच्या अखेरीस तुपाचा घडा, दोन वस्त्रे, तिल व घंटा ब्राह्मणास दान देतो, त्याला सारस्वत लोकाची प्राप्ती होते. रूप व विद्या देणारे हे 'सारस्वत' नावाचे व्रत आहे. प्रतिदिन गोमयाचे मंडल करून त्याचे अक्षतांच्या साह्याने कमल बनवावे. त्यावर भगवान श्रीशिव वा श्रीविष्णू यांची प्रतिमा वा मूर्ती स्थापन करावी. तुपाने तिला स्नान घालावे. व नंतर विधिवत पूजन करावे. या प्रकाराने एक वर्ष गेल्यावर सामगान करणाऱ्या ब्राह्मणाला शुद्ध सोन्यात बनविलेले कमल, तिलाची धेनू यांचे दान करावे. शिवलोकाची प्राप्ती करून देणारे हे 'सामव्रत' होय.

नवमी तिथीस एकभुक्त राहून, एकाच अन्नाचे भोजन करून कुमारी कन्यांना भक्तिपूर्वक भोजन घालावे. गायी, सुवर्ण, शिवलेला अंगरखा, धोतर, चादर, सोन्याचे सिंहासन, यांचे दान ब्राह्मणास करावे. या व्रताने रूपवान बनून शिवलोकाची प्राप्ती होते. शत्रू त्याचा पराभव कधीच करू शकत नाही. मनुष्याला सुख देणारे हे 'वीरव्रत' आहे.

चैत्रापासून प्रारंभ करून चार महिन्यांपर्यंत लोकांना त्यांनी न मागता जल पाजावे. व्रतसमाप्तीस जलाने भरलेला माठ, तिलपूर्ण पात्र, सुवर्ण यांचे दान करावे. असे करण्याने मनुष्य ब्रह्मलोकात जातो. हे उत्तम असे 'आनंदव्रत' आहे. जो मनुष्य मांसाचा त्याग करतो, व्रतपूर्तीसाठी गाय व मृग सोन्याचा करून दान देतो, त्याला अश्वमेधयज्ञाचे फल मिळते. हे 'अहिंसाव्रत' होय. एक कल्पपर्यंत याचे फल भोगून मनुष्य शेवटी राजा होतो.

माघाच्या महिन्यात सूर्योदयापूर्वी स्नान करून द्विजदंपतीचे पूजन करावे. त्यांना भोजन द्यावे. यथाशक्ती वस्त्र व आभूषण द्यावे. हे 'सूर्यव्रत' आहे. याचे अनुष्ठान करणारा एक कल्पपर्यंत सूर्यलोकात निवास करतो. आषाढादी चार महिन्यांत प्रतिदिन प्रातःस्नान करून, कार्तिकी पूर्णिमेस ब्राह्मणांना भोजन देऊन गोदान देणारा मनुष्य भगवान विष्णूच्या धामास जातो. हे 'विष्णुव्रत' आहे. जो एका अयनापासून दुसऱ्या अयनापर्यंत पुष्प व तूप सोडतो, व्रताच्या समाप्तीस फुलांचा हार, तूप, तूपमिश्रित खीर यांचे ब्राह्मणास दान देतो तो शिवलोकात जातो. याचे नाव 'शीलव्रत' होय. जो ठराविक काळात प्रतिदिन संध्याकाळी दीपदान करतो, तूप वा तेल सेवन करीत नाही, व्रतसमाप्तीनंतर ब्राह्मणास दीप, चक्र, शूल, सुवर्ण, धोतर-चादर यांचे दान करतो, तो तेजस्वी होतो. अंतानंतर तो रुद्रलोकात जातो. हे 'दीप्तिव्रत' आहे. कार्तिकापासून आरंभ करून प्रत्येक महिन्याच्या तृतीयेस रात्री गोमूत्रात शिजवलेली जवाची लापशी खातो, वर्ष समाप्त झाल्यावर जो गोदान करतो तो एक कल्पपर्यंत गौरीलोकांत निवास करतो. त्यानंतर तो राजा होतो. यास 'रुद्रव्रत' म्हणतात. नेहमीच कल्याण करणारे हे व्रत आहे, चार महिन्यांपर्यंत जो चंदन लावणे सोडून देतो, शेवटी शिंप, चंदन, अक्षत, दोन श्वेत वस्त्रे यांचे दान ब्राह्मणांना देतो तो वरुण लोकात जातो. यालाच 'दृढव्रत' म्हणतात.

सोन्याचे ब्रह्मांड बनवून त्याला तिळाच्या ढिगावर ठेवावे. 'मी अहंकाररूपी तिळाचं दान करतो' असी भावना करून तुपाने अग्नीस व दक्षिणेने ब्राह्मणास तृप्त करावे. माला, वस्त्र, आभूषण यांनी ब्राह्मण-

दंपतीचे पूजन विश्वात्म्याच्या तृप्तीच्या उद्देशानें करावे. शुभदिनी आपल्या शक्तीनुसार तीन तोंळचांहून अधिक सोने व तिलसहित ब्रह्मांड ब्राह्मणास द्यावे. याने मनुष्य पुनर्जन्मरहित अशा ब्रह्मपदास प्राप्त करून घेतो. याला ‘ब्रह्मव्रत’ म्हणतात. मनुष्यास मोक्ष देणारे हे व्रत आहे. तीन दिवस केवळ दूध पिऊन राहावे. आपल्या शक्तीस अनुसरून एक तोळयापेक्षा अधिक सोन्याचा कल्पवृक्ष बनवावा. एक शेर तांदुळासह तो ब्राह्मणास दान करावा. या ‘कल्पवृक्षव्रता’ने ब्रह्मपदाची प्राप्ती होते. जो एक महिना उपवास करून ब्राह्मणास सुंदर गायींचे दान करतो तो भगवान विष्णूंच्या धामास जातो. याचे नाव ‘भीमव्रत.’ जो वीस तोळचांहून अधिक सोन्याची पृथ्वी बनवून दान करतो व दिवसभर दूध पिऊन राहतो तो रुद्रलोकास जातो. याला ‘धनप्रद-व्रत’ म्हणतात. सातशे कल्पपर्यंत हे व्रत फल देते. माघ अथवा चैत्र तृतीयेस गुळाची गाय करून दान करावी. या ‘गुडव्रताने’ मनुष्य गौरीलोकास जातो.

जो पंधरा दिवस उपवास करून ब्राह्मणास दोन कपिला गायी दान करतो तो देव व असुरांनी पूजित अशा ब्रह्मलोकास जातो. एक कल्पानंतर तो सम्राट बनतो. याचे नाव ‘प्रभाव्रत’ आहे. जो एक वर्षापर्यंत केवळ एकाच अन्नाचे भोजन करतो व भक्ष्य पदार्थांच्या बरोबर जलाचा घडा दान करतो तो कल्पपर्यंत शिवलोकात राहतो. याला ‘प्राप्तिव्रत’ असे म्हणतात. जो प्रत्येक अष्टमीच्या रात्री एक वेळ भोजन करतो, वर्ष समाप्त होताच दूध देणाऱ्या गायीचे दान करतो तो इंद्रलोकास जातो. यालाच ‘सुगतिव्रत’ असे नाव आहे. जो वर्षाआदी चार ऋतूंत ब्राह्मणास इंधन देतो व शेवटी तूप व गाय यांचे दान करतो तो परब्रह्मपदास जातो. सर्व पापांचा नाश करणारे हे ‘वैश्वानरव्रत’ आहे.

जो एक वर्षपर्यंत प्रत्येक दिवशी खीर खाऊन राहतो, व्रत समाप्त होताना ब्राह्मणास एक गाय, एक बैल दान देतो तो एक कल्पपर्यंत लक्ष्मीलोकात निवास करतो. याला ‘देवीव्रत’ असे नाव आहे. जो प्रत्येक सप्तमीस एक वेळेस रात्री भोजन करतो, वर्ष समाप्त होताना दूध देणाऱ्या गायीचे दान करतो त्याला सूर्यलोकाची प्राप्ती होते. याला

'भानुव्रत' म्हणतात. जो प्रत्येक चतुर्थीस रात्री एकदाच भोजन करतो व वर्षाच्या शेवटी सोन्याचा हत्ती दान करतो त्याला शिवलोकाची प्राप्ती होते. त्यास 'वैनायकव्रत' म्हणतात. जो चार महिन्यांसाठी मोठमोठ्या फळांचा त्याग करतो, हवन करून जो शेवटी ब्राह्मणास गाय, बैल दान देतो त्याला सूर्यलोकाची प्राप्ती होते. यास 'सूर्यव्रत' असे नाव आहे. जो बारा द्वादशींचा उपवास करतो, आपल्या शक्तीस अनुसरून जो गाय, वस्त्र, सुवर्ण यांनी ब्राह्मणाची पूजा करतो तो परमपदास जातो. यालाच 'विष्णुव्रत' म्हणतात. जो प्रत्येक चतुर्दशीस रात्री एकदाच भोजन करतो, वर्षसमाप्तीस जो एक गाय व एक बैल दान करतो, त्यास रुद्रलोकाची प्राप्ती होते. यालाच 'त्र्यंबकव्रत' म्हणतात. जो सात रात्र उपवास करून ब्राह्मणास तुपाने भरलेला घडा दान करतो त्याला ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. यालाच 'वरव्रत' असे नाव आहे.

जो काशीस जाऊन दूध देणाऱ्या गायीचे दान करतो तो एक कल्पपर्यंत इंद्रलोकास निवास करतो. हे झाले 'मित्रव्रत.' जो एक वर्षपर्यंत तांबूल सोडतो, शेवटी गोदान देतो, तो वरुणलोकास जातो. हे 'वारुणव्रत' झाले. चांद्रायण करून, सोन्याचा चंद्र करून जो दान देतो त्याला चंद्रलोकाची प्राप्ती होते. याला 'चंद्रव्रत' म्हणतात. जो ज्येष्ठमासात पंचाग्निव्रत करून अष्टमी वा चतुर्दशीस सुवर्णाची गाय दान देतो, तो स्वर्गास जातो. हे 'रुद्रव्रत' झाले. जो प्रत्येक तृतीयेस शिवमंदिरात जाऊन एकदा हात जोडतो, वर्ष पूर्ण होताच दूध देणाऱ्या गायीचे दान करतो त्याला देवीलोकाची प्राप्ती होते. याला 'भवानीव्रत' असे नाव आहे. जो माघ महिन्यात ओले वस्त्र नेसून सप्तमीस गोदान करतो तो कल्पपर्यंत स्वर्गात निवास करतो. शेवटी या पृथ्वीवर राजा होतो. याला 'तापकव्रत' म्हणतात. तीन रात्र उपवास करून फाल्गुनी पूर्णिमेस जो घराचे दान करतो त्याला आदित्यलोकाची प्राप्ती होते. याला 'धामव्रत' म्हणतात.

जो व्रतस्थ राहून तीन संधींत, म्हणजे प्रातःकाळी, दुपारी व सायंकाळी भूषणांसहित ब्राह्मणदंपतीची पूजा करतो त्याला मोक्ष मिळतो. याला 'मोक्षव्रत' म्हणतात. शुक्लपक्षातील द्वितीयेस जो

ब्राह्मणास मिठाने भरलेले पात्र, वस्त्राने झाकलेले काशाचे भांडे व दक्षिणा देतो, व्रत समाप्त झाल्यावर गोदान देतो, तो भगवान शिवांच्या लोकात जातो. एक कल्पानंतर तो राजांचा राजा होतो. याला 'सोम-व्रत' असे नाव आहे. जो प्रत्येक प्रतिप्रदेस एकाच अन्नाचे सेवन करतो व वर्षाच्या नंतर कमळाचे दान करतो तो वैश्वानरलोकात जातो, याला 'अग्निव्रत' असे नाव आहे. जो प्रत्येक दशमीला एकाच अन्नाचे भोजन करून वर्ष समाप्त झाले की, दहा गायींचे व सुवर्णाच्या पात्रांचे दान करतो तो ब्रह्मांडाचा स्वामी होतो. याला 'विश्वव्रत' असे नाव आहे. जो स्वतः कन्यादान करतो, दुसऱ्यांच्याही कन्यांचे विवाह करतो, तो आपल्या एकवीस पिढ्यांसह ब्रह्मलोकात जातो. कन्यादानाखेरीज दुसरे मोठे दान नाही. विशेषतः पुष्करला, कार्तिकी पूर्णिमेस जो कन्यादान करतो, त्याचा स्वर्गात अक्षय निवास असतो. ज्या मनुष्याने जलात उभे राहून विशेष धान्याचा बनविलेल्या हत्तीस रत्नांनी विभूषित करून ब्राह्मणास दान दिलेला असतो त्यास इंद्रलोकाची प्राप्ती होते. जो या व्रतांचे भक्तिपूर्वक श्रवण-मनन करील तो मन्वंतरांपर्यंत गंधर्वांचा स्वामी होईल.

स्नानाशिवाय शरीर निर्मल होत नाही, की मनाची शुद्धी होत नाही. म्हणून मनाच्या शुद्धीसाठी प्रथम स्नानाची जरूरी आहे. नदीचे स्नान सर्वांत चांगले. 'ॐ नमो नारायणाय' या मूलमंत्राच्या द्वारे तीर्थाची कल्पना करावी. हातात कुश घेऊन विधिपूर्वक आचमन करावे. मन व इंद्रिये यांचा संयम करून आतून, बाहेरून पवित्र व्हावे. त्यानंतर चार हातांचे चौकोनी मंडल करून त्यामध्ये मंत्र लिहून भगवती गंगेस आवाहन करावे. तो मंत्र असा :

विष्णुपादप्रसूतासि वैष्णवी विष्णुदेवता ।
पाहि नस्त्वेनसस्तस्मादाजन्म मरणान्तिकात् ।।
त्रिसः कोटयोऽर्द्धकोटी च तीर्थानां वायुरब्रवीत् ।
दिवि भूम्यन्तरिक्षे च तानि ते सन्ति जान्हवि ।।
नन्दिनीत्येव ते नाम देवेषु नलिनीति च ।
दक्षा पृथ्वी च सुभगा विश्वकाया शिवामृता ।।

विद्याधरी महादेवी तथा लोकप्रसादिनी ।
क्षेमा च जान्हवी चैव शान्ता शान्तिप्रदायिनी ।।

'गंगे, तू भगवान विष्णूंच्या चरणांतून प्रकट झाली आहेस. श्रीविष्णू हाच तुझा देव आहे. यासाठी तुला वैष्णवी म्हणतात. देवी, तू जन्मापासून मृत्यूपर्यंत माझ्याकडून झालेल्या सर्व पापांपासून माझं रक्षण कर. स्वर्ग, पृथ्वी, अंतरिक्ष यांत एकूण साडेतीन कोटी तीर्थे आहेत. असे वायुदेवाचे सांगणे आहे. माते जान्हवी, ही सर्व तीर्थे तुझ्यातच सामावलेली आहेत. देवलोकात तुझं नाव नंदिनी आहे, नलिनी आहे. याशिवाय दक्षा, पृथ्वी, सुभगा, विश्वकाया, शिवा, अमृता, विद्याधरी, महादेवी, लोकप्रसादिनी, क्षेमा, जान्हवी, शांता, शांतिप्रदायिनी अशी अनेक नावे तुला आहेत.' स्नान करताना या सर्व नामांचे संकीर्तन जेथे होते तेथे भगवती गंगा त्रिपथगामिनी उपस्थित असते.

सात वेळा वरील नामांचा उच्चार करून हाताच्या संपुटात जल घ्यावे. तीन, चार, पाच वा सात वेळा ते मस्तकावर शिंपडावे. विधिपूर्वक मृत्तिकेस अभिमंत्रित करून आपल्या ती अंगास लावावी. अभिमंत्रित करण्याचा मंत्र असा आहे;

अश्वक्रान्ते रथक्रान्ते विष्णुक्रान्ते वसुन्धरे ।
मृत्तिके हर मे पापं यन्मया दुष्कृतं कृतम् ।।
उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना ।
नमस्ते सर्वलोकानां प्रभवारणि सुव्रते ।।

'वसुंधरे, तुझ्यावरून अश्व व रथ चालतात. भगवान विष्णूंनीही वामनरूपाने एका पावलात तुला मापले. मृत्तिके, मी जी वाईट कर्मे केली असतील त्या सर्व पापांची तू मला क्षमा करावीस. देवी, भगवान विष्णूंनी शेकडो भुजांचे वराहरूप धारण करून तुला जलातून बाहेर काढले. तू सर्व लोकांची उत्पत्ती करणाऱ्या अरणीच्या समान आहेस. सुव्रते, तुला माझा नमस्कार असो.'

या मंत्राने युक्त अशी मृत्तिका अंगास लावावी. पुन्हा स्नान करावे. पुन्हा विधिवत आचमन करून शुभ्र धोतर नेसावे. त्रिलोकीस तृप्त करण्यासाठी तर्पण करावे. सर्वप्रथम ब्रह्मा, विष्णू, रुद्र व प्रजापती

यांना तर्पण करावे. त्यानंतर देव, यक्ष, नाग, गंधर्व, श्रेष्ठ अप्सरा, क्रूर सर्प, गरुडपक्षी, वृक्ष, जंभकादी असुर, विद्याधर, मेघ, आकाशचारी जीव, निराधार जीव, पापी जीव, धर्मपरायण जीव यांना तृप्त करण्यासाठी सर्वांना जलांजली द्यावी. देवांना जल देताना यज्ञोपवीत डाव्या खांद्यावर असावे. त्यानंतर ते गळ्यात असावे व माळेसारखे ते करून मनुष्य, ऋषिजन, ऋषिपुत्र यांना भक्तिपूर्वक तर्पण करावे. ‘सनक, सनंदन, सनातन, कपिल, आसुरी, वोढु, पंचशिख हे सर्व माझ्या जलानं सदा तृप्त व्हावेत अशा भावनेने जल द्यावे.’ याच प्रकारे मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, प्रचेता, वसिष्ठ, भृगू, नारद असे सर्व देवर्षी व ब्रह्मर्षी यांना अक्षतांसह तर्पण करावे.

त्यानंतर यज्ञोपवीत उजव्या खांद्यावर घेऊन अग्निष्वात्त, सौम्य, हविष्मान्, ऊष्मप, सुकाली, बर्हिषद् व आज्यप नावाच्या पितरांना तिळ व चंदनयुक्त जलाने भक्तिपूर्वक तर्पण करावे. याच प्रकारे हातात कुश घेऊन पवित्र भावनेने परलोकवासी पिता, पितामह, मातामह आदींचे नामगोत्र उच्चारून त्यांना तर्पण करावे. असे तर्पण करताना पुढील मंत्राचा उच्चार करावा.

येऽबान्धवा बान्धवा ये येऽन्यजन्मनि बांधवा: ।<br>
ते तृप्तिमखिला यान्तु येऽप्यस्मत्तोयकांक्षिण: ।।

‘जे लोक माझे बांधव नाहीत, जे माझे बांधव आहेत, जे दुसऱ्या कुठल्या तरी जन्मात माझे बांधव आहेत, ते या माझ्या जलानं तृप्त होवोत. त्यांच्याशिवाय जे कोणी दुसरेही प्राणी माझ्या जलाची अपेक्षा करतील त्यांनाही तृप्ती लाभो.’ असे म्हणून पाणी सोडावे. त्यानंतर विधिपूर्वक आचमन करावे. पुष्पे व अक्षता यांनी कमलाची आकृती बनवावी. यत्नपूर्वक सूर्यदेवांच्या नामांचा उच्चार करून अक्षत, पुष्पे, रक्तचंदनमिश्रित जलाने अर्घ्य द्यावा. अर्घ्यदानाचा मंत्र असा आहे;

नमस्ते विश्वरूपाय नमस्ते ब्रह्मरूपिणे ।<br>
सहस्त्ररश्मये नित्यं नमस्ते सर्वतेजसे ।।<br>
नमस्ते रुद्रवपुषे नमस्ते भक्तवत्सल ।<br>
पद्नाभ नमस्तेऽस्तु कुण्डलांगदभूषित ।

नमस्ते सर्वलोकेषु सुप्तांस्तान् प्रतिबुध्यसे ।
सुकृतं दुष्कृतं चैव सर्वं पश्यसि सर्वदा ।।
सत्यदेव नमस्तेऽस्तु प्रसीद मम भास्कर ।
दिवाकतर नमस्तेऽस्तु प्रभाकर नमोऽस्तुते ।।

'भगवान सूर्य, आपण विश्वरूप आहात. ब्रह्मस्वरूप आहात. या दोन्ही रूपांना नमस्कार असो. आपण सहस्रकिरणांनी सुशोभित आहात. तेजरूप आहात. आपणांस सदा नमस्कार असो. भक्तवत्सला, आपण रुद्ररूपधारी आहात, परमेश्वर आहात, आपणांस नमस्कार असो. कुंडल व अंगद आदी विभूषणांनी आभूषित असलेल्या पद्मनाभा, आपणांस नमस्कार असो. भगवन्, आपण सर्व झोपलेल्या जगतास जागे करता. आपणांस माझा प्रणाम असो. आपण सर्वांच्या पाप-पुण्यांकडे पाहात असता. सत्यदेवा, आपणांस नमस्कार असो. भास्कर, माझ्यावर आपण प्रसन्न व्हावे. दिवाकरा, आपणांस नमस्कार असो. प्रभाकरा, आपणांस नमस्कार असो.'

याप्रमाणे सूर्यास नमस्कार करून त्याला तीन प्रदक्षिणा घालाव्यात. त्यानंतर द्विज, गाय, सुवर्ण यांना स्पर्श करून घरी जावे व देवांची पूजा करावी. ब्राह्मणांचे भोजन झाले की नंतर स्वतः भोजन उरकावे. या प्रकाराने नित्याचे विधिक्रम करून सिद्धी प्राप्त करून घ्यावी. या संदर्भात पुलस्त्यमुनींनी धर्ममूर्ती नावाच्या एका राजाची कथा सांगितली.

बृहत् नावाच्या कल्पात धर्ममूर्ती नावाचा एक राजा होता. त्याची इंद्राबरोबर मैत्री होती. त्याने हजारो दैत्यांचा वध केला होता. सूर्य व चंद्रही त्याच्या तेजापुढे प्रभाहीन बनले. इच्छेस येईल ते रूप तो धारण करायचा. त्याच्या पत्नीचे नाव भानुमती होते. त्रिभुवनांत ती सुंदर होती. तीच राजाची पट्टराणी होती. एकदा राजाने विस्मयमुग्ध होऊन राजसभेत मुनिश्रेष्ठ वसिष्ठांना विचारले,

'भगवन्, कोणत्या धर्माच्या प्रभावानं मला ही सर्वोत्तम लक्ष्मी प्राप्त झाली? माझ्या शरीरात हे उत्तम व विपुल तेज भरलं आहे, त्याचं कारण काय?'

'राजा, प्राचीन कालात लीलावती नावाची एक वेश्या होती. ती नेहमी भगवान शंकरांचं भजन करायची. एकदा तिनं पुष्करात चतुर्दशीस मिठाचा पहाड बनवून सुवर्णाच्या देवप्रतिमेबरोबर त्याचं विधिपूर्वक दान केलं. शुद्ध नावाचा एक सोनार लीलावतीच्या घरी नोकर होता. त्यानंच मोठ्या श्रद्धेनं मुख्यमुख्य देवांच्या मूर्ती सुवर्णाच्या बनविल्या होत्या. धर्माचं काम समजून त्यानं या मूर्तींची मजुरी घेतली नाही. मिठाच्या पहाडावर जो सोन्याचा वृक्ष होता त्याला सोनाराच्या पत्नीनं तेजस्वी बनविलं. सोनार व त्याची पत्नी यांनी ब्राह्मणांचीही सेवा केली. दीर्घ कालानं ती वेश्या लीलावती सर्वपापांतून मुक्त होऊन शिव लोकास गेली. तो सोनार दरिद्री असला तरी अत्यंत सात्त्विक होता. तो मजुरी न घेणारा सोनार म्हणजे राजा, तू आहेस. त्याच पुण्य-प्रभावानं तू सात द्वीपांचा स्वामी झालास. हजारो सूर्यांप्रमाणे तेजस्वी झालास. सोनाराची पत्नीच आज तुझी महाराणी भानुमती आहे.'

वसिष्ठांच्या सांगण्यानुसार राजा धर्ममूर्तीने धान्य आदींचा पर्वत बनवून तो दान दिला. त्यानंतर तोही महादेवांच्या परमधामास गेला.

## भीमद्वादशीच्या व्रताचे विधान

प्राचीन काळातील रथन्तर कल्पातील हकीगत आहे. पिनाक-धारी भगवान शंकर मंदराचलावर विराजमान झाले होते. ब्रह्मदेव स्वतः त्यांच्याजवळ जाऊन म्हणाले, 'परमेश्वरा, थोडीशी तपस्या करून मनुष्यास मोक्षाची प्राप्ती कशी होते ?' या प्रश्नाचे उत्तर देताना भगवान शिवांनी भीमद्वादशीच्या व्रताचे विस्ताराने वर्णन केले.

एकदा द्वारकेच्या राजसभेत अमिततेजस्वी भगवान श्रीकृष्ण वृष्णिवंशी पुरुष, विद्वान, कौरव, देवगंधर्व यांच्यासह बसले होते. धर्म-संबंधी पौराणिक कथांची चर्चा होत होती. या वेळीं भीमसेनानें भगवानांच्या परमपदाच्या प्राप्तीसंबंधी प्रश्न उपस्थित केला. त्याच्या प्रश्नास श्रीकृष्णांनी उत्तर दिले. त्यांनी एक पापविनाशनी तिथीचा परिचय करून दिला. ज्या दिवशी माघ मासाची दशमी तिथी असेल त्या दिवशी सर्व शरीरास तूप लावून तिलमिश्रित जलाने स्नान करून

'ॐ नमो नारायणाय' या मंत्राने भगवान विष्णूंचे पूजन करावे. 'कृष्णाय नमः' म्हणून दोन चरणांची, 'सर्वात्मने नमः' म्हणून मस्तकाची पूजा करावी. 'वैकुण्ठाय नमः' म्हणून कंठाची, 'श्रीवत्सधारिणे नमः' म्हणून हृदयाची पूजा करावी. 'शंखिने नमः', 'चक्रिणे नमः', 'गदिने नमः', 'वरदाय नमः', 'सर्वं नारायणाय' अशा क्रमाने भगवानांची पूजा करावी. त्यानंतर 'दामोदराय नमः', म्हणून उदराचे, 'पंचजनाय नमः' म्हणून कंबरेचे, 'सौभाग्यनाथाय नमः' म्हणून दोनही मांडयांचे, 'भूतधारिणे नमः' म्हणून दोन गुढघ्यांचे, 'नीलाय नमः' म्हणून पिंडऱ्यांचे, 'विश्वसृजे नमः' म्हणून चरणांचे पूजन करावे.

त्यानंतर 'दैव्यै नमः,' 'शान्त्यै नमः,' 'लक्ष्मै नमः,' 'श्रियै नमः,' 'तुष्ट्यै नमः', 'पुष्ट्यै नमः', 'व्युष्ट्यै नमः', या मंत्रांनी भगवती लक्ष्मीची पूजा करावी. त्यानंतर 'वायुवेगाय नमः', 'पक्षिणे नमः', 'विषप्रमथयनाय नमः', 'विहंगनाथाय नमः' या मंत्रांनी गरुडाची पूजा करावी. गंध, धूप, पुष्प, नाना प्रकारची पक्वाने यांनी कृष्णांची, महादेवांची, गणेशांचीही पूजा करावी. त्यानंतर गायीच्या दुधाची बनवलेली खीर घेऊन तुपासह मौनपूर्वक भोजन करावे. भोजन झाल्यावर वडाच्या अथवा खैराच्या काडयांनी दात साफ करावेत. तोंड धुऊन आचमन करावे. सूर्यास्त झाल्यावर उत्तराभिमुख बसून सायंकाळची संध्या करावी. त्यानंतर 'नमो नारायणायेति त्वामहं शरणं गतः भगवान नारायणांना मी शरण आलो आहे.' अशा मंत्राचा उच्चार करून निद्रा करावी.

दुसऱ्या दिवशी एकादशीस निराहार राहून भगवान केशवांची पूजा करावी. रात्रभर जागून शेषशायी भगवानांची आराधना करावी. अग्नीस तुपाची आहुती देऊन म्हणावे, 'पुंडरीकाक्षा, मी द्वादशीस श्रेष्ठ ब्राह्मणाबरोबर खिरीचं भोजन करीन. माझं हे व्रत निर्विघ्नपणानं पूर्ण व्हावं.' इतिहास, पुराणांचे श्रवण करावे. सकाळ होताच नदीकडे जाऊन प्रसन्नतेने स्नान करावे. नास्तिकांचा संसर्ग नसावा. विधिपूर्वक संध्योपासन करून पितरांना तर्पण करावे. शेषशायी भगवानांना नमस्कार करून घराच्या समोर भक्तिपूर्वक असा एक मंडप तयार करावा. आत चार सुंदर वेदी निर्माण कराव्यात. वेदींच्या वर दहा हातांचे तोरण बांधावे.

सुदृढ खांबावर उडिदांच्या दाण्यांवर एक कलश बसवावा. त्यानंतर कलश पाण्याने भरावा व तेथे मृगचर्म टाकून वसावे. कलशातून गळणारी धारा सारी रात्र आपल्या मस्तकावर धारण करावी. दक्षिण दिशेस अर्धचंद्राच्या समान, पश्चिमेस गोल, उत्तरेस पिंपळाच्या पानांसारखे एक मंडल बनवावे.

वैष्णव द्विजाने मध्ये कमलाच्या आकाराचे मंडल बनवावे. पूर्वेस असणाऱ्या एका वेदीच्या दक्षिणेसही एक वेदी तयार करावी. भगवान श्रीविष्णूंच्या ध्यानात तत्पर होऊन पूर्वोक्त जलधारेस बरोबर मस्तकावर धारण करावे. दुसऱ्या वेदीवर कर्णिकेसह कमलाची आकृती बनवून त्यामध्ये भगवान पुरुषोत्तमांना बसवावे. त्यांच्या निमित्ताने एक कुंड तयार करावे. हातभर लांब, तितकेच रुंद, तितकेच खोल असावे. त्याच्या वरील किनाऱ्यावर तीन मेखला लावाव्यात. त्यात यथास्थान योनी व मुख यांची चिन्हे बनवावीत. त्यानंतर ब्राह्मणाने जव, तूप, तिल यांनी विष्णुमंत्राच्या साह्याने हवन करावे. अशा प्रकारे वैष्णवयाग करावा. कुंडाच्या मध्यभागी तुपाची धार सोडावी. देवाधिदेव भगवानांच्या मूर्तीवर दुधाची धार सोडावी. आपल्या मस्तकावर पूर्वोक्त जलधारेस धारण करावे. या तीन धारा रात्रभर चालू राहाव्यात. जलांनी भरलेले तेरा कलश त्यानंतर स्थापन करावेत. नाना प्रकारच्या भक्ष्य पदार्थांनी, श्वेत वस्त्रांनी ते अलंकृत असावेत. चार ऋग्वेदी ब्राह्मणांनी उत्तरेस मुख करून हवन करावे. चार यजुर्वेदी ब्राह्मणांनी रुद्राचा पाठ करावा. चार सामवेदी ब्राह्मणांनी सामाचे गायन करावे. ब्राह्मणांना वस्त्र, पुष्प, चंदन, अंगठी, कडे, सोन्याचा जंजीर, वस्त्र, शय्या इत्यादींचे दान देऊन त्यांचा सत्कार करावा.

याप्रकारे गीत, पूजन, नामस्मरण यांत रात्र व्यतीत करावी. उपाध्यायास सर्व वस्तू दुपटींनी अर्पण कराव्यात. सकाळी उठल्याबरोबर तेरा गायींचे दान करावे. त्यावेळी सर्व सामग्री सोन्याची असावी. सर्व दूध देणाऱ्या व सुशील गायी असाव्यात. त्यांची शिंगे सोन्याने, खूर चांदीने मढविलेले असावेत. त्यांच्याबरोबर काशाचे दोहनपात्र द्यावे. गोदानानंतर ब्राह्मणांना भक्तिपूर्वक भक्ष्यभोज्य पदार्थांनी समृद्ध करावे.

वस्त्रदान करावे. आपण स्वतःही लवणरहित असा आहार घेऊन भोजन करावे. ब्राह्मणांना निरोप द्यावा. पुत्र व स्त्री यांना बरोबर घेऊन आठ पावले चालावीत. त्यांच्या मागे जाऊन प्रार्थना करावी, ' आमच्या या कार्यानं देवांचा स्वामी, सर्वांचे क्लेश दूर करणारे भगवान विष्णू आम्हांवर प्रसन्न व्हावेत. शिवाच्या हृदयात श्रीविष्णू, विष्णूच्या हृदयात श्रीशिव विराजमान आहे. या दोघांत अंतर नाही. या धारणेनं माझं कल्याण व्हावं.'

शिवस्य हृदये विष्णुर्विष्णोश्च हृदयें शिवः ।
यथान्तरं न पश्यामि यथा मे स्वस्ति चायुषः ।।

इतकी प्रार्थना करून ते कलश, त्या गायी, ती शय्या, ती वस्त्रे, या सर्व वस्तू त्या ब्राह्मणाच्या घरी पोचवाव्यात. हा दिवस पुराण व इतिहास यांच्या श्रवणात घालवावा. श्रीकृष्ण भीमसेनास म्हणाले, ' भीम, मात्सर्याचा त्याग करून तू सत्त्वगुणांचा आश्रय घ्यावास. या व्रताचं अनुष्ठान करावंस. हे गुप्त असले तरी मी तुला सांगितलं आहे. वीर पुरुषा, तुझ्याकडून या व्रताचं आचरण होणार असल्यानं हे व्रत तुझ्याच नावानं प्रसिद्ध होईल. लोक याला ' भीमद्वादशीव्रत ' याच नावानं ओळखतील. हे व्रत सर्व पापांचा नाश करणारे आहे. प्राचीन कल्पात यास ' कल्याणिनी या नावानं ओळखलं जाई. याचं स्मरण व कीर्तन केल्यानं देवराज इंद्राचं पाप नष्ट झालं. याच्याच अनुष्ठानानं माझी प्रिया, सत्यभामानं मला पतिरूपानं प्राप्त करून घेतलं. याच कल्याण-मयी तिथीस सूर्यदेवानं सहस्रधारांनी स्नान केल्यानं त्याला तेजोमय शरीराची प्राप्ती झाली. इंद्रादी देव व अनेक दैत्य यांनीही या व्रताचं अनुष्ठान केलं होतं. एका मुखात दहा हजार कोटी (एक खर्व) जिभा असतील तरी याचं वर्णन होऊ शकणार नाही.'

### आदित्यशयन, रोहिणीचंद्रशयन, वृक्षारोपणविधी, सौभाग्यशयन

भीष्मांनी एकदा पुलस्त्यमुनींना विचारले,

' ब्रह्मन्, ज्याला अभ्यास होत नाही, जो रोगवश असल्यानं उप-

वास करू शकत नाही, अशाला कोणतं व्रत उत्तम फलदायी होईल ?' या प्रश्नाचे उत्तर विस्ताराने पुलस्त्यांनी दिले. त्याला दिवसभर उपवास व रात्री भोजन अशा एका महान व्रताचा परिचय पुलस्त्यांनी करून दिला. या व्रताचे नाव आहे आदित्यशयन. यात विधिपूर्वक भगवान शंकरांची पूजा करावी लागते. सप्तमी तिथी, नक्षत्र हस्त, वार रविवार, सूर्याची संक्रान्त असावी. ही तिथी सर्व कामना पूर्ण करणारी आहे. या दिवशी सूर्याच्या नामांनी भगवती पार्वती व महादेव यांची पूजा करावी. सूर्यदेवांची प्रतिमा व शिवलिंग यांची भक्तिपूर्वक पूजा करावी.

हस्त नक्षत्रात 'सूर्याय नमः'चे उच्चारण करावे व सूर्याच्या चरणांची पूजा करावी. चित्रा नक्षत्रात 'अर्काय नमः' म्हणून घोटयांची, स्वाती नक्षत्रात 'पुरुषोत्तमाय नमः' म्हणून पिंढऱ्यांची, विशाखात 'धात्रे नमः' म्हणून गुडघ्यांचो, अनुराधात 'सहस्रभानवे नमः' म्हणून दोनही मांड्यांची पूजा करावी. ज्येष्ठा नक्षत्रात 'अनंगाय नमः' म्हणून गुह्य प्रदेशाची, मूळ नक्षत्रात, 'इंद्राय नमः' व 'भीमाय नमः' म्हणून कटिभागाची, पूर्वाषाढात 'त्वष्ट्रे नमः' व 'सप्ततुरंगमाय नमः' म्हणून नाभीची, श्रवणात 'तीक्ष्णांशवे नमः' म्हणून उदराची, धनिष्ठात 'वितर्काय नमः' म्हणून दोनही बगलांची, शतभिषा नक्षत्रात 'ध्वान्तविनाशनाय नमः' म्हणून सूर्याच्या वक्षःस्थलाची पूजा करावी. पूर्वा व उत्तरा भाद्रपदांत 'चण्डकराय नमः' म्हणून दोन भुजांची, रेवतीत 'साम्नामधीशाय नमः' म्हणून दोनही हातांची, अश्विनीत 'सप्ताश्वधुरन्धराय नमः' म्हणून नखांची व भरणीत 'दिवाकराय नमः' म्हणून सूर्याच्या कंठाची पूजा करावी. कृत्तिकात ग्रीवेची, रोहिणीत ओठांची, मृगशिरात जिव्हेची, आर्द्रात 'हरये नमः' म्हणून दातांची अर्चना करावी.

पुनर्वसूत 'सवित्रे नमः' म्हणून शंकराच्या नासिकेची, पुष्यात 'अम्भोरुहवल्लभाय नमः' म्हणून ललाटाची, 'वेदशरीरधारिणे नमः' म्हणून केसांची, आश्लेषात 'विबुधप्रियाय नमः' म्हणून मस्तकाची, मघात दोनही कानांची, पूर्वा फाल्गुनीत 'गोब्राह्मणनंदनाय नमः' म्हणून शंभूच्या सर्व अंगांची पूजा करावी. उत्तरा फाल्गुनी नक्षत्रात 'विश्वेश्वराय नमः' म्हणून दोन भुवयांची पूजा करावी. पाश, अंकुश, कमल,

त्रिशूल, कपाल, सर्प, चंद्रमा, धनुष्य धारण करणाऱ्या महादेवांना नमस्कार असो. गयासुर, कामदेव, त्रिपुर, अंधकासुर आदींचा नाश करणाऱ्या शिवास नमस्कार असो.

पाशाङ्कुशपद्मशूलकपालसर्पेन्दुधनुर्धराय नमः ।
गयासुरानङ्गपुरान्धकादिविनाशमूलाय नमः शिवाय ।।

इत्यादी वाक्ये उच्चारून प्रत्येक अंगाची पूजा केल्यावर 'विश्वेश्वराय नमः' म्हणून भगवान शिवांच्या मस्तकाचे पूजन करावे. त्यानंतर भोजन करावे. भोजनात तेल, मीठ यांचा संपर्क नसावा. मांस व उष्टे अन्न यांना कधीच स्पर्श करू नये.

या प्रकारे रात्री शुद्ध भोजन करून पुनर्वसू नक्षत्र असताना दान करावे. एखाद्या भांड्यात तांदूळ, तूप इत्यादी घेऊन सुवर्णासह ब्राह्मणास दान करावे. सातव्या दिवशी एक वस्त्रजोडी अधिक दान करावी चौदाव्या दिवशी गूळ, खीर, तूप आदींनी ब्राह्मणास भक्तीने जेवायला घालावे. त्यानंतर कर्णिकेसह सोन्याने अष्टदल कमल तयार करून त्यात पद्मरागमणी, नीलमणीची पाने आहेत असे पाहावे. सुंदर शय्या तयार करावी. तीवर सुंदर बिछाना, तक्क्या, वरून चांदवा, पंखा, आसपास खडावा, पादत्राणे, छत्री, चवरी, आसन, दर्पण इत्यादी साहित्य तयार ठेवावे. वस्त्र, फल, चंदन, आभूषणे यांनी शय्या सुशोभित असावी. सुवर्णाचे कमल त्या शय्येवर ठेवावे. यानंतर मंत्रोच्चार करून दूध देणारी व अत्यंत साधी कपिला गाय दान करावी. ही गाय उत्तम गुणांनी युक्त, वस्त्रांनी,भूषणांनी सुशोभित व वत्सासह असावी. तिचे खूर चांदीचे व शिंगे सुवर्णाने मढविलेली असावीत. शय्या दान करून म्हणावे, 'सूर्यदेवा, ज्याप्रमाणे आपली शय्या कांती, धृती, श्री, पुष्टी यांनी कधी सुनी होत नाही तशीच माझी अभिवृद्धी व्हावी. वेदांचे ज्ञाते आपणांशिवाय कुणासच निष्पाप मानीत नाहीत. म्हणून आपण या दुःखपूर्ण संसारसागरापासून माझा उद्धार करावा.' भगवानांना प्रदक्षिणा करावी. त्यांना प्रणाम करावा. शय्या, गाय आदी ब्राह्मणाच्या घरी पोचते करावे.

भगवान शंकरांच्या या व्रताचे उच्चारण दुराचारी व दांभिक पुरुषाच्या समोर कधी करू नये. जो गाय, ब्राह्मण, देव, अतिथी, धार्मिक

यांची निंदा करतो त्याच्या पुढे हे व्रत प्रकट करू नय. भगवानांचा भक्त, जितेन्द्रिय जो कोणी असेल त्यालाच हे आनंददायी व कल्याण-मय गूढ रहस्य सांगावे. या व्रताने महापातकांचाही नाश होतो. जो पुरुष या व्रताचे अनुष्ठान करील त्याचा बंधू, पुत्र, धन, स्त्री यांच्याशी कधी वियोग होणार नाही. जी स्त्री या व्रताचे पालन करील तिला कधी रोग, दुःख, मोह यांचा त्रास होणार नाही. प्राचीन काळी महर्षी वसिष्ठ, अर्जुन, कुबेर, इंद्र यांनी या व्रताचे आचरण केले होते. या व्रताने सर्व पापे नष्ट होतात. या आदित्यशयनव्रताचा पाठ केला वा श्रवण केला तरी तो इंद्राचा प्रियतम होतो.

यानंतर भीष्मांसाठी पुलस्त्यांनी चंद्राच्या व्रताचा निर्देश केला. हे गोपनीय व्रत केल्याने अक्षय स्वर्गाची प्राप्ती होते. या व्रतास रोहिणी-चंद्र-शयन असेही नाव आहे. या व्रतात चंद्राच्या नामांनी भगवान नारायणांची प्रतिमा पूजावी. जर कधी सोमवारी पूर्णिमा आली अथवा पूर्णिमेस रोहिणी नक्षत्र असेल तर त्या दिवशी सकाळी पंचगव्य व सरस-युक्त जलाने स्नान करावे. 'आप्यायस्व...' इत्यादी मंत्राचा आठशे वेळा जप जपावा. या व्रताने शूद्रही भक्तिपूर्वक रीतीने पापमुक्त होतो. 'सोमाय नमः', 'वरदाय नमः', 'विष्णवे नमः' या मंत्रांचा जप करून फुले आदींनी भगवान मधुसूदनांची पूजा करावी. बरोबरच चंद्राच्या नामांचे उच्चारण करावे. 'सोमाय शांताय नमः' म्हणून भगवानांच्या चरणांचे पूजन करावे. 'अनन्तधाम्ने नमः' म्हणून त्याचे गुडघे व पिंढऱ्या यांची पूजा करावी. 'जलोदराय नमः' म्हणून दोन मांड्यांची, 'कामसुखप्रदाय नमः' म्हणून चंद्रस्वरूप भगवानांच्या कटिभागाची, 'अमृतोदरायनमः' म्हणून त्याच्या उदराची, 'शशांकाय नमः' म्हणून नाभीची, 'चंद्राय नमः' म्हणून मुखमंडलाची, 'द्विजानामधिपाय नमः' म्हणून दाताची, 'चंद्रमसे नमः' ने मुखाची, 'कौमोदवनप्रियाय नमः' म्हणून चंद्राच्या ओठांची, 'वनौषधीनामधिनाथाय नमः' ने नासिकेची, 'आनंदवीजाय नमः' म्हणून दोन भुवयांची, 'इन्दीवरव्यासकराय नमः' म्हणून भगवानांच्या कमलसदृश नेत्रांची, 'समस्ता सुरवन्दिताय दैत्यनिषूदनाय नमः' म्हणून दोन कानांची, 'उदराधिप्रियाय नमः'ने

चंद्राच्या ललाटाची, 'सुषुम्नाधिपतये नमः' म्हणून केसांची, 'शशांकाय नमः'ने मस्तकाची व 'विश्वेश्वराय नमः' म्हणून भगवान मुरारीच्या किरीटाची पूजा करावी. त्यानंतर 'रोहिणीनामधेयलक्ष्मीसौभाग्यसौख्यामृतसागराय पद्मश्रिये नमः'– रोहिणी नाम धारण करणाऱ्या लक्ष्मीच्या सौभाग्य व सुखरूप अमृताच्या समुद्रास, कमलाप्रमाणे कांती असणाऱ्या भगवानांस नमस्कार असो. या मंत्राने भगवानांच्या पुढे नमस्कार करावा. त्यानंतर सुगंधित पुष्प, नैवेद्य, धूप आदी द्वारे इंदुपत्नी रोहिणी देवीचेही पूजन करावे.

यानंतर रात्री भूमीवर शयन करून सकाळी उठावे व स्नान केल्यानंतर 'पापविनाशाय नमः'चे उच्चारण करून ब्राह्मणास तूप व सुवर्णासहित जल भरून कलशाचे दान करावे. दिवसभर उपवास करून, गोमूत्र पिऊन मांसवर्जित, मिठाविना अन्नाचे एकतीस घास करून भोजन करावे. त्यानंतर दोन तास इतिहास, पुराण आदींचे श्रवण करावे. चंद्रमाची कदंब, नीलकमल, केवडा, जातीपुष्प, कमल, शतपत्रिका, सिन्दुवार, चमेली, इतर श्वेत पुष्पे, करवीर व चंपा या फुलांनी पूजा करावी. या फुलांच्या जातींमधील एक एक फूल श्रावण आदी महिन्यांत क्रमशः अर्पण करावे. या व्रताचे एक वर्षभर अनुष्ठान करून समाप्तीस शयनोपयोगी सामग्रीचे दान करावे. रोहिणी व चंद्र यांच्या सुवर्णमूर्ती करून त्यांची दुग्धपूर्ण कलशावर स्थापना करावी. ब्राह्मण दंपतीस रोहिणीचंद्रासमान मानून त्यांना शय्या, प्रतिमा, धेनू यांचे दान करावे. हे व्रत रूप व आरोग्य देणारे असून जो याचे आचरण करील तो त्रिभुवनाचा अधिपती होईल. एकवीस कल्पपर्यंत तो चंद्रलोकात निवास करील.

त्यानंतर भीष्मांनी पुलस्त्यांना तलाव, उद्यान, विहिरी, पुष्करणी, देवमंदिरे यांच्या निर्मितीसंबंधी, प्रतिष्ठापनेसंबंधी विचारले. पुलस्त्यांनी याही विषयाचे संपूर्ण विवेचन केले. उत्तरायण येताच शुक्ल पक्षातील एखादा पवित्र दिन ब्राह्मणास विचारून पक्का करावा. एखाद्या तलावाशेजारी चार हात लांब, चार हात रुंद चौकोनी वेदी बनवावी. वेदी सर्व बाजूंनी समतल असून चारही दिशांनी तिचे मुख असावे. यानंतर सोळा हातांचा मंडप तयार करावा. त्याच्या चारही दिशाना एकएक

दरवाजा असावा. वेदीच्या सर्व बाजूंनी कुंडे तयार करावीत. कुंडांची संख्या नऊ, सात, पाच अशी असावी. कुंडांची लांबीरुंदी एक रत्नीची असावी व सर्व तीन तीन मेखलांनी सुशोभित असावीत. (रत्नी म्हणजे मूठ बांधलेल्या हाताचे कोपरापर्यंतचे अंतर). त्यांत यथास्नान योनी व मुख बनवावे. योनीची लांबी एक वीत व रुंदी सहा सात अंगुले असावी. मेखला तीन पर्व (बोटाचे पेर) उंच व एक हात लांब असावी. त्यांचा रंग समान असावा. ध्वजा, पताका लावाव्यात. मंडपाच्या चारही बाजूंनी, औदुंबर, पाकर, वड यांच्या झाडांच्या शाखांचे दरवाजे बनवावेत. आठ होता, आठ द्वारपाल, आठ जप करणारे असे वेदनिष्ठ ब्राह्मण बोलवावेत. प्रत्येक कुंडाजवळ कलश, यज्ञसामग्री, निर्मल आसन, दिव्य व विस्तृत सामपात्र इत्यादी सामग्री असावी.

प्रत्येक देवास देण्यासाठी दही, अक्षत, भक्ष्य पदार्थ यांचा बली पृथ्वीवर सर्व देवांसाठी अर्पण करावा. एक यज्ञस्तंभ स्थापन करावा. ऐश्वर्याची इच्छा असेल तर यजमानाच्या उंचीबरोबर हा यूप तयार करावा. यानंतर पंचवीस ऋत्विजांना सुवर्णाच्या आभूषणांनी सुशोभित करावे. सोन्याचे कुंडल, बाजूबंद, कडे, अंगठी, पवित्री, नाना प्रकारची वस्त्रे हे सर्व ऋत्विजांना समर्पण करावे. याच्या दुप्पट त्यांच्या आचार्यांना द्यावे. शय्या आदी वस्तूही त्यांना द्याव्यात. सोन्याचे कासव, मगर, चांदीचा मत्स्य इत्यादी सुवर्णाच्या पात्रात ठेवून यजमानाने सर्वौषधिमिश्रित जलाने स्नान करावे. श्वेत वस्त्र व श्वेत माला धारण करावी. श्वेत चंदन लावून पत्नी व पुत्रपौत्र यांच्या सहित यज्ञमंडपात पश्चिमद्वाराने प्रवेश करावा. त्यानंतर पाच रंगांच्या चूर्णांचे एक मंडल बनवावे. त्यात सोळा अरांचे एक चक्र काढावे. त्याचा गर्भ कमळाच्या आकाराचा असावा. या चक्रास वेदीवर स्थापित करून त्याच्या प्रत्येक दिशेस मंत्रपाठपूर्वक ग्रह व लोकपाल यांची स्थापना करावी.

मध्यभागी वरुणाचा मंत्र म्हणून एक कलश स्थापावा. त्यावर ब्रह्मदेव, शिव, विष्णू, गणेश, लक्ष्मी, पार्वती यांची स्थापना करावी. सर्व लोकांच्या शांतीसाठी भूतसमुदायासही स्थापन करावे. पुष्प, चंदन,

फले यांनी कलशाची पूजा करून त्यात पंचरत्न सोडून त्यास वस्त्राने आवेष्टित करावे. पुष्प, चंदन, यांनी त्याला अलंकृत करून द्वाररक्षेसाठी नियुक्त ब्राह्मणांना वेदपाठ करण्यास सांगावे. स्वतः आचार्यांचे पूजन करावे. पूर्व दिशेस दोन ऋग्वेदी, दक्षिणेस दोन यजुर्वेदी, पश्चिमेस दोन सामवेदी, उत्तरेस दोन अथर्ववेदी विद्वानांची नियुक्ती करावी. यजमानाने मंडलाच्या दक्षिणेस उत्तराभिमुख होऊन बसावे. वेद-पाठांनी यज्ञास प्रारंभ करावा. ब्राह्मणांकडून मंत्रजपाचा पाठ व्हावा. अग्नी प्रदीप्त झाल्यावर मंत्रपाठपूर्वक तूप व समिधा यांची आहुती द्यावी. ग्रह, इंद्र, शिव, मरुद्गण, लोकपाल यांना विधिपूर्वक आहुत्या द्याव्यात.

पूर्वद्वाराच्या ऋग्वेदी ब्राह्मणाने शांती , रुद्र, पवमान, सुमंगल, पुरुष इत्यादी सूक्तांचा पृथक पृथक जप करावा. यजुर्वेदी ब्राह्मणाने इंद्र, रुद्र, सोम, कूष्माण्ड, अग्नी, सूर्य इत्यादींच्या सूक्तांचा जप करावा. पश्चिमद्वाराच्या सामवेदी ब्राह्मणाने वैराजसाम, पुरुषसूक्त, रुद्रसंहिता, शिशुसूक्त, पंचनिधनसूक्त, गायत्रसाम, ज्येष्ठसाम, वामदेव्यसाम. बृह-त्साम, रौरवसाम, रथन्तरसाम, गोव्रत, विकीर्ण, रक्षोघ्न, यमसंबंधी सामांचे गायन करावे. उत्तरद्वाराच्या अथर्ववेदी ब्राह्मणाने भगवान वरुणदेवाचा शांती व पुष्टीसाठी मंत्रांचा जप करावा. अशा प्रकारे मंत्रांनी देवांची स्थापना झाल्यावर हत्ती, घोडयांच्या पायांखालची माती कलशांत सोडावी. सर्वौषधी, गोरोचन, सरसाचे दाणे, चंदन, गुगुळ, पंचगव्य इत्यादी मिसळून कलशांतील जलांनी यजमानास अभि-षेक करावा. अभिषेकाच्या वेळी विद्वान ब्राह्मणांनी वेदमंत्रांचा पाठ करावा.

अशा रीतीने शास्त्रशुद्ध कर्मांनी रात्र संपेल. प्रभातकाळ झाला की, हवनाच्या शेवटी ब्राह्मणांना शंभर, पन्नास, छत्तीस, पंचवीस गायींचे दान करावे. त्यानंतर वेदपाठ, संगीत, नाना प्रकारच्या वाद्यांचे ध्वनी यांच्या साथीने शंभर सुवर्णालंकृत गायींना घेऊन तलावाच्या जलात उतरावे व सामगान गायन करणाऱ्या ब्राह्मणास दान करावे. अशा प्रकारे सर्व ब्राह्मणांचा सत्कार करून चार दिवसांपर्यंत हवन करावे.

चौथ्या दिवशी यज्ञाची पात्रे, सामग्री यांची वाटणी ऋत्विजांस करावी. मंडप सोडवावा. सुवर्णपात्र व शय्या ब्राह्मणास द्यावी. आपल्या शक्तीस अनुसरून हजार, एकशेआठ, पन्नास, वीस ब्राह्मणांना भोजन द्यावे. तलावाच्या प्रतिष्ठेसाठी हा विधी महत्त्वाचा आहे. देवांची प्रतिष्ठा, मंदिर, उद्यान यांची प्रतिष्ठा यांसाठीही साधारणतः हाच विधी आहे.

ज्या तलावात केवळ वर्षाऋतूतच पाणी राहाते तो शंभर अग्निष्टोम यज्ञांच्या बरोबर आहे. शरत्कालापर्यंत ज्याचे पाणी टिकते त्याचेही हेच फल. हेमंत व शिशिर काळापर्यंत ज्याचे पाणी टिकते त्यामुळे वाजपेय व अतिरात्र यज्ञाचे फल प्राप्त होते. वसंतकाळापर्यंत पाणी टिकणारा तलाव अश्वमेधयज्ञाचे फल देतो. ग्रीष्मकाळापर्यंत टिकणारा तलाव राजसूय यज्ञापेक्षाही अधिक यज्ञाचे फल प्राप्त करून देतो. अशा प्रकारे जो मनुष्य विधिपूर्वक विहीर, तलाव, मंदिर, उद्यान यांची निर्मिती करतो तो ब्रह्मलोकात जातो.

भीष्मजींना पुलस्त्यांनी वृक्ष लावण्याचेही महत्त्व विशद केले. तलावाच्या प्रतिष्ठेसाठी वर सांगितलेला विधी करून वृक्षांच्या रोपांना सर्वौषधींच्या पाण्याने शिंपडावे. त्यांच्यावर दही व अक्षता टाकाव्यात. त्यांना पुष्पमालांनी अलंकृत करावे. गुगुळाचा धूप द्यावा, प्रत्येक वृक्षापुढे कलश स्थापन करून कलशांची पूजा करावी. एक दूध देणारी गाय शृंगारून वृक्षांच्या खाली सोडावी. कलशांतील जलांनी यजमानास अभिषेक करावा. यज्ञकर्त्यानें स्नान करून शुभ्र वस्त्र पांघरावे. आपल्या सामर्थ्यानुसार गाय, सोन्याचा जंजीर, कडे, अंगठी, पवित्री, वस्त्र, शय्या, चरणपादुका इत्यादी वस्तू देऊन सर्व ऋत्विजांचे पूजन करावे. चार दिवसांपर्यंत दुधाने अभिषेक करावा. तूप, जव, काळे तीळ यांनी होम करावा. होमासाठी पलाश वृक्षाच्या समिधा आणाव्यात, वृक्षारोपणाच्या चौथ्या दिवशी उत्तम उत्सव करावा. शक्तीस अनुसरून दक्षिणा द्यावी.

अशा रीतीने वृक्षारोपण करणाऱ्या माणसाच्या सर्व कामना पूर्ण होतात. वृक्ष पुत्रहीन पुरुषाला पुत्र देतो. इतकेच नाही तर वृक्ष अधिदेवतेच्या रूपाने तीर्थात जाऊन वृक्षारोपण करणाऱ्यास पिंडही देतो. एका

पिंपळाचे झाड लावण्याने एक हजार पुत्र झाल्याचे फल मिळते. मनुष्य धनवान होतो. अशोक वृक्ष शोक नाहीसा करतो. लिंबाचा वृक्ष आयुष्य वाढवितो. जांभूळ कन्या देतो. डाळिंबाचा वृक्ष उत्तम पत्नी देतो. पिंपळ रोगनाशक व पलाश ब्रह्मतेज प्रदान करणारा वृक्ष आहे. बेहेड्याचा वृक्ष लावणारा मनुष्य प्रेतरूप होतो. अंकोला लावल्यास वंशाची वृद्धी होते. खैराच्या वृक्षामुळे आरोग्याची प्राप्ती होते. लिंब लावणाऱ्यावर भगवान सूर्य प्रसन्न होतो. बेलाच्या वृक्षात भगवान शंकर व गुलाबाच्या झाडात देवी पार्वती यांचा निवास असतो. अशोकाच्या वृक्षात अप्सरा, कुंदाच्या वा मोगऱ्याच्या झुडुपात श्रेष्ठ गंधर्व निवास करतात. वेताचे वृक्ष लुटारूंना भयदायक असतात. चंदनाचा वृक्ष पुण्यदायी आहे. चाफा सौभाग्य देणारा, ताडाचा वृक्ष संतानांचा नाश करणारा आहे. नारळाचा वृक्ष लावणारा अनेक स्त्रियांचा पती होतो. दाखवृक्ष सर्वांगसुंदर स्त्री मिळवून देणारा आहे. केवडा शत्रूचा नाश करतो. वृक्ष लावणाऱ्या लोकांना अशा प्रकारे प्रतिष्ठा मिळते.

पुलस्त्यांनी भीष्मांना सौभाग्यशयन नावाच्या आणखी एका व्रताची माहिती दिली. पूर्वी जेव्हा भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक आदी दग्ध होऊन गेली तेव्हा सर्व प्राण्यांचे सौभाग्य एकत्रित होऊन वैकुंठात श्रीविष्णूंच्या वक्षःस्थलावर स्थित झाले. दीर्घकालानंतर पुनः सृष्टी निर्माण करण्याचा प्रसंग आला तेव्हा प्रकृती व पुरुष यांनी अहंकारयुक्त झालेल्या ब्रह्मा व विष्णू यांच्यांत स्पर्धा सुरू झाली. याच वेळी पिवळ्या रंगाचा एक भयंकर अग्निज्वाला निर्माण झाली. त्यामुळे सौभाग्यपुंज तेथून गलित झाला. ब्रह्मदेवांचा पुत्र दक्ष याने त्या सौभाग्यरसास वरच्या वर आकाशातच थांववून पिऊन टाकले. दक्षास अद्‌भुत रूप व लावण्य यांची प्राप्ती झाली. त्याचे बल व तेज वाढले. थोडासा अंश जो पृथ्वीवर पडला तो आठ भागांत विभागला गेला. त्यापासून सात सौभाग्यदायिनी औषधी निर्माण झाल्या. ऊस, तरुराज, निष्पाव, राजधान्य, गोक्षीर, कुसुंभ व कुसुम या त्या वस्तू. आठवे मीठ झाले. या आठ वस्तूंना सौभाग्याष्टक अशी संज्ञा आहे.

या सौभाग्यरसामुळेच दक्षास सती नावाची एक कन्या झाली.

नीलकमळाप्रमाणे मनोहर शरीराची ही कन्या ललिता या नावाने प्रसिद्ध झाली. पिनाकधारी शिवांनी त्या त्रिभुवनसुंदरीशी विवाह केला. सर्व तीनही लोकांत सौभाग्यरूपा झाली. ती भोग व मोक्ष देणारी ठरली. तिची आराधना करून नारी काय मिळवीत नाही ?

या सतीची आराधना कशी करावी हेही पुलस्त्यांनी सांगितले. चैत्र महिन्याच्या शुक्लपक्षाच्या तृतीयेस पहाटे मनुष्याने तिलमिश्रित जलाने स्नान करावे. याच दिवशी भगवान शंकरांचा सतीशी विवाह झाला होता. या दिवशी सतीदेवीबरोबर भगवान शिवांचे पूजन करावे. पंचगव्य व चंदनमिश्रित जलाने गौरी व भगवान शंकर यांच्या प्रतिमांना स्नान घालावे. धूप, दीप, नैवेद्य यांनी त्यांची पूजा करावी. 'पार्वती-देव्यै नमः', 'शिवाय नमः' या मंत्रांनी पार्वती व शिव यांच्या चरणांचे, 'जयायै नमः', 'शिवाय नमः' या मंत्रांनी दोनही घोटयांचे, 'त्र्यंबकाय नमः', 'भवान्यै नमः' यांनी पिंडऱ्यांचे, 'भद्रेश्वराय नमः', 'विजयायै नमः' यांनी गुडघ्यांचे, 'हरिकेशाय नमः', 'वरदायै नमः' यांनी मांडयांचे, 'ईशाय शंकराय नमः', 'रत्यै नमः' यांनी दोघांच्या कटिभागांचे, 'कोटिन्यै नमः', 'शूलिनें नमः' यांनी कुक्षिभागांचे, 'शूलपाणये नमः', 'मंगलायै नमः' यांनी उदराचे, 'सर्वात्मने नमः', 'ईशान्यै नमः' यांनी स्तनांचे, 'चिदात्मनें नमः', 'रुद्राण्यै नमः' यांनी कंठाचे, 'त्रिपुरघ्नाय नमः', 'अनन्तायै नमः' यांनी हातांचे, 'त्रिलोच-नाय नमः', 'कालानलप्रियायै नमः' यांनी बाहूंचे, 'सौभाग्यभवनाय नमः'ने आभूषणांचे, 'स्वधायै नमः', 'ईश्वराय नमः' यांनी दोघांच्या मुखमंडलांचे, 'अशोकवनवासिन्यै नमः' यांनी ऐश्वर्य प्रदान करणाऱ्या ओठांचे, 'स्थाणवे नमः', 'चंद्रमुखप्रियायै नमः' यांनी तोंडांचे, 'अर्ध-नारीश्वराय नमः', 'असितांग्यै नमः' यांनी नाकांचे, 'उग्राय नमः', 'ललितायै नमः' यांनी दोन भुवयांचे, 'शर्वाय नमः' 'वासुदेव्यै नमः' यांनी केसांचे, 'श्रीकंठनाथाय नमः'ने केवळ शिवांच्या केसांचे, 'भीमोग्ररूपिण्यै नमः' 'सर्वात्मनें नमः' यांनी दोनही मस्तकांचे पूजन करावे.

या प्रकारे शिव व पार्वती यांची विधिवत पूजा करून त्यांच्या-

पुढे सौभाग्याष्टक ठेवावे. निष्पाव, कुसुंभ, क्षीरजीरक, तरुराज, इक्षू, लवण, कुसुम, राजधान्य या आठ वस्तूंचे दान देऊन सौभाग्याची प्राप्ती करून घ्यावी. शंकर व पार्वती यांच्यासमोर या वस्तू ठेवून रात्रभर भूमीवर शयन करावे. सकाळी उठून स्नान व जप करावा. पवित्र माला, वस्त्र, आभूषण यांनी संपन्न होऊन ब्राह्मण दंपतीचे पूजन करावे. 'ललिता, विजया, भद्रा, भवानी, कुमुदा, शिवा, वासुदेवा, गौरी, मंगला, कमला, सती, उमा यांनी प्रसन्न व्हावे.' अशी प्रार्थना करून दान द्यावे. बारा महिन्यांच्या प्रत्येक द्वादशीस भगवान विष्णूंची लक्ष्मी-सहित पूजा करावी. प्रत्येक महिन्याच्या पौर्णिमेस सावित्रीसह ब्रह्म-देवांची विधिवत आराधना करावी. सौभाग्याष्टकांचे दान करावे. अशा रीतीने एक वर्षभर शिवाची पूजा करावी. व्रतसमाप्तीस शय्या, शिव-पार्वतीची सुवर्णमुद्रा, बैल, गाय यांचे दान करावे. या सौभाग्यशयन-व्रताचे अनुष्ठान करणारा नित्य उत्तम पदवीस जातो. त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात. त्याला या व्रतामुळे सौभाग्य, आरोग्य, सुंदर रूप, वस्त्र, अलंकार, आभूषण यांची प्राप्ती होते. पूर्वी या व्रताचे अनुष्ठान कामदेवाने, राजा शतधन्वाने, वरुणदेवानें, भगवान सूर्याने, धनाच्या स्वामीने म्हणजे कुबेराने केले होते.

## बाष्कलीची कथा ऐकून पापमुक्त व्हावे

प्राचीन काळातील सत्ययुगाची हकीगत आहे. बलिष्ठ दानवांनी स्वर्गावर सर्वत्र अधिकार मिळविला होता. इंद्रासहित सर्व देवांना जिंकून त्यांच्यापासून त्रिभुवनांचे राज्य दानवांनी जिंकले होते. त्यात बाष्कली नावाचा एक दानव सर्वांत श्रेष्ठ व बलवान होता. त्याने सर्व दानवांना यज्ञभोक्ता बनविले. यामुळे इंद्रास फारच दुःख झाले. तो अत्यंत निराश झाला. त्याने मनाशी विचार केला, हा बाष्कली ब्रह्मदेवांच्या वरदानाने अवध्य झाला. आता आपणही ब्रह्मलोकात जाऊन भगवानांना शरण जावे. अशा विचाराने इंद्र सर्व देवांसह भगवान ब्रह्मदेवांपाशी आला व म्हणाला,

'देवा, आपण आमची दशा जाणीत नाही ? आमचं जीवन पाहा

कसं झालं आहे ! प्रभो, आपल्या वरदानानं दैत्यांनी आमचं सर्वस्व हरण केलं आहे. या दुरात्मा बाष्कलीची सारी हकीगत मी आपणांस प्रथमपासूनच सांगत होतो. पितामह, आपणच आमचे पिता आहात. आमच्या रक्षणासाठी त्वरित उपाय योजावा. या जगातून वेदपाठ, यज्ञयाग संपले आहेत. उत्सव, मंगलकार्यं उरली नाहीत. सर्वांनी अध्ययन करणं सोडलं आहे. जगातील सर्व प्राणी कसा तरी श्वास मात्र घेत आहेत. सर्व जगास पीडा झाली आहे.'

'देवराज, मी सर्व जाणतो. बाष्कली मोठा नीच आहे. वरदान पावून घमेंड करतो आहे. तुम्हांस तो अवध्य असला तरी भगवान विष्णू त्याला ठीक करतील.'

ब्रह्मदेवांनी थोडे चिंतन करून विष्णूंना बोलावून घेतले. ब्रह्मदेव त्यांना म्हणाले, 'स्वामींनी इथं येऊन मोठीच कृपा केली आहे. या जगाची चिंता जगदीश्वराला आहे तितकी इतरांना कुठून असणार ? आपणच या जगतासाठी माझी उत्पत्ती केलीत. प्रभो, विश्वाचं पालन आपल्या हातात आहे. या इंद्राचं राज्य बाष्कलीनं घेतलं आहे. सर्व जगतावर त्याचाच अधिकार चालतो. केशवा, आता आपणच साह्य करून या सेवकास मार्ग दाखविला पाहिजे.'

'ब्रह्मन्, तुमच्याच वरदानानं हा दानव आज अवध्य बनला आहे. पण त्याला बुद्धीनं बंधनात टाकून पराभूत करता येईल. मी दानवांचा विनाश करण्यासाठी वामनरूप धारण करीन. या इंद्रानं माझ्याबरोबर बाष्कलीच्या घरी यावं. त्यानं बाष्कलीच्या घरी गेल्यावर माझ्यासाठी तीन पावलांच्या भूमीसाठी प्रार्थना करावी. पितामह, त्या दानवाचं दान स्वीकारून मी त्याला प्रथम राज्यापासून वंचित करीन. त्याला बांधून मी पातालात पाठवून देईन.'

इतके म्हणून भगवान विष्णू अंतर्धान पावले. कार्यसाधनास अनुकूल वेळ येताच प्राण्यांवर दया करणाऱ्या देवाधिदेव भगवानांनी अदितीचा पुत्र होण्याचा विचार केला. स्वच्छ व प्रसन्न वायू वाहात असताना भगवानांनी अदितीच्या गर्भात प्रवेश केला. सर्व प्राण्यांना सुख होऊ लागले. वृक्ष फुलांनी, फळांनी समृद्ध झाले. सर्व दिशा निर्मळ

झाल्या. सर्व माणसे सत्यपरायण झाली. देवी अदितीने एक हजार दिव्य वर्षे भगवानांना गर्भात धारण केले. त्यानंतर ते वामनाच्या रूपाने प्रकट झाले. त्यांचा अवतार होताच नदीचे जल स्वच्छ झाले. सुगंधी वायू वाहू लागला. या तेजस्वी पुत्राच्या जन्माने महर्षी कश्यपांनाही आनंद झाला. स्वर्गात नगारे वाजू लागले. त्रिलोकीचा मोह, दुःख दूर होऊन सर्वत्र संतोष प्रकट झाला. गंधर्वांनी सुरेल संगीतास आरंभ केला. भगवानांचा जयजयकार झाला.

देवांनी मनात विचार केला, हे साक्षात भगवान विष्णू आहेत. ब्रह्मदेवांच्या अनुरोधाने जगाच्या रक्षणासाठी जगदीश्वराने या छोटया शरीरात अवतार धारण केला आहे. हेच ब्रह्मदेव, हेच विष्णू, हेच महेश्वर. देव, यज्ञ, स्वर्ग, सर्व काही तेच आहेत. सर्व चराचर भगवान विष्णूंनी व्याप्त आहे. हेच ब्रह्मा, विष्णू, महेश या नावांनी प्रसिद्ध आहेत. याच सुमारास भगवान वामन इंद्रावरोवर बाष्कलीच्या घरी गेले. परकोटाने वेष्टिलेली बाष्कलीची नगरी त्यांनी दुरूनच पाहिली. रत्नांनी मढविलेले उंच उंच महाल त्यांना दिसले. नगरातील सडका योजनाबद्ध व आखीव होत्या. सर्व प्रकारची पुष्पे, सर्व विद्या, सर्व शिल्पे त्या नगरीत त्यांना दिसत होती.

बाष्कली धर्माचा ज्ञाता, कृतज्ञ, सत्यवादी व जितेन्द्रिय होता. न्याय-अन्याय यांचा निवाडा तो कुशलतेने करी. तो ब्राह्मणांचा भक्त, शरणागतांचा रक्षक, दीन अनाथांना सांभाळणारा होता. मंत्रशक्ती, प्रभुशक्ती, उत्साहशक्ती यांनी तो संपन्न होता. संधी, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव, समाश्रय; राजनीतीच्या या सहा गुणांचे पालन तो नीट करी. सर्वांशी तो हसून बोले. वेद व वेदांगे यांच्या तत्त्वांचे ज्ञान त्याला चांगले होते. तो यज्ञांचे अनुष्ठान करी. तो तपस्यापरायण होता. उदार, सुशील, संयमी, अहिंसावृत्तीचा, माननीय पुरुषांचा आदर करणारा, शुद्धहृदय, प्रसन्नमुख, पूजनीय पुरुषांची पूजा करणारा, सर्व विषयांचा ज्ञाता होता. तो मोठा धनी व दानी होता. धर्म, अर्थ, काम या तीन मोक्षांचा साधक होता. हा बाष्कली त्रिलोकीचा एक श्रेष्ठ पुरुष होता. तो नेहमी स्वतःच्या नगरीत राही. देव व दानव यांची

घमेंड उतरविण्याचे सामर्थ्य त्याच्यात होते. त्या दानवराजाच्या राज्यात अधर्म नव्हता. प्रजेत कोणी दीन, रोगी, अल्पायू, दुःखी, मूर्ख, कुरूप, दुर्भाग्यशाली व अपमानित नव्हते.

इंद्र येत आहेसे पाहून दानवांनी बाष्कलीस म्हटले, ' प्रभो, आज मोठं आश्चर्य घडलंय. आज हा इंद्र एका बुटक्या ब्राह्मणास बरोबर घेऊन आपल्या नगरीत एकटाच आला आहे. आता आम्ही काय करावं ?' त्यावर बाष्कली म्हणाला,

' दानवांनो, या नगरीत देवराज इंद्राचं स्वागत केलं पाहिजे. तो आज आमचा पूजनीय अतिथी आहे.' दानवराज बाष्कली इंद्राला आणण्यासाठी स्वतः गेला. त्याने भगवान वामन व इंद्र यांना आदराने प्रणाम केला. मनात त्याला हर्ष झाला. तो स्वतःशी म्हणू लागला– ' आज माझ्या एवढा धन्य कोण आहे ? कारण आज माझ्याकडं हा इंद्र याचक होऊन आला आहे. याला नक्कीच माझ्याकडून काही तरी हवं आहे. घरी आलेल्या या इंद्राला मी स्त्री, पुत्र, महाल, आपले प्राण, सर्व काही देईन– त्याने इंद्राचे मनापासून स्वागत केले. इंद्र व वामन यांचा त्याने मोठ्या आदराने सत्कार केला. बाष्कली इंद्राला म्हणाला,

' इंद्र, आपण आज स्वतः होऊन माझ्या घरी आलात. यामुळं माझा जन्म सफल झाला. माझे सारे मनोरथ पूर्ण झाले. प्रभो, माझ्या घरी येण्याचं प्रयोजन काय ? सर्व काही मला सांगावं.'

' बाष्कली, दानववंशात तुम्ही सर्वश्रेष्ठ आहात हे मी जाणतो. आपल्यापाशी मी येणं ही काही मोठ्या आश्चर्याची गोष्ट नव्हे. तुमच्या घरी आलेला याचक कधी विमुख होऊन परतत नाही. आपण याचकांसाठी कल्पवृक्ष आहात. आपल्या सारखा थोर दाता नाही. आपलं तेज सूर्यासारखं आहे. गंभीरता सागराप्रमाणे आहे. पृथ्वीसारखी क्षमाशीलता आहे. हा ब्राह्मण कश्यपांच्या उत्तम कुलात जन्मला आहे. यांनी माझ्या जवळ तीन पावलं जमिनीची याचना केली आहे. पण बाष्कली, माझं त्रिभुवनांचं राज्य तर तुम्ही घेतलं आहे. आज मी निराधार व निर्धन आहे. याला देण्यासाठी माझ्याजवळ भूमी नाही. म्हणून मी याचना करतो आहे, याचक मी नाही, हा ब्राह्मण आहे. दानवेन्द्र, तुम्हांस अभीष्ट हवं

असेल तर या ब्राह्मणाला तीन पावलं भूमी दान द्यावी.'

'देवेन्द्रा, आपण आलात. फार चांगलं झालं. जरा आपण स्वतःकडे पाहावं. आपणच सर्वांचा परम आश्रय आहात. पितामह ब्रह्मदेव त्रिभुवनाचा सारा भार आपणांवरच सोपवून सुखानं ध्यानधारणा करीत बसले आहेत. भगवान विष्णूही आपल्याच विश्वासानं क्षीरसागरावर सुखानं निद्रा घेत आहेत. आपणांवर सर्व भार सोपवून उमानाथ भगवान शंकर कैलासपर्वतावर विहार करतात. माझ्यासारख्या अनेक दानवांना, आपण एकटयानंच मारलं आहे. बारा आदित्य, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार, आठ वसू, सर्व देव यांना आपल्याच बाहुबलाचा आश्रय असून ते स्वर्गात यज्ञभाग आपणांमुळेच घेतात. आपणच उत्तम यज्ञ करून भगवंतांची आराधना केली आहे.

'वृत्र, नमुची आपल्याच हातून मारले गेले आहेत. पाक नावाच्या दैत्याचं दमन आपणच केलं आहे. आपल्याच आज्ञेनं भगवान विष्णूंनी दैत्यराज हिरण्यकशिपूस आपल्या मांडीवर घेऊन मारलं. ऐरावताच्या मस्तकावर बसून जेव्हा आपण हातात वज्र घेऊन येता तेव्हा सर्व दानव पळून जातात. देवराज, आपण असे प्रभावशाली आहात. आपल्या समोर मी कोण? आपण माझा उद्धार करण्यासाठी इथं आला आहात. मी आपल्या आज्ञेचं पालन नक्कीच करीन. मी आपल्यासाठी प्राणही देईन. देवेश्वरा, आपण तर माझ्याजवळ इतकीशी भूमी मागितली आहे. स्त्री, पुत्र, गायी, धन, सर्व राज्य हे सर्व या ब्राह्मणास मी देईन. आपण या ब्राह्मणासाठी केवळ तीन पावलांची भूमी मागितली? मी यास चांगली चांगली गावं देईन. आपणांसही स्वर्गाचं राज्य देईन. या वामनजीस मी स्त्री व भूमी देईन. आपण कृपा करून या सर्वांचा स्वीकार करावा.'

दानवराज बाष्कलीचे हे भाषण ऐकून पुरोहित शुक्राचार्यांनी त्याला सावध करून म्हटले, 'महाराज, आपणांस उचित, अनुचित काहीच समजत नाही. कुणाला काय द्यावं हे आपणांस माहीत नाही. मंत्र्यांशी चर्चा करून आपण निर्णय घ्यायला पाहिजे. आपण इंद्रासहित सर्व देवांना जिंकून हे राज्य प्राप्त करून घेतलं आहे. आता आपण खरंच बंधनात पडणार! राजन्, हा वामन म्हणजे साक्षात सनातन

विष्णू आहेत. यांना तुम्ही काहीच न देणं चांगलं. यांनीच तुमच्या वंशाचा उच्छेद केला होता. पुढंही करतील. ह्यांनी मायेनं हे बालरूप धारण केलं आहे. आता आणखी काही सांगण्याची आवश्यकता नाही. यांना तुम्ही काहीच देऊ नये. माशीच्या पावलाएवढीही भूमी आपण यांना देऊ नये. माझं आपण ऐकलं नाही तर आपलाच नाश होईल.'

'गुरुदेव, मी धर्माच्या इच्छेनं यांना सर्व काही देण्याची प्रतिज्ञा केली आहे. या प्रतिज्ञेचं पालन अगत्यानं करायला हवं. सत्पुरुषांचा हा तर सनातन धर्म आहे. हा जर भगवान विष्णू असेल व त्यांनी देवांना समृद्ध बनविण्यासाठी हे रूप घेतलं असेल तर माझ्यासारखा धन्य दुसरा नाही. ध्यानपरायण योगीपुरुषास निरंतर ध्यान करूनही ज्यांचं दर्शन होत नाही ते भगवान स्वतःच माझ्या घरी आले. मी आणखीनच धन्य बनलो आहे. शत्रू जरी घरी आला तरी त्याला अदेय असं काही नसावं, असा आपलाच उपदेश आहे. गुरुदेव, हे स्मरून मी इंद्राला स्वर्गाचं राज्य व या वामन बटूस माझे प्राणही देण्याचा निश्चय केला आहे.'

बाष्कली इंद्राला म्हणाला,

'देव, आपल्या मागणीनुसार मी ही सारी पृथ्वी आपणांस दान देईन. केवळ तीन पावलं भूमी देणं ही गोष्ट मला लज्जेची वाटते.'

'दानवराज, तुमचं म्हणणं सत्य आहे. पण या ब्राह्मणानं मला केवळ तीनच पावलं भूमी मागितली आहे. एवढ्याच भूमीची याला आवश्यकता आहे. मी याच्यासाठीच ही याचना केली आहे.'

'देवराज, आपण माझ्या वतीनं या वामनबटूस तीन पावलं भूमी द्यावी. आपणही सुखानं राज्य करावं.'

इतके म्हणून बाष्कलीने हातात जल घेऊन बटूस तीन पावलांच्या भूमीचे दान दिले. दान मिळताच वामनरूपी श्रीहरीने बटूचे रूप सोडून सर्व लोकांना व्यापणारे आपले विश्वरूप प्रकट केले. ते यज्ञपर्वतावर चढून उत्तरेस तोंड करून उभे राहिले. त्यावेळी दानव भगवानांच्या डाव्या चरणाच्या खाली आले. तेव्हा जगदीश्वराने पहिले पाऊल सूर्य-लोकात ठेवले. दुसरे ध्रुवलोकात ठेवले. आणि भगवानांनी तिसऱ्या पावलाने ब्रह्मांडावर आघात केला. त्यांच्या अंगठ्याच्या धक्क्याने ब्रह्मांड

कटाह फुटून त्यातून पुष्कळसे जल बाहेर पडले. त्यातूनच भगवान श्रीविष्णूंच्या चरणांतून प्रकट होणारी वैष्णवी नदी गंगा वाहू लागली. त्यानंतर भगवान वामनांनी बाष्कलीस विचारले,

'माझी तीन पावलं भूमी ?'

'भगवान् आपण जेवढी भूमी निर्माण केली तीतून मी काहीच दडवून ठेविली नाही. पृथ्वी छोटी आहे. आपण महान आहात. माझ्या जवळ आणखी नवी सृष्टी निर्माण करण्याची शक्ती नाही.'

'दानवराज, पण तिसरं पाऊल कुठं ठेवू ? मी तुझी कोणती इच्छा पूर्ण करू ? तू दिलेलं संकल्पाचं जल माझ्या हातावर पडलं. तू आता वर मागण्यास योग्य आहेस. जे हवं ते माग. मी देईन.'

'देवेश्वर, मी आपली भक्ती मागतो. माझा मृत्यूही आपल्या हातून व्हावा. त्यामुळं मला आपल्या परमधाम श्वेतद्वीपाची प्राप्ती होईल.'

'तू एक कल्पपर्यंत थांब. ज्यावेळी वराहरूप धारण करून मी रसातलात प्रवेश करीन त्यावेळी मी तुझा वध करीन. त्यावेळी तू माझ्या स्वरूपास येऊन मिळशील.'

भगवान वामन वटू अंतर्धान पावले. त्यांनी दानवराजापासून त्रिलोकीचे राज्य घेतले. बाष्कलीस पाताललोकास पाठवून दिले. महाबुद्धिमान इंद्र तीन लोकांचे पालन सुखाने करू लागला. हा सर्व प्रसंग ऐकून सर्व पापांचा नाश करावा. श्रीविष्णूंच्या पावलांचे दर्शन करून घोर पापे नाहीशी करावीत. जो मनुष्य मौन राहून हा यज्ञपर्वत चढतो त्याला अश्वमेधयज्ञाचे फल मिळते, तो सर्व पापांतून मुक्त होऊन विष्णुधामास जातो.

## उत्तम ब्राह्मण व गायत्रीमंत्राचा महिमा

एकदा भीष्मांनी पुलस्त्यांना विचारले, 'विप्रवर, मनुष्यास देवत्व, सुख, राज्य, धन, यश, भोग, आरोग्य, आयू, विद्या, लक्ष्मी, पुत्र, बंधुवर्ग यांची मंगल प्राप्ती कशी होईल ? कृपा करून सांगाल ?' त्यावर पुलस्त्य

म्हणाले, ' राजन्, या पृथ्वीवर ब्राह्मण नेहमीच विद्या व गुण यांनी संपन्न आहेत. ब्राह्मण हे देवांतही देव आहेत. ते साक्षात धर्ममूर्ती आहेत. तेच सर्वांना या पृथ्वीवर मोक्षाची प्राप्ती करून देतात. ब्राह्मण सर्व लोकांचे गुरू, पूज्य व तीर्थ-रूप आहेत. ब्रह्मदेवांनी त्यांनाच सर्व देवांचा आश्रय बनविले आहे. ' भगवान लक्ष्मीपती कसे प्रसन्न होतील ?' असा एक प्रश्न पूर्वी नारदांनी ब्रह्मदेवांना विचारला होता. ब्रह्मदेवांनी या प्रश्नाचं उत्तर दिलं होतं,'

ज्याच्यावर ब्राह्मण प्रसन्न होतात त्यावर भगवान विष्णूही प्रसन्न असतात. ब्राह्मणाची सेवा करणारा मनुष्य परब्रह्म परमात्म्यास जाणतो. तो तेथे पोचतो. ब्राह्मणाच्या शरीरात नेहमीच श्रीविष्णूंचा निवास असतो. ज्या घरी ब्राह्मण कधी निराश होत नाही त्याच्या सर्व पापांचा नाश होतो. त्याला अक्षय स्वर्गाची प्राप्ती होते. ब्राह्मणांचीपूजा करणारा कधी दरिद्री, दुःखी, रोगी राहात नाही. ज्याच्या घरातील अंगण ब्राह्मणांच्या चरणधूलीने संपन्न, पवित्र व शुद्ध होते ते घर पुण्यक्षेत्रच मानावे. पूर्वकाळात प्रथम ब्रह्मदेवांच्या मुखातून ब्राह्मण निर्माण झाले. त्याच मुखातून नंतर जगाची सृष्टी व नियमनासाठी वेद यांची निर्मिती झाली. विधात्याने ब्राह्मणांच्या मुखातच वेद समर्पित केले. पितृयज्ञ (श्राद्धतर्पण), विवाह, अग्निहोत्र, शांतिकर्म इत्यादी सर्व मंगल कार्यांत ब्राह्मणच महत्त्वाचे असतात. ब्राह्मणाच्या मुखानेच देव हव्याचा व पितर कव्याचा उपभोग घेतात. ब्राह्मणाशिवाय दान, होम, बली हे सर्व निष्फल होते. जेथे ब्राह्मणांना भोजन दिले जात नाही, तेथे असुर, प्रेत, दैत्य, राक्षस भोजन करतात. म्हणून दानहोमप्रसंगी ब्राह्मणांना बोलावून सर्व कर्म करावे. ब्राह्मणास पाहून श्रद्धापूर्वक नमस्कार करावा. त्याच्या आशीर्वादांनी आयुष्य वाढते. ब्राह्मणास पाहून प्रणाम न करणारा, ब्राह्मणाचा द्वेष करणारा, त्याच्या विषयी अश्रद्धा दर्शविणारा मनुष्य क्षीण आयुष्याचा होतो. त्याच्या धनाचा, आयुष्याचा नाश होतो. त्याला परलोकात दुर्गती प्राप्त होते. ब्राह्मणाचे पूजन केल्याने आयुष्य, यश, विद्या, धन यांची वृद्धी होऊन मनुष्य श्रेष्ठ दशेस जातो. ज्या घरात ब्राह्मणाच्या चरणोदकाने चिखल होत नाही, जेथे वेद व शास्त्रे यांचे

ध्वनी उमटत नाहीत, जो यज्ञ- तर्पण- ब्राह्मणाचा आशीर्वाद यांनी वंचित होतो, ते घर स्मशानाप्रमाणे समजावे.

**न विप्रपादोदककर्दमानि न वेदशास्त्रप्रतिघोषितानि ।**
**स्वाहास्वधास्वस्तिविवर्जितानि श्मशानतुल्यानि गृहाणि तानि ।।**

श्रोत्रिय व सदाचारी ब्राह्मणाची नित्य पूजा करावी. जो उत्तम व्रताचे पालन करतो, जो पापांपासून मुक्त आहे, तोच तीर्थरूप मानावा. श्रोत्रियकुलात जन्मास येऊनही जो वैदिक कर्मांचे अनुष्ठान करीत नाही तो पूजित होत नाही. असत् क्षेत्रात, मातृकुलात जन्म घेऊनही जो वेदानुकूल कर्मं करतो तोच पूजेसाठी योग्य आहे. महर्षी वेदव्यास व ऋष्यशृंग ही दोन मोठी उदाहरणे आहेत. विश्वामित्र जरी क्षत्रिय कुलात उत्पन्न झाले असले तरी आपल्या सत्कर्मांनी ते ब्रह्मदेवांसमान झाले आहेत. या पृथ्वीवर तीर्थस्वरूप श्रोत्रिय ब्राह्मणांची लक्षणे ऐकण्यासारखी आहेत. ही ऐकून सर्व पापांचा नाश होतो.

ब्राह्मणाच्या बालकास जन्मानेच ब्राह्मण समजावे. संस्कारांनी तो ' द्विज ' होतो. विद्या घेतली की तो ' विप्र ' होतो. विद्या, मंत्र, वेदांचे अध्ययन यांनी पवित्र असलेला ब्राह्मण पूजनीय असतो. त्याची भक्ती नेहमी नारायणावर असते. त्याचे अंतःकरण शुद्ध असते. त्याने आपल्या इंद्रियांना व क्रोधाला जिंकलेले असते. तो सर्वांविषयी समान भाव राखतो. त्याच्या हृदयात गुरू, देव, अतिथी यांच्याबद्दल प्रेमभाव असतो. तो मातापित्यांच्या सेवेत रमतो. त्याच्या मनात परस्त्रीबद्दल कधीही लोभ नसतो. तो नेहमी पुराणांतील कथा सांगतो. धार्मिक आख्यानांचा नेहमी प्रसार करतो. अशा ब्राह्मणाचे दर्शन प्रतिदिन अश्वमेध-यज्ञाचे फल देणारे आहे. जो प्रतिदिन स्नान, ब्राह्मणांचे पूजन, नाना-प्रकारच्या व्रतांचे अनुष्ठान, गंगाजलाचे सेवन करतो त्याच्याशी बातचीत करण्याने उत्तम गती प्राप्त होते. असा ब्राह्मण शत्रू व मित्र यांच्याबद्दल सारखीच भावना ठेवतो. दुसऱ्याचे धन, काम, क्रोध इत्यादी दोषांपासून तो मुक्त असतो. तो इंद्रियांच्या स्वाधीन नसतो. यजुर्वेदात वर्णिलेला शुद्ध असा चोवीस अक्षरांनी युक्त त्रिपदा गायत्रीचा प्रतिदिन तो जप करतो.

या गायत्रीमंत्राचे महत्त्व विशेष आहे. या मंत्राचा छंद गायत्री व देवता सविता आहे. गायत्रीदेवीचा वर्ण शुक्ल, मुख अग्नी, ऋषी विश्वामित्र आहे. ब्रह्मदेव त्याचे मस्तक आहे. त्याची शिख रुद्र व हृदय विष्णू आहे. उपनयनप्रसंगी या मंत्राचा उपयोग होतो. गायत्रीदेवी सांख्यायन गोत्रात उत्पन्न झाली. तीन लोक हे तिचे तीन चरण आहेत. तिच्या उदरात पृथ्वी स्थित आहे. पायापासून मस्तकापर्यंत शरीराच्या चोवीस स्थानांवर गायत्रीच्या चोवीस अक्षरांचा न्यास करून द्विजास ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. प्रत्येक अक्षराच्या देवतेचे ज्ञान करून घेतल्याने त्याला विष्णूची सायुज्यता प्राप्त होते. गायत्रीचे दुसरे लक्षण असे की, तो एक अठरा अक्षरांचा यजुर्मंत्र आहे 'अग्नि' शब्दापासून त्याचा आरंभ होतो व 'स्वाहा'च्या हकारात त्याची समाप्ती होते. पाण्यात उभे राहून या मंत्राचा जप शंभर वेळा करावा. त्यामुळे कोटयवधी पातके व उपपातके नष्ट होतात. जप करणारा पुरुष ब्रह्महत्या आदी पापांपासून मुक्त होतो व त्याला ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. हा मंत्र असा आहे, 'ॐ अग्नेर्वाक्पुंसि यजुर्वेदेन जुष्टा सोमं पिब स्वाहा' याच प्रकाराने विष्णुमंत्र, महेश्वर मंत्र, देवीमंत्र, सूर्यमंत्र, गणेशमंत्र, इत्यादी जप करून मनुष्य पापरहित होतो व उत्तम गतीस जातो. जपपरायण ब्राह्मण हा ब्रह्मरूप असतो. त्याचे पूजन करावे. अशा ब्राह्मणास विधि-पूर्वक दान द्यावे. जो ब्राह्मण स्वाध्यायपरायण होऊन स्वतः शिकतो, इतरांना शिकवितो, धर्म, सदाचार, श्रुती, स्मृती, पुराणसंहिता, धर्म-संहिता इत्यादींचे श्रवण करतो तो या पृथ्वीवर भगवान विष्णूंच्या समान आहे. त्या तीर्थरूप व निष्पाप ब्राह्मणाचे बल अक्षय असते.

प्राणायामसहित गायीचा जप करावा. प्रत्येक देहधारी मनुष्याच्या गुदात अपान व हृदयात प्राण असतो. गुदास संकुचित करून पूरक क्रियेच्या द्वारे अपान वायूस प्राणवायूशी संयुक्त करावे. त्यानंतर वायूस रोखून कुंभक करावा. तीन प्राणायाम करून ब्राह्मणाने गायत्रीचा जप करावा. त्याच्या महापातकांच्या राशी नष्ट होतील. प्रत्येक वर्णाची देवता समजावून घेऊन तिचा न्यास स्वतःच्या शरीरावर करणारा ब्रह्मभावास जातो. प्रत्येक अक्षराची देवता समजावून घेण्यासारखी आहे.

प्रथम अक्षराची देवता अग्नी, दुसऱ्याची वायू, तिसऱ्याची सूर्य, चौथ्याची वियत् (आकाश), पाचव्याची यमराज, सहाव्याची वरुण, सातव्याची बृहस्पती, आठव्याची पर्जन्य, नवव्याची इंद्र, दहाव्याची गंधर्व, अकराव्याची पूषा, बाराव्याची मित्र, तेराव्याची त्वष्टा, चौदाव्याची वसू, पंधराव्याची मरुद्‌गण, सोळाव्याची सोम, सतराव्याची अंगिरा, अठराव्याची विश्वेदेव, एकोणिसाव्याची अश्विनीकुमार, विसाव्याची प्रजापती, एकविसाव्याची सर्वदेव, बाविसाव्याची रुद्र, तेविसाव्याची ब्रह्मदेव व चोविसाव्याची श्रीविष्णू अशा देवता असतात. गायत्रीच्या या देवतांचे सर्व ज्ञान झाले की वाणीचा बोध होतो.

विज्ञ पुरुषाने आपल्या शरीरातील पायापासून मस्तकापर्यंत प्रत्येक अवयवावर गायत्रीच्या मंत्राचा न्यास करावा. ‘ तत् ’चा पायाच्या अंगठ्यावर, ‘ स ’चा घोट्यावर, ‘ वि ’ चा दोनही पिंडऱ्यांवर, ‘ तु ’ चा गुडघ्यांवर, ‘ वं ’ चा मांड्यांवर, ‘ रे ’ चा गुदावर, ‘ ण्य ’ चा अंडकोषावर, ‘ म् ’ चा कटिभागावर, ‘ भ ’ चा नाभीवर, ‘ र्गो ’ चा उदरावर, ‘ दे ’ चा दोनही स्तनांवर, ‘ व ’ चा हृदयावर, ‘ स्य ’ चा दोनही हातांवर, ‘ धी ’ चा मुखावर, ‘ म ’ चा तालूवर, ‘ हि ’ नासिकेच्या अग्रभागावर, ‘ धि ’ चा दोनही नेत्रांवर. ‘ यो ’ चा दोन भुवयांत, ‘ यो ’ ललाटावर, ‘ नः ’ चा मुखाच्या पूर्वभागावर, ‘ प्र ’ चा दक्षिणभागावर, ‘ चो ’ चा पश्चिमभागावर, ‘ द ’ चा मुखाच्या उत्तरभागावर न्यास करावा. यानंतर ‘ यात् ’ मस्तकावर न्यास करून सर्वव्यापी स्वरूपात स्थिर व्हावे. धर्मात्मा पुरुष अशा प्रकारे न्यास करून ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्या स्वरूपात जातो, तो महायोगी व महाज्ञानी बनून त्याला परम शांती मिळते.

संध्याकालच्यासाठी आणखी एक न्यास आहे. ॐ भूरिति हृदये, ॐ भुवः शिरसि, ॐ स्वः शिखायै, ॐ तत्सवितुर्वरेण्यमिति कलेवरे, ॐ भर्गो देवस्य धीमहीति नेत्रयोः, ॐ धियो यो नः प्रचोदयादिति करयो : अशा सहा वाक्यांचा न्यास करून या सहा इंद्रियांना स्पर्श करावा. या गायत्री मंत्राचा न्यास पुनः व्याहृतीच्या सह करावा. असे करण्याने द्विज सर्व पापांपासून मुक्त होतो. ‘ ॐ भू : पादाभ्याम् ’ असा उच्चार करून

दोनही चरणांना स्पर्श करावा. 'ॐ भुवः जानुभ्याम्' म्हणून दोनही गुडघ्यांना, 'ॐ स्वः कटचाम्' म्हणून कटिभागास, 'ॐ महः नाभौ' म्हणून नाभिस्थानास, 'ॐ जनः हृदये' म्हणून हृदयास, 'ॐ तपः करयोः' म्हणून दोनही हातांना, 'ॐ सत्यं ललाटे' करून ललाटास व गायत्री मंत्राचा पाठ करून शिखेस स्पर्श करावा.

सर्व बीजांनी युक्त असणारा हा गायत्री मंत्र जो जाणतो त्याला चार वेदांचे, योगाचे, वाचिक, उपांशु व मानसिक जपाचे ज्ञान होते. जो या गायत्रीस जाणीत नाही तो शूद्रापेक्षाही अधम मानला गेला आहे. अशा अपवित्र ब्राह्मणास पितरांसाठी करायचे दान देऊ नये. कोणत्याही तीर्थस्नानाचे फल त्याला देऊ नये. त्याने केलेले सर्व शुभ फल निष्फल होते. त्याची विद्या, धनसंपत्ती, उत्तम जन्म, द्विजत्व, हे सर्व व्यर्थ होते. हा गायत्रीमंत्र मोक्ष देणारा आहे. गायत्रीमंत्र दहा वेळा जपल्याने चालू जन्माची, शंभर वेळा जपल्याने मागील जन्माची व एक हजार वेळा जपल्याने तीन युगांची पापे नष्ट होतात. सकाळी व संध्याकाळी रुद्राक्षाची माळ घेऊन जो गायत्रीमंत्राचा जप करतो त्याला चार वेदांचे फल मिळते. गायत्रीमंत्राने मनुष्य शुद्ध होतो.

जो मनुष्य नित्य वासुदेवमंत्राचा जप करतो, जो श्रीविष्णूंच्या चरणांना प्रणाम करतो तो मोक्षाचा अधिकारी होतो. ज्याच्या मुखात भगवान वासुदेवांचे स्तोत्र असते त्याच्या शरीरात पापाचा अंशही राहात नाही. धार्मिक ग्रंथांचा पाठ करण्यामुळे मनुष्यास कोटचवधी यज्ञांचे फल मिळते. हे सर्व जाणणारा ब्राह्मणच विश्वरूप होऊ शकतो. ब्राह्मणच श्रीहरीचा मूर्तिमान अवतार आहे. त्याच्या शापाने विनाश होतो. वरदानाने आयुष्य, विद्या, यश, धन यांची वाढ होते. सर्व प्रकारची संपत्ती मिळते. ब्राह्मणांच्या प्रसादानेच भगवान विष्णूस सदा ब्रह्मण्य म्हटले जाते. असा हा ब्रह्मण्य देव गाय व ब्राह्मण यांचा हितकर्ता आहे. त्या गोविंदास, श्रीहरीस, श्रीकृष्णास वारंवार नमस्कार असो. या मंत्राने जो सदा श्रीहरीचे पूजन करतो त्याला भगवान प्रसन्न होतात. त्याला विष्णूचे सायुज्य प्राप्त होते.

## अधम ब्राह्मणांचे वर्णन, पतित विप्राची कथा, गरुडचरित्र

जो दहा प्रकारांची स्नाने करीत नाही, संध्या करीत नाही, तर्पण आदी करीत नाही, ज्याच्यात इंद्रियसंयमाचा अभाव असतो तोच ब्राह्मण अधम असतो. जो देवांची पूजा, व्रत, वेदविद्या, सत्य, शौच, योग, ज्ञान व अग्निहोत्र यांना जाणीत नाही तो अधम ब्राह्मण होय. महर्षींनी ब्राह्मणांसाठी पाच स्नाने सांगितली आहेत. सर्व शरीरास भस्म लावणे हे आग्नेय स्नान, जलाने केलेले स्नान हे जल वा वारुण स्नान, 'आपो हि ष्टा' इत्यादी ऋचांनी जो स्वतःवर अभिषेक केला जातो ते ब्राह्म स्नान व शरीरावर हवेत येणारे गायींच्या चरणांचे धूलिकण पडतात ते वायव्यस्नान मानले गेले आहे. ऊन असूनही जेव्हा आकाशातून जल-वर्षाव होतो त्याला दिव्य स्नान म्हणतात. तुलसीची पाने असलेले जल, शालग्रामशिलेस घातलेले पाणी, ब्राह्मणांचे चरणोदक, मुख्य गुरुजनांचे चरणोदक यांना पवित्र मानले गेले आहे. या पाच प्रकारच्या जलांनी मस्तकावर अभिषेक केला की आणखी पाच प्रकारची स्नाने होतात. त्याग, तीर्थस्नान, यज्ञ, व्रत, होम इत्यादींनी जे फल मिळते तेच या दहा प्रकारच्या स्नानांनी मिळते.

जो प्रतिदिन पितरांसाठी तर्पण करीत नाही तो पितृघातक मानावा. त्याला नरकात जावे लागते. संध्या न करणारा ब्राह्मण ब्रह्म-हत्यारा होतो. मंत्र, व्रत, वेद, विद्या, उत्तम गुण, यज्ञ, दान इत्यादींचा त्याग करणारा ब्राह्मण अधमाहून अधम असतो. मंत्र व संस्कारहीन, शौच व संयमहीन, बलिवैश्वदेव न करताच भोजन करणारा दुरात्मा, चोर, मूर्ख, धर्मशून्य, कुमार्गी, श्राद्धादी कर्म न करणारा, गुरुसेवेपासून दूर राहाणारा, मंत्रज्ञानापासून वंचित, धार्मिक मर्यादेचा भंग करणारा ब्राह्मण हा अधमापेक्षाही अधम असतो. अशा दुष्टाशी बोलू नये तो नरकात जातो. त्याचे आचरण दूषित असल्याने तो अपवित्र व अपूज्य असतो. जो ब्राह्मण तलवारीवर जीविका चालवितो, दासवृत्तीने राहातो, बैलावर ओझे लादतो, ऋण देऊन व्याज घेतो, बालिका व वेश्या यांच्याशी व्यभिचार करतो, चांडालांच्या घरी राहातो, दुसऱ्यावर कधी

उपकार करीत नाही, गुरूची हत्या करतो तो ब्राह्मण अधमाहून अधम समजावा. आचारहीन, पाखंडी, धर्माची निंदा करणारा, देवांवर दोषारोपण करणारा ब्राह्मण ब्रह्मद्रोही असतो. अधम ब्राह्मणाचा वध करू नये. कारण तसे केले तर मनुष्यास ब्रह्महत्येचे पातक लागेल.

सर्व प्रकारची पापे करूनही जर इंद्रियांना वश करून घेतले, तर त्या पापांतून मुक्तता होऊ शकते. पुन्हा ब्राह्मणत्व प्राप्त होऊ शकते. याविषयी एक प्राचीन काळची कथा मोठी सुंदर व विचित्र आहे. पूर्वी एका ब्राह्मणाचा एक नवजवान पुत्र होता. त्याने जवानीच्या ओढीने मोहास वश होऊन एकदा चांडालीशी समागम केला. चांडालीस गर्भ राहिला. त्याला अनेक पुत्र व कन्या त्या चांडालीपासून झाल्या. आपले घर सोडून तो तिच्याच घरी चिरकालपर्यंत राहिला. पण तो कधी अभक्ष्य पदार्थ खायचा नाही. कधी मद्य प्यायचा नाही. चांडाली त्याला नेहमी म्हणायची, 'हा पदार्थ खा. शराब पी.' पण तो उत्तर देई, 'प्रिये, मला अशी घाणेरडी गोष्ट सांगू नकोस. शराबचं नाव ऐकूनच मला ओकारी येते.'

एके दिवशी हा ब्राह्मण थकूनभागून घरी येऊन झोपला होता. चांडालीने मद्य घेऊन त्याच्या मुखात ओतले. मदिरेचे थेंब तोंडात पडताच त्या ब्राह्मणाच्या मुखातून अग्नी प्रज्वलित झाला. त्या अग्निज्वालांनी कुटुंबासहित त्या चांडालीस जाळून भस्म केले. तिचे घरही जळून गेले. त्यावेळी तो ब्राह्मण 'हाय हाय' करून रडू लागला. विलाप करीत म्हणत होता, 'आग आली कोठून? हे माझं घर जळालं कसं?' तेव्हा आकाशवाणी झाली की, 'तुझ्या ब्रह्मतेजानं या चांडालीच्या घरास आग लागली.' आपल्या मुखात मद्याचे थेंब टाकण्यात आले हे त्या ब्राह्मणास समजले. हे समजून त्याला मोठे आश्चर्य वाटले. त्याने स्वतःसच उपदेश केला की, 'विप्रा, तुझं तेज नष्ट झालं आहे. म्हणून पुन्हा धर्माचं आचरण करावंस.' ब्राह्मणाने त्या मुनिवरांकडे जाऊन धर्माचरणाची चौकशी केली. मुनींनी त्याला दानधर्म, व्रतांचे आचरण, तीर्थयात्रा, भगवान विष्णूंची आराधना, इत्यादी मार्ग सुचविले. ब्राह्मणांनी त्याला एक प्राचीन इतिहास सांगितला.

पूर्वकाली जेव्हा विनतानंदन गरुड अंडे फोडून बाहेर आला तेव्हा या नवजात शिशूस आहार ग्रहण करण्याची इच्छा झाली. भुकेने व्याकुळ बनून तो आईस म्हणाला,

'माते, मला भूक लागली आहे. काही खायला दे.'

'बेटा, तुझी भूक शमविण्याची शक्ती माझ्यात नाही रे. तुझा पिता कश्यप धर्मात्मा असून साक्षात ब्रह्मदेव आहे. तो सोन नदीच्या उत्तरतटावर राहातो. तिथं तू जावंस. तुझ्या तपस्यामग्न पित्यास तू तुझी भूक सांग. त्यांच्या उपदेशानं तुझी भूक शांत होईल.'

मातेचे सांगणे ऐकून महाबली गरुड एका क्षणात पित्यापाशी गेला. अग्नीप्रमाणे तेजस्वी अशा आपल्या पित्यास पाहून त्याने त्यांना नमस्कार करून म्हटले,

'प्रभो, मी आपला पुत्र आहाराच्या इच्छेनं मी आपणांपाशी आलो आहे. भूक फार लागली आहे. कृपा करून भोजन द्यावं.'

'वत्सा, त्या समुद्राच्या किनाऱ्यावर विशाल हत्ती व कासव राहातात. ते दोन मोठे जीव असून त्यांचं बल अपार आहे. ते एक-मेकांना मारण्याच्या प्रयत्नात आहेत. तू त्यांच्यापाशी जा व तुझी भूक भागीव.'

पित्याची आज्ञा होताच वेगवान, विशाल आकाराचा गरुड त्या दोघांपाशी आला. त्या दोघांना आपल्या चोचीनं विदीर्ण करून, पंजात धरून गरुड आकाशातून उडत चालला होता. तो एका जांभळीच्या वृक्षावर एका मोठ्या शाखेच्या आधाराने बसला. तो फांदीवर पाय ठेवताच फांदी तुटली. तेव्हा ती फांदी पडून खाली गाय, ब्राह्मण यांची हत्या होऊ नये म्हणून त्या गरुडाने त्या फांदीसह आकाशात भरारी मारली. हे पाहून भगवान विष्णूंनी मनुष्यरूप धारण करून त्याला म्हटले,

'पक्षिराज, तू कोण आहेस ? ही एवढी मोठी शाखा कशासाठी घेऊन फिरतो आहेस ? हा मोठा हत्ती, हे कासव कशासाठी ?'

'महाबाहू, मी गरुड आहे. कर्मानुसार मला पक्षी व्हावं लागलं आहे. मी कश्यपमुनींचा पुत्र आहे. माता विनतेच्या गर्भापासून माझा

जन्म झाला. पाहा ना. या मोठ्या जीवांना मी खाण्यासाठी पकडलं आहे. मी एका मोठ्या झाडाच्या फांदीवर बसणार एवढ्यात ती फांदी मोडली. खाली असलेला ब्राह्मण व गाय यांची हत्या झाली असती. म्हणून ती तशीच घेऊन मी हिंडतो आहे. आता माझ्या मनास विषाद वाटतो. मी जाऊ तरी कुठं ? काय करू ? माझा वेग सहन कोण करणार ?'

'अच्छा. तू माझ्या बाहूवर बैस. आणि या हत्तीला व कासवाला खा '

'मोठमोठे पर्वतही मला धारण करू शकत नाहीत. तुम्ही माझ्यासारख्या विशाल पक्ष्याला कसं धारण करू शकाल ? भगवान नारायणाखेरीज माझं वजन कुणीच सहन करू शकणार नाही.'

'तू बुद्धिमान आहेस. आपलं काम तू कर.'

गरुड त्यांच्या विशाल भुजावर बसला. त्याच्या वजनानें भुजा हालली नाही. स्थिर राहिली. गरुडाने ती शाखा पर्वतावर टाकून दिली. हत्ती व कासव यांचे त्याने भक्षण करून म्हटले, 'आपण कोण आहात ? मी आपलं कोणतं प्रिय काम करू ?'

'मी नारायण आहे. मी तुझं प्रिय करण्यासाठी आलो आहे.'

त्याला विश्वास वाटावा म्हणून भगवंतांनी आपले स्वरूप प्रकट केले. मेघाप्रमाणे श्याम रूप होते. शरीरावर पीतांबर शोभत होता. चार भुजांनी त्यांचे रूपलावण्य शोभून दिसत होते. हातांत शंख, चक्र, गदा, पद्म असून या श्रीहरीस गरुडाने नमस्कार करून म्हटले, 'पुरुषोत्तमा, सांगा. मी आपलं कोणतं कार्य करू ?' त्यावर विष्णू म्हणाले, 'सख्या गरुडा, यापुढं तू माझं वाहन होऊन राहा.' त्यानंतर गरुड म्हणाला, 'देवेश्वर, आपल्या दर्शनानं मी धन्य झालो आहे. माझा जन्म सफल झाला. मी माझ्या माता-पित्यांची आज्ञा घेऊन त्वरित येतो.' त्याला भगवान म्हणाले, 'पक्षिराज, तू अजरामर होशील. तुझा वध कोणत्याही प्राण्यापासून होणार नाही. तुझं कर्म व तेज माझ्या समान होईल. सर्वत्र तुझी गती राहील. तुला सर्व प्रकारची सुखं प्राप्त होतील. तुझ्या मनात असलेली इच्छा पूर्ण होईल. विनाकष्ट असा

इच्छेस येईल तो आहार तुला प्राप्त होईल. तू तुझ्या मातेला कष्टातून मुक्त करशील.' इतके म्हणून भगवान विष्णू अंतर्धान पावले.

गरुडाने मातेस जाऊन सर्व वृत्तान्त सांगितला. पिता कश्यपही संतुष्ट झाले. ते त्याला म्हणाले, 'खगश्रेष्ठा, मी धन्य आहे. ही तुझी कल्याणमयी माता धन्य आहे. ज्या कुलात वैष्णवपुत्र उत्पन्न होतो ते कुल धन्य होय. तो वैष्णवपुत्र स्वतःस श्रीविष्णूंची सायुज्यता प्राप्त करून घेतो. जो प्रतिदिन विष्णूंची पूजा करतो, त्याचं ध्यान करतो, त्याचं यश गातो, त्यांचा मंत्र नेहमी जपतो, त्यांच्या स्तोत्राचा पाठ करतो, त्यांचा प्रसाद घेतो, एकादशीस उपवास करतो त्याच्या सर्व पापांचा क्षय नक्कीच होतो. ज्याच्या हृदयात सदा गोविंद असतो तो नरश्रेष्ठ विष्णुलोकात प्रतिष्ठित होतो. जलात, पवित्र स्थानात, उत्तम रस्त्यावर, गायींत, ब्राह्मणांत, स्वर्गात, ब्रह्मदेवांच्या भवनात, पवित्र पुरुषाच्या घरात सदा भगवान विष्णू विराजमान असतात. या सर्व ठिकाणी जो भगवानांचा जप करतो, चिंतन करतो, तो आपल्या पुण्याच्या द्वारे पुरुषांत श्रेष्ठ ठरतो. सर्व पापांचा क्षय होऊन तो भगवान विष्णूंचा सेवक बनतो. या प्रकारे विष्णूचं सारूप्य प्राप्त करून तो पुरुष धन्य होतो. त्याच्यावर या जगाचे स्वामी, नित्य, अच्युत, अविनाशी भगवान कृपा करतात. तो पुरुष श्रेष्ठ बनतो. नाना प्रकारची तपस्या करून, धर्मकृत्य करून, यज्ञांचं अनुष्ठान करून देवही भगवान विष्णूंना प्राप्त करू शकत नाहीत. पण तू मात्र त्यांना प्राप्त करून घेतलंस. तू धन्य आहेस ! तुझी माता सवतीमुळं घोर संकटात आहे. तिची सुटका कर. मातेच्या दुःखाचा प्रतिकार केलास तर तू देवेश्वर भगवान विष्णूंच्या जवळ जाशील.'

भगवान विष्णूंपासून वरदान घेऊन, पित्याची आज्ञा घेऊन गरुड आपल्या मातेपाशी आला व हर्षपूर्वक तिला प्रणाम करून म्हणाला, 'माते, सांग, मी तुझं कोणतं प्रिय कार्य करू ? हे काम करून मी भगवान विष्णूंकडे जाणार आहे.' त्यावर ती माता म्हणाली, 'बेटा, माझ्यावर महान दुःख आलं आहे. तू ते निवारण कर. माझी वहीण कद्रू माझी सवत आहे. पूर्वी तिनं एकदा अन्यायपूर्वक वर्तन करून मला दासी बनविलं. आता मी तिची दासी आहे ! तुझ्याशिवाय माझं हे दुःख

कोण दूर करणार ? कुलनंदना, ज्या दिवशी मी तिला ती म्हणेल ती वस्तू देईन तेव्हा माझं हे दासीपण संपेल. मी मुक्त होईन.' तेव्हा गरुड तिला म्हणाला, ' माते, मी त्वरित तिच्याकडं जाऊन तिला काय हवंय ते विचारीन. तुझे कष्ट निवारण करीन.'

त्याप्रमाणे तो गरुड तत्पर झाला. विनताने कद्रूस विचारले,

' कल्याणी, तू तुझी अभीष्ट वस्तू सांग. मी ती तुला देईन. या कष्टदायक अवस्थेतून मग माझी मुक्तता होईल.'

' मला अमृत हवंय ' असे कद्रू म्हणाली.

अमृत आणण्यासाठी गरूडाने सागरावरून आकाशाकडे झेप घेतली. त्याच्या पंखांच्या हालचालीमुळे आकाशात खूप धूळ उडाली. गरुडाने अमृताच्या रक्षकास मारून अमृत मिळविले. तो परत घरी येण्यास निघाला. एक पक्षी अमृत घेऊन निघाला हे पाहाताच ऐरावतावरील इंद्राने विचारले,

' पक्ष्याचं रूप धारण करणारा तू कोण आहेस ? हे अमृत बलपूर्वक नेतोस ? सर्व देवांचं अप्रिय करून तू कुठं निघालास ?'

' देवराज, मी आपलं अमृत घेऊन चाललो आहे. तुमचा पराक्रम दाखवा पाहू.'

महाबाहू इंद्राने गरुडावर बाणांचा वर्षाव केला. गरुडाने आपल्या तीक्ष्ण चोचीने, नखांनी ऐरावत हत्तीस विदीर्ण केले. मातलीसहित इंद्राचा रथ निकामी झाला. अनेक प्रमुख देव घायाळ झाले. तेव्हा इंद्राने रागावून त्याच्यावर वज्राचा प्रहार केला. तरी तो पक्षिराज विचलित झाला नाही. मोठ्या वेगाने तो भूतलाकडे निघाला. इंद्राने त्याला म्हटले, ' निष्पाप गरुडा, तू जर यावेळी त्या नागमातेस अमृत देशील तर सारे सर्प अमर होतील. तुझी संमती असेल तर मी अमृत तेथून परत आणीन.' त्यावर गरुड म्हणाला, ' माझी साध्वी माता दास्यभावानं मोठी कष्टी झाली आहे. ज्यावेळी ती या भावातून मुक्त होईल तेव्हा तू अमृताचं हरण करावंस.'

महापक्षी अमृताला घेऊन मातेपाशी आला. अमृतासह पुत्र पाहून मातेस अतिशय हर्ष झाला. तिने ते अमृत कद्रूला दिले व ती दास्य-

भावातून मुक्त झाली. एवढ्यात इंद्राने ते अमृत पळवून नेले व विषाचा घडा तेथेच ठेवला. त्याचे हे कृत्य कोणासच समजले नाही. कद्रूने मोठ्या संतोषाने अमृताऐवजी ते विष आपल्या पुत्रांना पाजले. गरुड आपल्या मातापित्यांचा निरोप घेऊन भगवान विष्णूंपाशी गेला. ब्रह्म-देवांच्या मुखातून हा गरुडप्रसंग ऐकून पतित ब्राह्मणाने पुण्यकर्मांची अनुष्ठाने केली. त्याला पुनः ब्राह्मणत्व प्राप्त झाले व तो स्वर्गास गेला. सदाचारी माणसाचे पाप नित्य क्षीण होत जाते व दुराचारीचे पुण्य नष्ट होते. अनाचाराने पतित झालेला ब्राह्मण सदाचारी होऊन देवरूप पावला. म्हणून द्विजाने सदाचार सोडता कामा नये.

## ब्राह्मणांच्या कर्मांचे महत्त्व, गायीचा महिमा

क्षुधेनें संतप्त झालेल्या ब्राह्मणाचा जो सत्कार करीत नाही तो नरकात जातो. क्रोधपूर्वक कठोर शब्दांनी जो ब्राह्मणाची निंदा करतो तो अत्यंत घोर नरकात पडतो. तेथून सुटल्यावर तो चांडालयोनीत जन्मतो. दरिद्री व रोगी घेऊन तो भुकेने व्याकुळ होऊन भटकतो. म्हणून भूकेनें पीडलेल्या ब्राह्मणाचा अपमान करू नये. देव, अग्नी, ब्राह्मण यांना जे ' नाही देणार ' असे म्हणतात त्यांना नीच योनीत जन्म येतो. ते चांडाल होतात. जो ब्राह्मण, गाय, माता-पिता, गुरू यांना मारतो तो निश्चित रौरव नरकात जातो. तेथून त्याचा उद्धार कधीच होत नाही. कधी पुण्याईने त्याला जन्म लाभला तर तो पंगू व दीन होतो. तो विषादग्रस्त व दुःखशोकाने पीडित होतो. असे तीन जन्म झाल्यानंतर त्याचा उद्धार होतो. माता, पिता, ब्राह्मण, स्नातक, तपस्वी, गुरुजन यांना क्रोधाने मारणारा दीर्घकालपर्यंत कुंभीपाक नरकात पडतो. त्या-नंतर तो कीटयोनीत जन्म पावतो. ब्राह्मणांना जो कठोर बोलेल त्याच्या शरीरावर आठ प्रकारचे कोड निर्माण होईल. ब्राह्मणाचे धन जो हरण करील, त्याची न्यायोपार्जित जीविका जो अपहरण करील तो अक्षय नरकाचा धनी होईल. ब्राह्मणाची निंदा करणाऱ्या चुगलखोरास पाहि-ल्यास वा स्पर्श केल्यास स्नान केले पाहिजे. विषाला विष म्हणत नाहीत. ब्राह्मणाच्या धनालाच विष म्हणतात. विष केवळ खाणाऱ्या-

सच मारते, पण ब्राह्मणाचे धन पुत्रपौत्रादी सर्वांचा नाश करते. जो मोहवश होऊन माता, ब्राह्मणी, गुरुपत्नी यांच्याशी समागम करील तो रौरव नरकात जाईल.

ब्रह्महत्या हे फार मोठे पाप असून ब्रह्महत्यारा घोर नरकात पडतो. वेदशास्त्रांचा ज्ञाता, जितेन्द्रिय, श्रोत्रिय ब्राह्मणाची हत्या घडली तर कोटचवधी ब्राह्मणांची हत्या केल्याचा दोष लागतो. शैव तथा वैष्णव ब्राह्मणास मारले तर दहा पटींनी अधिक पाप होते. आपल्या वंशाच्या ब्राह्मणाच्या हत्येमुळे नरकातून कधीच उद्धार होत नाही. तीन वेदांचा ज्ञाता स्नातकाची हत्या करणाऱ्याच्या पापास सीमाच नाही. श्रोत्रिय, सदाचारी, तीर्थस्नान व वेद-मंत्राने पवित्र असणाऱ्या ब्राह्मणाच्या वधाने होणाऱ्या पापास कधी अंतच नसतो. कठोर वचन, कठोर वर्तन यांनी पीडित होऊन ब्राह्मण ज्याचे नाव घेऊन प्राण सोडतो त्याला सर्व ऋषी, मुनी, देव, ब्रह्मवेत्ते ब्रह्महत्यारा म्हणतात. अशा हत्येचे पातक त्या देशातील रहिवासी व राजा यांना लागते. जो अधम ब्राह्मण आपल्या कुटुंबीयांचा वध करतो त्यालाही ब्रह्महत्येचे पाप लागते. जर एखादा आततायी ब्राह्मण आपला प्राण घेण्यासाठी प्रवृत्त झाला व आपण त्याचा वध केला तर मात्र ब्रह्महत्येचे पाप लागत नाही. जो घरास आग लावतो, दुसऱ्यास जहर देतो, धन चोरतो, झोपलेल्यास मारतो, शेत व स्त्रीचे अपहरण करतो, तो आततायी समजावा. या जगात ब्राह्मणा-सारखा पूज्य कोणीही नाही. तो जगाचा गुरू आहे.

ब्राह्मणाने न मागता मिळालेली भिक्षा स्वीकारावी. उंछवृत्तीही फार चांगली. कापलेले शेत, उठलेल्या बाजारातील धान्य वेचून जीविका चालविणाऱ्यास उंछवृत्तीचा म्हणतात. या वृत्तीचा आश्रय घेऊन श्रेष्ठ मुनिजन ब्रह्मपदास जातात. यज्ञप्रसंगी मिळालेली दक्षिणा ब्राह्मणाने ग्राह्य मानावी. ब्राह्मणांना शिकवून यज्ञ चालवून ब्राह्मणाने दक्षिणा घ्यावी. पठन-पाठन, उत्तम मंगल शुभकार्य करून त्याने दक्षिणा घ्यावी. ब्राह्मणाची जीविका हीच आहे. दान घेणे ही त्याची अंतिम वृत्ती आहे. शास्त्रपूत जीवन जगणारा ब्राह्मण धन्य आहे. वृक्ष व लता यांच्या आश्रयाने जगणारा ब्राह्मण धन्य आहे.

ब्राह्मणोचित वृत्तीचा अभाव असेल तर ब्राह्मणांनी क्षत्रियवृत्तीने निर्वाह करावा. न्याययुक्त अवसर येताच त्यांनी युद्ध करावे. उत्तम वीरव्रताचं त्यांनी आचरण करावे. ब्राह्मण क्षत्रियवृत्तीने राजापासून जे धन प्राप्त करून घेतो ते श्राद्ध, यज्ञ इत्यादी प्रसंगी दान देण्यास पवित्र मानले गेले आहे. अशा ब्राह्मणाने सर्व पापांपासून दूर राहून वेद व धनुर्वेद यांचा अभ्यास करावयास हवा. जो ब्राह्मण न्यायोचित युद्धात सामील होऊन संग्रामात शत्रूशी सामना करतो, त्यात मरण पावतो, त्याला वेदपाठकापेक्षा दुर्लभ व उच्च पदाची प्राप्ती होते. धर्मयुद्ध लढणारे योद्धे समोरासमोर लढतात. कधी भीत नाहीत की, शत्रूस पाठ दाखवीत नाहीत. ज्याच्याजवळ हत्यार नाही, जो युद्धभूमीवरून पळून जात आहे अशा शत्रूवर पाठीमागून हल्ला करता येत नाही. जो दुराचारी सैनिक युद्धविमुख, पतित, मूर्च्छित, असत्‌शूद्र, स्तुतिप्रिय, शरणागत शत्रूस युद्धात मारतो तो नरकात जातो.

अशी क्षत्रियवृत्ती सदाचारी पुरुषास प्रशंसनीय आहे. हिचा आश्रय घेऊन सर्व क्षत्रिय लोक स्वर्गास जातात. धर्मयुद्धात शत्रूशी सामना करताना मृत्यू आला तर क्षत्रियास शुभ आहे. तो पवित्र होऊन सर्व पापांपासून मुक्त होतो. एक कल्पपर्यंत स्वर्गात तो निवास करतो. त्यानंतर तो सार्वभौम राजा होतो. त्याला सर्व प्रकारचे भोग प्राप्त होतात. त्याचे शरीर निरोगी व कामदेवाप्रमाणे सुंदर होते. त्याचे पुत्र धर्मशील, सुंदर, समृद्धिशाली, पित्याच्या रुचीस अनुकूल होतात.

उत्तम व श्रेष्ठ ब्राह्मणाने आपत्तिकालात वैश्यवृत्तीने वा शेती करूनही जीवन चालवावे. त्याने दुसऱ्यांच्या द्वारे शेतीचे, व्यापाराचे काम करावे. हे काम करीत असताना त्याने ब्राह्मणोचित कर्माचा त्याग करता कामा नये. वैश्यवृत्तीचा आश्रय घेऊन ब्राह्मण खोटे बोलला, एखाद्या वस्तूची त्याने अतिरिक्त स्तुती केली तर तो दुर्गतीस जातो. वस्तूचे वजन करताना त्याने कधी असत्य वर्तन करू नये. कारण तराजू धर्मावर प्रतिष्ठित आहे. तराजूवर तोलताना फसवणूक केल्यास नरकाची प्राप्ती होते. सत्याशिवाय मोठा धर्म नाही की, असत्याएवढे मोठे पाप नाही. म्हणून सर्व कार्यांत सत्यच श्रेष्ठ मानले आहे.

नास्ति सत्यात्परो धर्मो नानृतात्पातकं परम् ।
अतः सर्वेषु कार्येषु सत्यमेव विशिष्यते ।।

जो सर्व कार्यात असत्याचा त्याग करून सत्य बोलतो तो सर्व दुःखांना पार करतो. अक्षय स्वर्गाचा लाभ त्याला होतो. ब्राह्मणाने व्यापार करताना असत्याचा त्याग करायला हवा. जो नफा होईल त्यातील काही भाग त्यानें तीर्थांसाठी खर्च करावा व उरलेला स्वतःसाठी घ्यावा. ब्राह्मणानें वाणिज्यवृत्ती न्यायपूर्वक सांभाळली तर, त्याने मिळविलेले धन पितर, देव, ब्राह्मण यांच्यासाठी दान दिले तर त्याला अक्षय फलाची प्राप्ती होते. वाणिज्य हा लाभदायक व्यवसाय आहे. पण त्यात लोभ न सोडणे व असत्य बोलून माल विकणे हे दोन मोठे दोष आहेत. विद्वान पुरुषाने या दोषांना वगळून धनोपार्जन करावे. व्यापारात कमावलेले धन दान केले तर अक्षय फलाची प्राप्ती होते.

याचप्रमाणे शेतीही प्रामाणिकपणाने करावी. त्याने दोन प्रहरपर्यंत चार बैल नांगरास जुंपावेत. तीन बैलही चालतील. बैलांना दिवसभरात विश्रांती घेण्यास वेळ मिळणार नाही इतके काम त्यांच्याकडून घेऊ नये. प्रतिदिन बैलांना चोर, व्याघ्र आदींनी विरहित अशा स्थानावर न्यावे. तेथील गवत आधीच कापलेले नसावे. त्यांनी तेथे मनसोक्त चरावे. मालकाने स्वतः उपस्थित राहून त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था करावी. त्यांना राहाण्यासाठी उत्तम गोठा बनवावा. तेथे कसलाच उपद्रव नसावा. तेथून शेण, मूत्र, विखुरलेले गवत यांना दूर करून गोठा नीट स्वच्छ ठेवावा. गोठा अथवा गोशाला म्हणजे सर्व देवांचे वसति-स्थान. म्हणून ते स्वच्छ असावे. मालकाने आपल्या शयनगृहाप्रमाणे गोठा स्वच्छ राखावा. त्याची फरशी समतल असावी. सर्दी, हवा, धूळ यांपासून जनावरांना त्रास होऊ नये. गायींना तर स्वतःच्या प्राणाप्रमाणे समजावे. तिचे शरीर आपल्या शरीरासारखे मानावे. आपल्या देहास जशी सुखदुःखे होतात तशीच ती गायीसही होतात हे समजून घ्यावे. गायींचे कष्ट नेहमीच दूर करावेत.

अशा रीतीने जो शेती करील तो बैलांना जुंपण्याच्या दोषापासून मुक्त होईल व धनवान बनेल. दुर्बल, रोगी, अत्यंत छोटया, अधिक वृद्ध

बैलास जो कामास लावील त्याला गोहत्येचे पाप लागेल. एका बाजूला दुर्बल व दुसऱ्या बाजूस बलवान बैलांना जोडून शेती करील त्यालाही गोहत्येच्या समान पातक लागेल. चारा घातल्याशिवाय जो बैलांना नांगरास जुंपेल अथवा गवत खाताना, पाणी पिताना जो त्यांना हाकील तोही गोहत्येच्या पापाचा धनी होईल. अमावास्या, संक्रांत, पौर्णिमा या दिवशी नांगरास बैल जोडल्यास दहा हजार गोहत्यांची पातके लागतील. या तिथींना जो गायींना काजळ, पुष्पे, तेल यांनी नटवील, त्यांची पूजा करील, त्याला अक्षय स्वर्गाचा वास मिळतो. जो प्रतिदिन दुसऱ्या गायीस मूठभर घास देतो त्याच्या सर्व पापांचा नाश होतो. जसे ब्राह्मणाचे महत्त्व, तसेच ते गायीचेही आहे. दोघांच्या पूजेचे समान महत्त्व आहे.

भगवानांच्या मुखापासून ब्राह्मणाची उत्पत्ती झाली तर त्याची तुलना गायींशी कशी केली जाते ? या प्रश्नाचे उत्तर ब्रह्मदेवांनी दिले आहे. प्रथम भगवानांच्या मुखापासून तेजोमय पुंज निर्माण झाला. त्या पुंजापासून प्रथम वेद निर्माण झाले. त्यानंतर क्रमशः अग्नी, गाय व ब्राह्मण उत्पन्न झाले. सर्व लोक व भुवने यांच्या रक्षणासाठी वेदांचे चार प्रकार झाले. अग्नी व ब्राह्मण देवांसाठी हविष्य ग्रहण करतात. हविष (तूप) गायींपासून निर्माण होते. म्हणून हे चारही जगताचे जन्मदाते आहेत. हे चार पदार्थ जगात नसते तर जग नष्ट झाले असते. ब्राह्मण, देव, असुर यांनी गायीची पूजा करावी. गाय ही सर्व कार्यांत उदार व सर्व गुणांची खाण आहे. ती साक्षात सर्व देवांचे स्वरूप आहे. गायीची प्रत्येक वस्तू पावन आहे. सर्व जगास ती पवित्र करते. गायीचे मूत्र, शेण, दूध, दही, तूप यांचे पंचगव्य घेतले तर शरीरात दोष उरत नाहीत. गव्य पदार्थ सर्व द्रव्यांत श्रेष्ठ, शुभ व प्रिय आहेत. अन्नादी पदार्थ पाच रात्रींपर्यंत, दूध सात रात्रींपर्यंत, दही वीस रात्रींपर्यंत, तूप एक मासपर्यंत शरीरावर आपला प्रभाव कायम ठेवणारे आहे. गाय ही सदा धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे पुरुषार्थ देणारी आहे.

गायीस एकदा प्रदक्षिणा करून तिला प्रणाम केल्यास सर्व पापां-

पासून मुक्ती मिळते व अक्षय स्वर्गसुखाचा लाभ होतो. बृहस्पती, लक्ष्मी यांच्याप्रमाणेच गायही वंदनीय व पूजनीय आहे. गायी दूध व तूप देणाऱ्या आहेत. त्या तुपाचे उत्पत्तिस्थान, तुपाच्या नद्या आहेत. अशा गायी माझ्याजवळ सतत असाव्यात, अशी इच्छा प्रत्येकास असते.

घृतक्षीरप्रदा गावो घृतयोन्यो घृतोद्‌भवा : ।
घृतनद्यो घृतावर्त्तास्ता मे सन्तु सदा गृहे ।।
गावो ममाग्रतो नित्यं गावः पृष्ठत एव च ।
गावश्च सर्वगात्रेषु गवां मध्ये वसाम्यहम् ।।

गायीचे तूप माझ्या सर्व शरीरात व मनात स्थित व्हावे. गायी नेहमीच माझ्या समोर आहेत. माझ्या मागे त्याच आहेत. माझ्या सर्व अंगास त्यांचाच स्पर्श होत आहे. मी त्यांच्यांत निवास करीन. या मंत्राचा जप प्रत्येक दिवशी सकाळी व संध्याकाळी आचमन करून करावा. असे करण्याने सर्व पापे दूर होतात. गाय जशी आदरणीय तसाच ब्राह्मण आदरणीय. जसा ब्राह्मण तसेच श्रीविष्णू आदरणीय आहेत. विष्णू प्रमाणेच गंगाही आदरणीय आहे. ही सर्व धर्माची साक्षात स्वरूपे आहेत.

गायी मनुष्याच्या बंधू आहेत. मनुष्य गायींचा बंधू आहे. ज्या घरात गाय नाही ते बंधुरहित गृह आहे. सहा अंगे, पदे, क्रम, यांच्यासहित सर्व वेद गायींच्या मुखात निवास करतो. तिच्या शिंगांत भगवान शंकर व विष्णू सदा विराजमान आहेत. गायींच्या उदरात कार्तिकेय, मस्तकात ब्रह्मदेव, ललाटात महादेव, शिंगाच्या अग्रभागी इंद्र, दोनही कानांत अश्विनीकुमार, नेत्रांत चंद्र व सूर्य, दातांत गरुड, जिव्हेत सरस्वती, गुदात सर्व तीर्थे, मूत्रस्थानात गंगा, रोमकूपांत ऋषी, मुखात व पृष्ठभागाला यम, उजव्या अंगास वरुण व कुबेर, डाव्या अंगास यक्ष, मुखात गंधर्व, नासिकेच्या अग्रभागी सर्प, खुरांच्या मागील जागी अप्सरा, शेणात लक्ष्मी, गोमूत्रात पार्वती, चरणांच्या अग्रभागांत आकाशातील देव, त्यांच्या हंबरण्याच्या आवाजात प्रजापती, स्तनांत चार समुद्र निवास करतात. प्रत्येक दिवशी स्नान करून जो गायीस स्पर्श करतो तो सर्व प्रकारच्या पापांपासून मुक्त होतो. गायींच्या खुरांपासून उडालेली धूळ जो मस्तकी धारण करतो तो खरे पाहाता तीर्थातच स्नान करून

सर्व पापांपासून मुक्त होतो.

ब्राह्मणाला श्वेत गायीचे दान केल्यास मनुष्य ऐश्वर्यशाली बनतो. धुरकट रंगाची गाय दान केली तर स्वर्गाची प्राप्ती होते. कपिला गायीचे दान अक्षय फलदायी होते. कृष्ण वर्णाची गाय दान केली तर कोणतेच कष्ट पडत नाहीत. भुऱ्या रंगाची गाय दुर्लभ आहे. गौर वर्णाची गाय सर्व कुलाला आनंद देणारी आहे. लाल नेत्रांची गाय रूप प्रदान करणारी आहे. निळ्या रंगाची गाय धनाची कामना पूर्ण करते. एका कपिलेच्या दानाने मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. दाता विष्णुस्वरूप बनतो. जो दहा गायी व एक बैल यांचे दान करतो त्याला या दोहोंचे समान फल मिळते. पितरांच्या उद्देशाने सोडलेला सांड पितरांना विष्णुलोकात सन्मानित करतो. सोडलेला सांड वा दान दिलेली गाय, यांच्या अंगावर जितके केस तितकी हजार वर्षे माणसास स्वर्गसुख मिळते. पिता जिवंत असताना मातेचा मृत्यू झाला तर तिच्या स्वर्ग प्राप्तीसाठी चंदनर्चचित धेनूचे दान करायला हवे. सर्व लक्षणांनी युक्त, दूध देणारी गाय, प्रतिवर्ष वत्स देणारी गाय पृथ्वीच्या समान असते. तिच्या दानाने भूमिदानाचे फल मिळते. गायीच्या वधाने मनुष्य रौरव नरकात पडतो. हे सर्व गोमाहात्म्य जो एकदा दुसऱ्यास ऐकवितो त्याच्या सर्व पापांचा नाश होतो. तो देवांसह सर्व आनंदांचा उपभोग घेतो.

## द्विजोचित आचार, तर्पण, शिष्टाचार

श्रेष्ठ ब्राह्मणाने प्रतिदिन थोडी रात्र राहिली असतानाच अंथरुणावरून उठावे. गोविंद, माधव, कृष्ण, हरी, दामोदर, नारायण, जगन्नाथ, वासुदेव, वेदमाता सावित्री, अजन्मा, विभू, सरस्वती, महालक्ष्मी, ब्रह्मा, शंकर, शिव-शंभू, ईश्वर, महादेव, सूर्य, गणेश, स्कंद, गौरी, भागीरथी, शिवा इत्यादी नामांचे स्मरण करावे. यानंतर गावाच्या बाहेर दूर जाऊन साफ-स्वच्छ जागेवर मलमूत्राचा त्याग करावा. रात्रीचा प्रसंग असेल तर दक्षिण दिशेस तोंड करून व दिवसा उत्तरेस तोंड करून शौचविधी करावा. त्यानंतर स्वच्छता करून काडीने दात स्वच्छ करावेत. स्नानआदी करून द्विजाने संध्योपासन करावे. पूर्वाण्ह-

कालात रक्तवर्णा गायत्री, मध्यान्हकालात शुक्लवर्णा सावित्री व सायंकाली श्यामवर्णा सरस्वतीचे विधिपूर्वक ध्यान करावे.

स्नान करताना प्रथम शरीर पाण्याने धुवावे. त्यानंतर मस्तक, ललाट, नासिका, हृदय, भुवया, बाहू, छाती, नाभी, गुडघे, दोन पाय यांना मृतिका लावावी. एकदा लिंगास, तीनदा गुदास, दहा वेळा डाव्या हातास, सात वेळा दोनही हातांना माती लावावी. ही माती घोडे, रथ, भगवान विष्णू यांच्या द्वारे आक्रान्त झालेली व 'वसुंधरे, माझ्या हातून जे दुष्कर्म झाले असेल ते पाप तू दूर कर' अशी प्रार्थना केलेली असावी. हा मंत्र असा आहे;

अश्वक्रान्ते रथक्रान्ते विष्णुक्रान्ते वसुंधरे ।
मृत्तिके हर मे पापं यन्मया दुष्कृतं कृतम् ।।

या मंत्राने जो शरीरास मृत्तिकेचा लेप देईल त्याची सर्व पापे संपतील व तो सर्वथा शुद्ध होईल. त्यानंतर विद्वान पुरुषाने नद, नदी, तलाव, सरोवर, विहीर इत्यादी ठिकाणी जाऊन वेदमंत्रांच्या उच्चारणाने स्नान करावे. नदीच्या जलात प्रवेश करून स्नान करावे. विहिरीवर स्नान असल्यानें काठावर बसून तांब्याने पाणी अंगावर घ्या. सकाळचे स्नान पुण्यदायक असून सर्व पापांना दूर करणारे आहे. सदा प्रातःकाली स्नान करणारा विष्णुलोकात प्रतिष्ठित होतो. प्रातःकाळी व संध्याकाळी चार दंडांपर्यंत पाणी अमृतमय असते. पितरांना ते सुधेप्रमाणे तृप्ती देणारे असते. त्यानंतर हे पाणी मधुसमान होते. त्यानंतर दुधासमान असते. त्यानंतर मात्र पाणी दुग्धमिश्रित असते.

जलाची देवता सर्व लोकांत विष्णूच मानली गेली आहे. जलात स्नान करून जो पवित्र होतो त्याचे कल्याण भगवान विष्णू करतात. एक घोट जल प्राशन करूनही मनुष्य पवित्र होतो. कुशाच्या संसर्गाने जल अमृतापेक्षाही श्रेष्ठ बनते. कुश वा दर्भ सर्व देवांचे निवासस्थान आहे. फार पूर्वी कुशाची निर्मिती ब्रह्मदेवांनीच केली. कुशाच्या मुळात ब्रह्मदेव, मध्यभागी श्रीविष्णू, अग्रभागी भगवान शंकर असतात. हातात कुश धारण करणारा द्विज पवित्र मानला गेला आहे. तो जर कोणत्या तरी स्तोत्राचा, मंत्राचा पाठ करील तर त्याचे महत्त्व चौपटींनी वाढते.

कुश, काश, दूर्वा, जवाचे पान, धानाचे पान, वल्वज, कमल असे सात प्रकारचे कुश आहेत.

तिळाच्या संपर्काने जल अमृतापेक्षाही अधिक स्वादिष्ट होते. स्नान करून जो प्रतिदिन तिलमिश्रित जलाने पितरांना तर्पण करतो तो पितृकुल व मातृकुल यांचा उद्धार करतो. तो ब्रह्मलोकास जातो. वर्षातील चार महिने दीपदान करून पितरांच्या ऋणातून मुक्तता मिळते. जो एक वर्षभर प्रत्येक अमावास्येस पितरांना तिलांनी तर्पण करतो त्याला विनायकपदाची प्राप्ती होते. सर्व देव त्याची पूजा करतात. चंद-सूर्यग्रहणाच्या वेळी गया आदी पुण्य तीर्थांत पितरांना तर्पण केले तर मनुष्यास वैकुंठधामाची प्राप्ती होते. म्हणून कोणत्याही पुण्य दिवशी पितृसमुदायास तर्पण करावे. एकाग्रचित्ताने प्रथम देवांना तर्पण करावे व नंतर पितरांना करावे. श्राद्धाच्या वेळी भोजनास एकाच हाताने अन्न वाढावे. पण तर्पणाच्या वेळी दोनही हातांनी पाणी द्यावे. दक्षिणाभिमुख होऊन पवित्र भावाने ' तृप्यताम् ' असे म्हणून नामगोत्रांचा उच्चार करून पितरांना तर्पण करावे.

मोहवश होऊन जो शुभ्र तिळांनी पितृवर्गास तर्पण करतो त्याचे तर्पण व्यर्थ होते. दाता स्वतः पाण्यात स्थित होऊन त्याने पृथ्वीवर तर्पण केले तर त्याचे ते जलदान व्यर्थ होते. ते कोणालाच पोचत नाही. याच प्रमाणे जमिनीवर उभे राहून जलात तर्पण केले तर ते व्यर्थ होते. ते पितरांना पोचत नाही. जो जलात न्हाऊन भिजलेल्या वस्त्राने तपण करतो त्याने देवांना व पितरांना तृप्त केले असते. विद्वान पुरुष धोब्याने धुतलेले वस्त्र अशुद्ध मानतो. आपल्या हाताने पुन्हा ते वस्त्र धुतले तरच ते शुद्ध होते.

रजकैः क्षालितं वस्त्रमशुद्धं कवयो विदुः ।
हस्तप्रक्षालनेनैव पुनर्वस्त्रञ्च शुद्धयति ।।

सुकलेल्या वस्त्राने पवित्र स्थानावर बसून पितरांना तर्पण केले तर ते दसपटींनी संतुष्ट होतात. जो आपल्या तर्जनीत चांदीची अंगठी धारण करून पितरांना तर्पण करतो, त्याचे तर्पण लाखगुणांनी फलदायी होते. याच प्रकाराने विद्वान मनुष्याने अनामिकेत सोन्याची

अंगठी घालून तर्पण केले तर ते कोटिगुणांनी अधिक फल देणारे ठरते.

जो पुरुष स्नानासाठी निघालेला असतो त्याच्या मागे तहानेने पीडलेले देव, पितर वायुरूप होऊन जलाच्या आशेने फिरत असतात. जेव्हा पुरुष स्नानानंतर धोतर वगैरे पिळून टाकतो तेव्हा ते निराश होऊन मागे परततात. म्हणून पितृतर्पण केल्याशिवाय धोतर पिळून टाकू नये. मनुष्याच्या शरीरावर जे साडेतीन कोटी केस आहेत ते सर्व तीर्थांचे प्रतीक आहे. त्यांना स्पर्श करून धोतरावर जे पाणी गळते ते जणू सर्व तीर्थांचे जल असते. स्नान करणाऱ्या व्यक्तीच्या डोक्यावरून पडणारे पाणी देव पितात, पितर दाढीमिशांतून ढळणारे पाणी पितात, गंधर्व नेत्रांचे, सर्व प्राणी अधोभागाचे जल ग्रहण करतात. देव, पितर, गंधर्व, सर्व प्राणी अशा रीतीने संतुष्ट होतात. स्नानाने शरीरात पाप उरत नाही. प्रतिदिन स्नान करणारा मनुष्य श्रेष्ठ असतो. तर्पण हे स्नानाचेच एक अंग मानावे.

गणेशाची पूजा जो करतो त्यास विघ्न कधी येत नाही. देवांची पूजा केल्यानंतर बलिवैश्वदेव करावा. अग्निकार्य करून ब्राह्मणांना तृप्त करणारा अतिथियज्ञ करावा. देव व प्राणी यांचा भाग दिला की मनुष्य स्वर्गलोकी जातो. म्हणून प्रतिदिन नित्यकर्माचे अनुष्ठान केले पाहिजे. जो स्नान करीत नाही तो मलाचे भोजन करतो. जो जप करीत नाही तो पू व रक्त पितो. जो तर्पण करीत नाही तो पितृघातकी असतो. देवांची पूजा न केल्याने ब्रह्महत्येसमान पाप लागते.

मनुष्य सदाचारानेच आयुष्य, धन, स्वर्ग, मोक्ष यांची प्राप्ती करून घेतो. सदाचार अशुभ लक्षणांचे निराकरण करतो. आचारहीन पुरुष जगात निंदित, सदा दुःख भोगणारा, रोगी व अल्पायुषी बनतो. प्रत्येक दिवशी आपले घर गायीच्या शेणाने सारवावे. त्यानंतर पाट, भांडी, फत्तर यांना धुवावे. कासेचे भांडे राखेने, तांब्याचे आंवट वस्तूने शुद्ध होते. सोने, चांदी यांची भांडी जलानेच शुद्ध होतात. लोखंडी भांडे आगीने तापवून, पाण्याने धुऊन शुद्ध होते. धातूचे पात्र, मणिपात्र, सर्व प्रकारची दगडी भांडी भस्म व मृतिका यांनी शुद्ध होतात. अपवित्र भूमी खोदून, जाळून, लिंपून, धुऊन, पावसाने शुद्ध होते. शय्या, स्त्री,

बालक, वस्त्र, यज्ञोपवीत, कमंडलू हे आपले असतील तरच शुद्ध. दुसऱ्याचे असतील तर कधीच शुद्ध मानू नये. एक वस्त्र धारण करून भोजन व स्नान करू नये. दुसऱ्याने सोडलेले वस्त्र आपण कधी धारण करू नये. केस व दात यांची स्वच्छता सकाळीच करावी.

गुरुजनांना नित्य नमस्कार करावा. दोन हात, दोन पाय, मुख या पाच अंगांना धुऊन भोजन करावे. देव, गुरू, स्नातक, आचार्य, यज्ञ-दीक्षित ब्राह्मण यांच्या छायेवर जाणून बुजून पाय देऊ नये. गायींचा समुदाय, देव, ब्राह्मण, तूप, मधू, प्रसिद्ध वनस्पती यांना उजव्या बाजूस राखून चालावे. गाय-ब्राह्मण, अग्नि-ब्राह्मण, दोन ब्राह्मण, पतिपत्नी यांच्यामधून जाऊ नये. असे जो करील तो स्वर्गात जाऊनही परत खाली येईल. उष्टया हाताने अग्नी, ब्राह्मण, देव, गुरू, स्वतःचे मस्तक, पुष्प धारण करणारा वृक्ष, यज्ञोपयोगी वृक्ष यांना स्पर्श करू नये. सूर्य, चंद्र, नक्षत्र यांना उष्टे मुख कधी दाखवू नये. याच प्रकारे ब्राह्मण, गुरू, देव, राजा, श्रेष्ठ संन्यासी, योगी, धर्मोपदेशक यांनाही उष्टे मुख दाखवू नये.

नदी, समुद्र यांचे किनारे, यज्ञसंबंधी वृक्ष, उद्याने, बगीचे, ब्राह्मणाचे निवासस्थान, गोशाला, साफ-स्वच्छ रस्ते, जल यांत कधी मलत्याग करू नये. पुरुषाने हात, पाय, मुख, केस यांना कोरडे ठेवू नये. दातांवर मळ साठवू देऊ नये. तोंडात नखे घालू नयेत. रविवार व मंगळवार या दिवशी तेल लावू नये. आपले शरीर व आसन यांवर ताल धरू नये. गुरूच्या बरोबर एका आसनावर बसू नये. श्रोत्रियाचे धन कधी अपहरण करू नये. देव व गुरू यांचे धन घेऊ नये. राजा, तपस्वी, पंगू, आंधळा, स्त्रिया यांचे धन कधी घेऊ नये. ब्राह्मण, गाय, राजा, रोगी, भारवाही मनुष्य, गर्भिणी स्त्री, दुर्बल पुरुष यांपैकी कोणीही समोरून आला तर त्याला जाण्यासाठी प्रथम रस्ता द्यावा. राजा, ब्राह्मण, वैद्य यांच्याशी झगडा करू नये. ब्राह्मण व गुरू यांच्या पत्नीपासून दूर असावे. पतित, कोढी, चांडाल, गोमांसभक्षी, समाज-बहिष्कृत यांना दूरच ठेवावे. दुष्ट, दुराचारिणी, निडर, निर्लज्ज, घराबाहेर भटकणारी, अधिक खर्च करणारी, सदाचारहीन अशा स्त्रीचा

दुरूनच त्याग करावा.

बुद्धिमान शिष्याने रजःस्वला अवस्थेत गुरुपत्नीस प्रणाम करू नये. तिच्या चरणांना स्पर्श करू नये. तिचा स्पर्श झाला तरी स्नान करून शुद्ध व्हावे. शिष्याने गुरुपत्नीबरोबर खेळू नये. तिचे म्हणणे ऐकावे, पण तिच्याकडे डोळा वर करून पाहू नये. पुत्रवधू, भावाची पत्नी, आपली कन्या, गुरुपत्नी व अन्य युवती यांच्याकडे पाहू नये. त्यांना स्पर्श करू नये. त्यांच्याकडे भुवया उंचावून पाहणे, त्यांच्याशी वाद घालणे, अश्लील वचन बोलणे या सर्वांचा त्याग करावा. अंगारा, हाडे, राख, कापूस, निर्माल्य, चितेचे लाकूड, चिता, गुरुजनांचे शरीर यांवर कधी पाय देऊ नये. दुष्ट माणसाबरोबर एक क्षणभरही थांबू नये, त्याच्याबरोबर यात्रा कधी करू नये.

आपल्याहून लहान असणाऱ्यांना प्रणाम करू नये. काका व मामा आदी आले की उठून त्यांना आसन द्यावे. त्यांच्या समोर हात जोडून उभे राहावे. स्नान करताना ज्यानें तेल लावले आहे, ज्याचे तोंड व हात उष्टे आहेत, ज्याचे वस्त्र ओले आहे, जो रोगी आहे, समुद्रात जो घुसला आहे, उद्‌विग्न आहे, यज्ञकर्मात आहे, स्त्रियांशी क्रीडा करीत आहे, बालकाशी खेळत आहे, ज्याच्या हातात फुले व कुश आहेत; अशा व्यक्तींना प्रणाम करू नये. मस्तक व कान झाकून, पाण्यात उभे राहून, शेंडी सोडून, पाय न धुता, दक्षिणाभिमुख होऊन कधी आचमन करू नये. यज्ञोपवितरहित, नग्न होऊन, कासोटा सोडून, एक वस्त्र धारण करणारा मनुष्य शुद्ध मानला जात नाही. भिजलेल्या पायांनी झोपणे, सुकलेल्या कोरड्या पायांनी भोजन करणे, अंधारात भोजन व शयन निषिद्ध आहे. पश्चिम व दक्षिण दिशांना तोंड करून दंतधावन करू नये. उत्तर व पश्चिम दिशांकडे तोंड करून कधी झोपू नये.

जो स्वर्गात निवास करून या लोकी पुनः आला आहे त्याच्या हृदयात खाली दिलेले चार सद्‌गुण सदा असतात. उत्तम दान देणे, गोड बोलणे, देवांची पूजाअर्चा करणे, ब्राह्मणांना संतुष्ट राखणे; यांना तो महत्त्व देतो. कंजूष, स्वजनांची निंदा करणारा, मळके वस्त्र पांघरणारा, नीच माणसावर प्रेम करणारा, अत्यंत क्रोधी, कटू बोलणारा, ही

सर्व लक्षणे नरकात राहून आलेल्याची आहेत. नवनीतासमान कोमल वाणी, करुणेने भरलेले कोमल हृदय, ही धर्मबीजापासून निर्माण झालेल्या मनुष्याची चिन्हे आहेत. दयाशून्य हृदय, मर्मस्थान विदीर्ण करणारे कटू वचन, ही पापबीजापासून जन्मास आलेल्या माणसाची लक्षणे होत.

## पितृभक्ती, पातिव्रत्य, पंचमहायज्ञ

या जगात पुण्याहून पुण्यतम, सर्व धर्मांत उत्तम, सर्वोत्तम अनुष्ठान असे काय आहे ? ऋषींच्या या प्रश्नास व्यासांनी उत्तर दिले आहे. त्यांनी त्यांच्यासाठी पाच धर्मांची आख्याने ऐकविली. यांपैकी एकाचेही अनुष्ठान करून मनुष्यास सुयश, स्वर्ग, मोक्ष यांना मिळविता येईल. माता-पित्यांची सेवा, पतीची सेवा, सर्वांसाठी समभाव, मित्रांशी द्रोह न करणे व भगवान श्रीविष्णूंचे भजन करणे हे पाच महायज्ञ आहेत.

माता व पिता यांचे पूजन करून मनुष्य ज्या धर्माचे साधन करतो तो यज्ञ, तीर्थयात्रा करूनही दुर्लभ आहे. पिता धर्म आहे. पिता स्वर्ग आहे. पिता हीच सर्वोत्कृष्ट तपस्या आहे. पिता प्रसन्न असला की, सर्व देव प्रसन्न राहातात. ज्याच्या सेवेने व सद्‌गुणांनी मातापिता संतुष्ट होतात त्या पुत्रास प्रतिदिन गंगास्नानाचे फल मिळते. माता सर्व-तीर्थमयी आहे. पिता सर्व देवांचे स्वरूप आहे. म्हणून सर्व प्रयत्न करून माता-पित्यांची सेवा केली पाहिजे. जो मातापित्यांना प्रदक्षिणा करतो त्यांनी खरे म्हणजे सात द्वीपांनी युक्त अशा पृथ्वीची प्रदक्षिणा होते. मातापिता यांना प्रणाम करताना ज्याचे हात, गुडघे, मस्तक पृथ्वीवर लागते तो अक्षय स्वर्गाचा धनी होतो.

**जानुनी च करौ यस्य पित्रोः प्रणमतः शिरः ।**
**निपतन्ति पृथिव्यां च सोऽक्षयं लभते दिवम् ॥**

जोपर्यंत मातापित्यांच्या चरणांची धूळ पुत्राच्या मस्तकास व शरीरास लागत आहे तोपर्यंतच तो शुद्ध असतो. माता-पित्यांच्या चरणांचे जल जो पुत्र पितो त्याच्या कोटयवधी जन्मांची पापे नष्ट होतात. तोच मनुष्य या जगात धन्य आहे. जो नीच पुरुष माता-पित्यांची आज्ञा मानीत नाही, तो महाप्रलयापर्यंत नरकात पडतो. जो रोगी,

वृद्ध, जीविकारहित, अंध, बहिऱ्या पित्यास सोडून जातो तो रौरवनरकात पडतो.

**रोगिणं चापि वृद्धञ्च पितरं वृत्तिकर्शितम् ।**
**विकलं नेत्रकर्णाभ्यां त्यक्त्वा गच्छेच्च रौरवम्**

त्याला अंत्यज, म्लेच्छ, चांडाल यांच्या योनींत जन्म घ्यावा लागतो. माता व पिता यांचे पालन न करण्याने सर्व पुण्यांचा नाश होतो. माता-पित्यांची आराधना न करता केलेली तीर्थयात्रा सफल होत नाही.

फार पूर्वीची एक हकीगत आहे. नरोत्तम नावाचा एक ब्राह्मण होता. तो आपल्या मातापित्यांना अनादर दाखवून तीर्थयात्रा करण्यासाठी निघून गेला. सर्व तीर्थांची यात्रा करणाऱ्या या ब्राह्मणाचे वस्त्र प्रतिदिन आकाशातच वाळत असे. याचा त्याला फार मोठा अहंकार वाटायचा. तो स्वतःस फार मोठा समजायला लागला. आपल्यासारखा पुण्यात्मा व महायशस्वी दुसरा कोणीच नाही,असे तो मानू लागला.एकदा आकाशात तोंड करून तो असेच काही तरी म्हणत असताना एका बगळयाने त्याच्या मुखावर विष्ठा केली. तेव्हा ब्राह्मणाने क्रोधाने त्या पक्ष्यास शाप दिला. बिचारा बगळा राखेचा ढीग होऊन खाली जमिनीवर पडला. बगळयाचा मृत्यू झाल्यावर नरोत्तमात महामोहाने प्रवेश केला. त्या पापामुळे त्याचे वस्त्र आता आकाशात अधांतरी राहून सुकेनासे झाले. याचा त्याला फार खेद झाला. त्यावेळी आकाशवाणी झाली, 'ब्राह्मणा, तू परमधर्मातमा. मूक चांडालापाशी जा. तिथं गेल्यानं तुला धर्माचं ज्ञान होईल.'

ही आकाशवाणी ऐकून ब्राह्मण मूक चांडालाच्या घरी गेला. त्याने तेथे पाहिले, तो चांडाल सर्व प्रकारे आपल्या माता-पित्यांची सेवा करीत होता. थंडी असली की तो माता-पित्यांना स्नानासाठी गरम पाणी देई. त्यांचे अंग तेलाने रगडून देई. त्यांना भोजनानंतर तो पान देई. गरम कपडे देत होता. प्रतिदिन तो त्यांच्यासाठी मिष्टान्न तयार करी. वसंत ऋतूत त्यांना सुगंधी फुलांची माळ घाली. गर्मीचे दिवस आले की, तो चांडाल आपल्या माता-पित्यांना पंखा हालवून वारा घाली. अशी

त्यांची प्रतिदिन सेवा झाली की मग तो भोजन करी. मातापित्यांची थकावट दूर करणे हेच त्याचे एक काम होते. या पुण्यकर्मांमुळे त्या मूक चांडालाचे घर कोणताही आधार नसताना आकाशात अधांतरी स्थित झाले होते. त्याच्या मातृपितृ-भक्तीवर संतुष्ट होऊन त्रिभुवनाचे स्वामी भगवान श्रीहरी मनोहररूप धारण करून नित्य त्याच्या घरी क्रीडा करीत. हे सर्व पाहून त्या ब्राह्मणास मोठा विस्मय वाटला. त्याने त्या मूक चांडालास विचारले,

'तू माझ्यापाशी ये. मी तुला तुझ्या हिताची गोष्ट सांगतो.'

'विप्रा, मी यावेळी माझ्या मातापित्यांची सेवा करीत आहे. मी आपणांकडे कसा येऊ ? यांची प्रथम पूजा करून मग मी आपणांकडे येईन. तोपर्यंत आपण माझ्या दारातच थांबावं. मी आपला अतिथि-सत्कार चांगला करीन.'

चांडालाचे हे बोलणे ऐकून तो ब्राह्मण चांगलाच संतापला व म्हणाला.

'मजसारख्या ब्राह्मणाची सेवा सोडून दुसरं कोणतं महत्त्वाचं कार्य आहे ?'

'बाबा, उगाच का कोपता ? मी काही बगळा नाही. आपल्या क्रोधाचा परिणाम फक्त बगळ्यावर होईल. दुसऱ्या कुणावर नाही होणार. आता तर आपलं धोतर आकाशात सुकत नाही. आपण आकाशवाणी ऐकून माझ्या घरी आला आहात. थोडं थांबावं. मी आपल्या प्रश्नाचं उत्तर देईन. अथवा आपण पतिव्रता स्त्रीकडे जावं. द्विजश्रेष्ठा, पतिव्रता स्त्रीच्या दर्शनानं आपलं अभीष्ट पूर्ण होईल.'

त्यानंतर त्या चांडालाच्या घरी वावरणाऱ्या विष्णुरूपी ब्राह्मणाने त्या द्विजास म्हटले, 'चल, मी तुला पतिव्रतेचं घर दाखवितो.' द्विजश्रेष्ठ नरोत्तम थोडा विचार करून त्याच्याबरोबर निघाला. रस्त्याने त्याने ब्राह्मणास विचारले,

'विप्रवर, आपण या चांडाळाच्या घरात कशासाठी राहाता ?' त्यावर श्रीविष्णुरूपी ब्राह्मण म्हणाला, 'विप्रा, यावेळी तुझं हृदय शुद्ध नाही. प्रथम पतिव्रतेचं दर्शन घे. त्यानंतर तुला सर्व काही समजेल.'

त्यावर ब्राह्मणाने विचारले, 'तात, ही पतिव्रता कोण आहे ? तिचं शास्त्रज्ञान किती मोठं आहे ? मी तिच्याकडे कशासाठी जाऊ ?' त्यावर त्याला भगवान म्हणाले, 'ब्राह्मणा, नद्यांत गंगा, स्त्रियांत पतिव्रता व देवांत विष्णू श्रेष्ठ आहे. जी पतिव्रता नारी प्रतिदिन आपल्या पतीच्या हितात तत्पर राहिली, तिनं आपल्या पितृकुलाचा व पतिकुलाचा शंभर पिढयांचा उद्धार केला आहे.'

**पतिव्रता च या नारी पत्युर्नित्यं हिते रता ।**
**कुलद्वयस्य पुरुषानुद्धरेत्सा शतं शतम् ।।**

यावर ब्राह्मणाने विचारले, 'अशी कोणती पतिव्रता आहे ? पतिव्रतेचं लक्षण काय आहे ? आपण मलाही सर्व सांगावं.'

भगवंतांनी त्याला पतिव्रतेचे वर्णन करून सांगितले. जी स्त्री पुत्राच्या अपेक्षेने पतीची आराधना शंभरपटींच्या स्नेहाने करते, राजाच्या प्रमाणे ती त्याचे भय मानते, पतीस भगवानरूप मानते ती पतिव्रता समजावी. जी गृहकार्यात दासी, रमणकाली वेश्या, भोजनाच्या वेळी आईसमान, विपत्तीच्या वेळी प्रामाणिक मंत्र्याप्रमाण सल्ला देते ती स्त्री पतिव्रता आहे. ती आपल्या पतीची आज्ञा कधीच मन, वाणी, शरीर, क्रिया यांनी भंग करीत नाही. पतीचे भोजन झाल्यानंतर जी भोजन करते. त्या स्त्रीला पतिव्रता म्हणावे. द्विजा,

**कार्ये दासी रतौ वेश्या भोजने जननीसमा ।**
**विपत्सु मन्त्रिणी भर्तुः सा च भार्या पतिव्रता ।।**
**भर्तुराज्ञां न लंघेद्या मनोवाक्कायकर्मभिः ।**
**भुक्ते पतौ सदा चात्ति सा च भार्या पतिव्रता ।।**

ज्या शय्येवर पती शयन करतो त्यावरच ती त्याची नित्य पूजा करते. पतीच्याबद्दल तिच्या मनात कधीच शंका नसते. कधी कृपणता नसते. पतीपासून आदर मिळो, न मिळो, दोनही तिला समान वाटतात. अशीच स्त्री पतिव्रता असते. ही साध्वी स्त्री सुंदर वेषधारी परपुरुषास पाहून स्वतःचा भाऊ, पिता, पुत्र, त्याला मानते तीच पतिव्रता. अशा पतिव्रतेकडे जावे असे भगवंतांनी त्या ब्राह्मणास सुचविले. अशा या रूपवती पतिव्रतेचे नाव शुभा. ही दयामयी आहे. यशस्विनी आहे. अशी

माहिती भगवंतांनी त्याला दिली.

तो ब्राह्मण शोधत शोधत त्या पतिव्रता स्त्रीच्या घराशी गेला. अतिथी दाराशी आला हे पाहून पतिव्रता दारात आली. तिला पाहून तो म्हणाला,

‘ देवी, तू मला काही प्रिय व हिताचं सांगतेस ?’

‘ ब्रह्मन्, या वेळी मला माझ्या पतिदेवांची पूजा करायची आहे. आता वेळ नाही. मी आपलं काम नंतर करीन. आपण माझं आतिथ्य मात्र ग्रहण करावं.’

‘ कल्याणी, या वेळी माझ्या शरीरात भूक नाही, तहान नाही, थकावट नाही. मला जे काही अभीष्ट आहे ते सांग. नाहीतर मी तुला शाप देईन.’

‘ द्विजश्रेष्ठा, मी काही वगळा नाही. तू धर्म तुलाधाराच्या पाशी जा. त्याला तू तुझ्या हिताची गोष्ट विचार.’

इतके म्हणून ती महापतिव्रता घरात निघून गेली. तो विप्ररूप-धारी भगवान त्या द्विजाला पुन्हा तेथे दिसला. त्याने त्यांना विचारले, ‘ तात, या देशास त्या देशाची वार्ता कशी समजली ? त्या पतिव्रतेनंही सांगितलं. चांडालानंही सांगितलं. त्यांना या घटनेची माहिती कशी झाली ? मला या सर्वांचं नवल वाटतं.’

‘ महात्मा पुरुषांना सदाचार व पुण्य यांनी सर्व काही समजतं. मुने, मला सांग, त्या पतिव्रतेनं तुला काय सांगितलं ?’

‘ ती म्हणाली, धर्म तुलाधारास विचारावं. तो सर्व सांगेल.’

‘ मुने, ये माझ्याबरोबर, मी तुलाधाराचं घर दाखवितो.’

‘ भगवन्, हा तुलाधार कुठं राहातो ?’

‘ जिथं माणसांची एकच गर्दी आहे. जिथं नाना प्रकारच्या द्रव्यांची विक्री होत आहे. त्याच ठिकाणी तो तुलाधार वैश्य इकडं तिकडं खरेदीविक्रीचा व्यवहार करीत असेल. त्यानं कधी मन, वाणी, क्रिया द्वारे कुणास दुखावलं नाही. कधी तो असत्य बोलला नाही, की कधी त्यानं कुणाचं नुकसान नाही केलं. कधी त्यानं दुष्टता नाही केली. तो सर्वांचं हित पाहातो. सर्व प्राण्यांबद्दल त्याच्या मनात समभाव आहे.

बाजारातील लोक जव, मीठ, तेल, तूप, धान्य इत्यादी वस्तू त्याच्या सांगण्यावरूनच देतात, घेतात. प्राणान्त आला तरी तो कधी असत्य बोलणार नाही. म्हणूनच त्याला धर्म तुलाधार असं म्हणतात.'

ब्राह्मणाने भरलेल्या बाजारात पदार्थ विकत असताना तुलाधारास पाहिले. तो विक्रीच्या वस्तूसंबंधी बोलत होता. अनेक स्त्री-पुरुष त्याच्याभोवती उभे होते. ब्राह्मणास पाहून तो मधुर वाणीने म्हणाला,

'ब्रह्मन्, आपण इथं कसे आलात ?'

'मला धर्माचा उपदेश हवाय. यासाठी मी इथं आलो आहे.'

'ब्रह्मन्, जोपर्यंत हे लोक माझ्याभोवती आहेत तोपर्यंत मी निश्चित नाही होणार. रात्री उशिरापर्यंत हीच परिस्थिती राहील. आता तुम्ही धर्माकराच्याकडे जावं. वगळचाच्या मृत्यूनं होणारा दोष, आकाशात धोतर सुकण्याचं रहस्य या सर्व गोष्टी आपणांस पुढं समजतील. धर्माकराचं नाव अद्रोहक आहे. तो मोठा सज्जन आहे. त्याच्यापाशी आपण जावं. आपणांस उपदेश तिथं मिळेल.'

इतके म्हणून तुलाधार वैश्य पुन्हा विक्रीच्या उद्योगात रमला. नरोत्तमाने त्या विप्ररूपधारी भगवानांना विचारले, 'तात, आता मी तुलाधाराच्या सांगण्यानुसार सज्जन अद्रोहकाच्याकडे जाईन. पण मला त्याचं घर नाही माहीत !'

'चल. मी तुला त्याचं घर दाखवितो.' ब्राह्मण भगवंताबरोबर निघाला. वाटेत त्याने एक प्रश्न विचारला, 'तात, हा तुलाधार कधी देवांसाठी, ऋषींसाठी, पितरांसाठी तर्पण करीत नाही. मग माझा वृत्तान्त याला कसा माहीत ? मला याचा मोठाच विस्मय वाटला.'

'ब्रह्मन्, त्यानं सत्य व समता यांच्या साह्यानं तीन लोकांना जिंकलं आहे. म्हणून त्याच्यावर पितर, देव, मुनी सर्व संतुष्ट आहेत. तो याच गुणांनी भूत, भविष्य काळांतील सर्व गोष्टी जाणतो. सत्यापेक्षा मोठा धर्म नाही..असत्यासारखं मोठं पाप नाही. जो पुरुष पापरहित आहे, समभावात स्थित आहे, ज्याचं चित्त शत्रू, मित्र यांच्याविषयी उदासीन आहे, त्याच्या सर्व पापांचा नाश होतो व तो भगवान विष्णूंच्या सायुज्यतेस पोचतो. समताच धर्म, समताच थोर तपस्या आहे. ही

ज्याच्या चित्तात स्थिरावली आहे तोच सर्व लोकांत श्रेष्ठ, योग्यांत गणना करावी असा योग्य व निर्लोभी होतो. त्या पुरुषात सत्य, इंद्रिय-संयम, मनोनिग्रह, धीरता, स्थिरता, निर्लोभता, आलस्यहीनता हे सर्व गुण प्रतिष्ठित होतात. समतेच्या प्रभावानं धर्मज्ञ पुरुष देवलोक व मनुष्यलोक यांतील सर्व वृत्तान्त जाणतो. त्याच्या देहात प्रत्यक्ष भगवान श्रीविष्णू विराजमान असतात. सत्य व सरलता या दोन गुणांत त्याच्या-एवढा थोर दुसरा कुणी असत नाही. तो साक्षात धर्माचंच स्वरूप असल्यामुळं तो या जगतासही धारण करतो.'

'विप्रवर, आपण आता कृपा करून हा तुलाधार वैश्य सर्वज्ञ कसा झाला हे सांगितलंत. आता मला अद्रोहकासंबंधी सांगावं.'

'विप्रा, फार पूर्वीची गोष्ट आहे. एका राजपुत्राची स्त्री मोठी कुलवती, सुंदर व तरुण होती. ती कामदेवाची पत्नी रती व इंद्राची पत्नी शची यांच्याप्रमाणे मन हरण करून घेणारी होती. राजकुमाराचं तिच्यावरचं प्रेम प्राणापेक्षा अधिक होतं. त्या सुंदर भार्येचं नाव पण सुंदरी होतं. एके दिवशी राज्यकार्याच्या निमित्तानं राजकुमारास बाहेर-गावी जाण्याचा प्रसंग आला. त्यानं मनात विचार केला, 'या माझ्या प्राणाहून प्रिय असणाऱ्या भार्येस कुठं ठेवू ? हिच्या सतीत्वाचं रक्षण कसं होईल ?' या विचारांच्या चिंतनात राजकुमार रात्रंदिवस होता.' भगवानांनी या राजपुत्राची सर्व कथा त्या विप्रासाठी निवेदन केली.

तो राजकुमार अद्रोहाच्या घरी आला व म्हणाला, 'माझ्या पत्नीस आपल्या घरी ठेवू ?'

'तात, मी आपला पिता नाही, बंधू नाही. मी आपला बांधव नाही. आपली व माझी तशी मैत्रीही नाही. असं असताना आपण पत्नीला माझ्या घरी कसं ठेवता ? माझ्या घरी हिला ठेवून आपण निश्चित कसे व्हाल ?'

'महात्मन्, या जगात आपणांएवढा धर्मज्ञ व जितेन्द्रिय पुरुष दुसरा कोण आहे ?'

'भय्या, मला दोष देऊ नकोस. या त्रिभुवनमोहिनी भार्येचं रक्षण करण्यास कोण पुरुष समर्थ होईल ?'

'मी सर्व गोष्टींचा नीट विचार केला आहे. ही आपल्याच घरी राहील. मी जातो.'

'बंधो, या शोभासंपन्न नगरात पुष्कळ कामी पुरुष आहेत. इथं स्त्रीच्या सतीत्वाचं रक्षण मी कसं करू?'

'जसं होईल तसं रक्षण करा. मी तर आता जातो.'

गृहस्थ अद्रोहक धर्मसंकटात सापडून म्हणाला,

'मी उचित व हितकारी समजून हिच्याबरोवर नेहमी अनुचित वर्तन करीन. अशाच अवस्थेत ही स्त्री माझ्या घरी सुरक्षित राहील. अन्यथा तू या स्त्रीच्या रक्षणाची दुसरी काही व्यवस्था कर. हिला माझ्याच शय्येवर माझ्या पत्नीबरोबर माझ्या शेजारी झोपावं लागेल. तरीसुद्धा आपण हिला आपली वल्लभा समजावं. तरच ती राहू शकेल.'

'तात, मला आपलं म्हणणं मंजूर आहे. आपणांस जे जे अनुकूल व योग्य वाटेल ते करावं.' इतके बोलून तो राजकुमार आपल्या पत्नीला म्हणाला, 'सुंदरी, तू याच्या सांगण्यानुसार वाग. तुझ्यावर कोणताच दोष येणार नाही.' तो राजकुमार निघून गेला. तेव्हा रात्री अद्रोहकाने जसे सांगितले तसेच केले. तो धर्मात्मा दररोज रात्री त्या दोनही स्त्रियांच्या मध्ये झोपू लागला. तरी तो आपली व परकी स्त्री यांबद्दल धर्मापासून कधी विचलित झाला नाही. स्वतःच्या स्त्रीच्या स्पर्शानेच त्याची कामभावना जागी व्हायची. इकडे राजकुमारीच्या स्तनांची बोचणी वारंवार त्याच्या पाठीला व्हायची. पण बालकाचा आईबद्दल जसा भाव असावा तसाच तो याही बाबतीत होता. तिच्याबद्दल मातृभाव दृढ होत गेला. क्रमशः त्याची स्त्रीसंभोगाची इच्छाही कमी झाली. सहा महिने गेल्यानंतर राजकुमार परत नगरात आला. अद्रोहकाच्या घरी येऊन त्यानें चौकशी करण्याचे ठरविले. प्रथम त्याने लोकांपाशी चौकशी केली. लोकांनी स्वतःच्या रुचीनुसार त्याला उत्तरे दिली. काही त्याला म्हणाले, 'भाई, तुम्ही आपली पत्नी त्याच्या घरी सोपविली. तो तर तिच्याबरोबर शयन करतो. स्त्री व पुरुष यांचा एकत्र संसर्ग वाढला की दोघांचीही मनं शांत कशी राहातील?'

आपल्या धर्मबलाने अद्रोहकाने ही लोकांची चर्चा समजावून

घेतली. लोकनिंदेपासून मुक्त व्हावे म्हणून त्याने एक उपाय केला. त्यानें थोडी लाकडे जमवून स्वतःच त्यांची एक चिता पेटविली. चिता प्रज्वलित झाली. याच वेळी राजकुमार अद्रोहकाच्या घरी आला. तेथे त्यानें अद्रोहकास व स्वतःच्या पत्नीस पाहिले. पत्नीचे मुख प्रसन्नतेनें उजळले होते. पण अद्रोहक मात्र विषादयुक्त होता. त्या दोघांची मानसिक स्थिती जाणून राजकुमाराने विचारले, 'भाई, मी आपला मित्र आहे. फार दिवसांनी घरी आलो आहे. आपण माझ्याशी भाषण का नाही करीत?' त्यावर तो अद्रोहक म्हणाला, 'मित्रा, मी आपल्याच हितासाठी दुष्कर्म केलं. ते लोकनिंदेनं व्यर्थ झालं आहे. आता मी अग्नीत्र प्रवेश करणार आहे. सर्व देव व मनुष्य माझ्या कार्यास पाहातील.'

इतके म्हणून त्या अद्रोहकाने अग्नीत प्रवेश केला. पण अग्नीनें त्याच्या शरीरास, वस्त्रांस, केसांना धक्काही लावला नाही. आकाशात असणाऱ्या देवांनी त्याचा प्रसन्न होऊन जयजयकार केला. सर्वांनी चारही बाजूंनी त्याच्यावर फुलांचा वर्षाव केला. ज्या ज्या लोकांनी राजकुमाराची पत्नी व अद्रोहक यांच्यासंबंधी कलंकपूर्ण गोष्टी केल्या त्यांच्या मुखांवर कोड उमटले. देवांनी प्रसन्न होऊन अद्रोहकास अग्नीतून बाहेर काढले व त्याची दिव्य फुलांनी पूजा केली. त्याचे चरित्र ऐकून सर्व मुनींनाही आश्चर्य वाटले. सर्वांनी त्याचे नाव सज्जनाद्रोहक असे ठेवले. त्याच्या चरणधूलीने पवित्र झालेली भूमी अधिक धान्य उपजवू लागली.

या अद्रोहकाच्या घरी जाऊन ब्राह्मणाने त्याचे दर्शन घेतले. त्यास धर्ममय उपदेश ऐकविण्याची विनंती केली. सज्जनाद्रोहक म्हणाला,

'धर्मज्ञ ब्राह्मण, आपण पुरुषांत श्रेष्ठ असणाऱ्या वैष्णवाकडं जावं. त्याच्या दर्शनानं आपला मनोरथ पूर्ण होईल. बगळ्याचा मृत्यू व आकाशात तरंगणारे वस्त्र, ते न सुकण्याचं कारण इत्यादी गोष्टी आपणांस त्यांच्याकडे समजतील. आपल्या हृदयातील आणखीही कामना पूर्ण होतील.'

त्यानंतर तो ब्राह्मण द्विजरूपधारी भगवानांच्या सह प्रसन्नवृत्तीने एका वैष्णवाच्या घरी आला. त्याने समोर बसलेला एक शुद्ध हृदयाचा

तेजस्वी पुरुष पाहिला. तो सर्व शुभ लक्षणांनी संपन्न असून त्याचे तेज विशेष प्रकारचे होते. या ध्यानमग्न हरिभक्तास तो ब्राह्मण म्हणाला, ‘महात्मन्, मी फार दूरवरून आपणांकडे आलो आहे. मला आपण उचित अशा कर्तव्याचा उपदेश करावा.’ त्यावर वैष्णव म्हणाला, ‘देवांत श्रेष्ठ असणारे भगवान विष्णू तुझ्यावर प्रसन्न आहेत. यावेळी तुला पाहून माझं हृदय उल्हसित झालं आहे. आजच तुझा मनोरथ सफल होईल. माझ्या घरातच आज भगवान विष्णू विराजमान आहेत.’ ब्राह्मणाने यानंतर विचारले, ‘भगवान विष्णू आहेत कुठं ? आपण कृपा करून मला त्याचं दर्शन घडवावं.’ तेव्हा वैष्णव त्याला म्हणाला, ‘या सुंदर देवालयात प्रवेश करून तू परमेश्वराचं दर्शन घे. असं करण्यानं जन्म व मृत्यू यांच्या बंधनांतून तू सुटशील.’

ब्राह्मणाने वैष्णवाने सांगितलेल्या मंदिरात प्रवेश केला. त्याला साथ देणारे तेच विप्ररूपधारी भगवान कमलाच्या आसनावर विराजमान होते. ब्राह्मणानें मस्तक झुकवून त्यांना प्रणाम केला. मोठ्या प्रसन्नतेने त्याने त्यांचे दोनही चरण पकडून म्हटले, ‘देवेश्वर, आपण माझ्यावर प्रसन्न व्हावं. मी आपणांस इतके दिवस ओळखलं नाही. प्रभो, मी या लोकात व परलोकातही आपलाच किंकर म्हणून राहीन. मधुसूदना, आपण आता माझ्यावर कृपा करावी. मी आपलं साक्षात स्वरूप पाहू इच्छितो.’

‘भूदेवा, तुझ्यावर माझं प्रेम सदा आहे. मी स्नेहानं वश होऊनच या पुण्यात्म्यांचं दर्शन तुला घडविलं. पुण्यवान महात्म्यांचं एकदा दर्शन, त्यांचा स्पर्श, त्यांचं ध्यान, त्यांचं नामोच्चारण यांनी मनुष्यास अक्षय स्वर्गसुखाचा लाभ होतो. महापुरुषांचा नित्य संग जडला तर सर्व पापांचा नाश होईल. मनुष्य अनंत सुखं भोगून माझ्या स्वरूपात लीन होईल. जो मनुष्य पुण्यतीर्थात स्नान करून शंकर व पुण्यात्मा पुरुषांचे आश्रम यांचं दर्शन घेतो तो माझ्या शरीरातच लीन होतो. एकादशीस उपवास करून लोकांसमोर जो पुण्यमय कथा सांगतो तो मलाच येऊन मिळतो. माझं चरित्र श्रवण करीत जो रात्रभर जागतो त्याचाही माझ्या शरीरात प्रवेश होतो. ज्याचं मन तपस्वी, राजा, गुरुजन यांचा

कधी द्रोह करीत नाही तोही माझ्यातच लीन होतो. तू आता माझा भक्त आहेस. तू तीर्थस्वरूप आहेस. पण तू बगळचास शाप देऊन त्याच्या मृत्यूस कारण झालास. त्या दोषातून तुझी सुटका करण्यासाठी मी तिथं उपस्थित झालो. तुला त्या महात्मा चांडालाचं दर्शन घडविलं. त्या सर्व महात्म्यांचं दर्शन तू माझ्यावरोबर घेतलंस. आज तू या मंदिरात आलास. कोटचवधी जन्मानंतर पाप नष्ट होऊन माझं दर्शन होतं. वत्सा, तू आज माझं दर्शन घेतलंस. तुला जो हवाय तो वर तू माग.'

'नाथ, माझं मन सर्वथा आपल्याच ध्यानात स्थिर राहावं. सर्व लोकांच्या स्वामी, माधवा, आपणांशिवाय दुसरी कोणतीच वस्तू मला प्रिय वाटत नाही.'

'निष्पाप ब्राह्मणा, तुझी बुद्धी अशीच नेहमी उत्तम विचारांनी जागृत राहावी. यासाठी तू माझ्या धामात येऊन माझ्यासारखे सर्व दिव्य उपभोग भोग. पण तुझ्या मातापित्यांना सुख नाही. प्रथम तू त्यांची पूजा कर. त्यानंतर तुला माझ्या स्वरूपाचं ज्ञान होईल. त्यांच्या दु:खपूर्ण उच्छ्वासांनी व क्रोधानं तुझी सारी तपस्या नष्ट झाली आहे. ज्या पुत्रावर सदा मातापित्यांचा कोप होतो त्याला नरकात जावं लागतं. त्याला मी, ब्रह्मदेव, महादेव यांनाही वाचविता येत नाही. यासाठी तू आधी मातापित्यांपाशी जा, त्यांची मनोभावे पूजा कर, त्यांच्याच कृपेनं तू माझं स्वरूप प्राप्त करून घेशील.'

ब्राह्मणाच्या आग्रहावरून भगवान विष्णूंनी त्याला दर्शन दिले. शंख, चक्र, गदा, पद्म या आयुधांनी युक्त अशा पुरुषोत्तमांचे त्याला दर्शन झाल्याने तो अत्यंत हर्षित झाला. त्याने भगवंतांना प्रणाम करून म्हटले,

'जगदीश्वरा, आज माझा जन्म सफल झाला. आज माझे डोळे कल्याणमय झाले. आज माझे दोनही हात प्रशस्त झाले. मी आज धन्य झालो. माझे पूर्वज सनातन ब्रह्मलोकात जात आहेत. जनार्दना, आज आपली कृपा झाली आणि माझे बंधुबांधव आनंदित झाले. यावेळी माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले. परंतु नाथ, मूक चांडाल आदी ज्ञानी महात्म्यांची वाणी ऐकून मला भारी आश्चर्य वाटलं. त्यांना माझा सर्व वृत्तान्त कसा

समजला ? आपण त्या चांडाळाच्या, पतिव्रतेच्या, तुलाधाराच्या, मित्रा-द्रोहकाच्या भवनात, या मंदिरात आहात. या सर्वांचं रहस्य काय ? कृपा करून मला सांगाल ?'

'विप्रवरा, तो मूक चांडाळ सदा आपल्या माता-पित्यांची भक्ती करतो. शुभादेवी पतिव्रता आहे. तुलाधार सत्यवादी आहे. अद्रोहकानं लोभ व काम यांवर विजय मिळविला आहे. वैष्णव तर माझा भक्त आहे. या सद्‌गुणांवर प्रसन्न होऊन मी त्यांच्या घरी आनंदानं निवास करतो. माझ्याबरोबर सरस्वती व लक्ष्मी यांचाही निवास असतो. मूक चांडाळ त्रिभुवनाचं कल्याण करतो. चांडाळ असूनही तो सदाचारी आहे. म्हणून देव त्याला ब्राह्मण मानतात. त्या मूक चांडाळाची समनता राखणारा या जगात दुसरा कुणीच नाही. तो नेहमी आपल्या माता-पित्यांच्या सेवेत रमलेला असतो. त्यानं तीनही लोकांना जिंकलं आहे. त्याची माता-पित्यांवरील भक्ती पाहून मी फारच संतुष्ट झालो आहे. म्हणूनच मी त्याच्या घरी सर्व देवांसह ब्राह्मणरूपानं निवास करतो. याच प्रकारानं मी त्या पतिव्रतेच्या, तुलाधाराच्या, अद्रोहकाच्या, वैष्णवाच्या घरी सदा निवास करतो. धर्मज्ञा, मी एका क्षणासाठीही त्यांचं घर सोडीत नाही. जो पुण्यात्मा आहे त्यालाच माझं दर्शन होतं. तू तुझ्या पुण्याच्या प्रभावानं माझं दर्शन घेतलंस. त्या महात्म्यांचं वर्णन ऐकूनच मनुष्य जन्म-मृत्यूंच्या बंधनातून मुक्त होतो. देवांतही माता व पिता यांच्यापेक्षा मोठं तीर्थ नाही. माता-पित्यांची आराधना करणाराच श्रेष्ठ पुरुष असतो. तोच माझ्या हृदयात राहातो व मी त्याच्या हृदयात निवास करतो. आम्हा दोघांत अंतर काहीच नसतं. इहलोकात व पर-लोकातही ते माझ्या समान पूज्य असतात. ते आपल्या बंधुबांधवांसह माझ्या रमणीय धामास येऊन लीन होतात. माता-पित्यांची आराधना करूनच तो नरश्रेष्ठ मूक चांडाळ तीनही लोकांतील वृत्त जाणतो. यात तुला विस्मय वाटण्याजोगं काय आहे ?'

'जगदीश्वरा, मोह व अज्ञानवशहोऊन मी प्रथम माता-पित्यांची सेवा केली नाही. आता पुन्हा सेवा करण्यासाठी मी काय काय करू ?'

'विप्रा, एक वर्ष, एक मास, एक पक्ष, एक सप्ताह, एक दिवसही

जो आपल्या माता-पित्यांची भक्तिपूर्वक सेवा करील तो माझ्या धामास येऊन पोचतो. त्यांच्या मनास जो कष्ट देतो तो नरकात जातो. ज्यानं पहिल्यानं मातृ-पितृसेवा केलेली नाही त्यानं सांड सोडला तर त्याला पितृ-भक्तीचं फल मिळतं. जो बुद्धिमान पुत्र आपलं सर्वस्व अर्पून माता-पित्यांचं श्राद्ध करतो त्याला जातिस्मराचा म्हणजे पूर्वजन्मीच्या आठ-वणींचा लाभ होतो. श्राद्धाखेरीज दुसरा महायज्ञ जगात नाही. यात दिलेलं दान अक्षय होतं. गंगेच्या जलात, गया, प्रयाग, पुष्कर, काशी, सिद्धकुंड, गंगासागरसंगम या क्षेत्रांत पितरांसाठी केलेलं अन्नदान मुक्ती वा स्वर्ग देणारं ठरतं. प्रत्येक पर्वास पुत्रानं प्रसन्नतापूर्वक पार्वण श्राद्ध केलं पाहिजे.'

भगवानांनी पितृश्राद्धाचे सविस्तर वर्णन ब्राह्मणासाठी केले. पिता-माता जिवंत असताना त्यांची सेवा कशी करावी यासंबंधीही त्यांनी ब्राह्मणास खूप सांगितले. पित्यास देवासमान मानून त्याची पूजा करावी. मनानेही त्याच्या आज्ञेचे उल्लंघन करू नये. जो पुत्र रोगी पित्याची सेवा करतो त्याला अक्षय स्वर्गाची प्राप्ती होते. पिता मरणासन्न असतानाही त्याची पूजा करावी. धनहीन माणसाने पितृसेवा कशी करावी याचेही मार्गदर्शन आहे. तृण व काष्ठ मिळवून, कवडी कवडी जमवून जो पितृ-कार्य करतो त्याचे फल लाखपटींनी वाढते. फार पूर्वीची एक हकीगत आहे. विराट देशात एक अत्यंत दीन मनुष्य राहात होता. एकदा त्याच्या पित्याची श्राद्धतिथी आली. श्राद्धाला लागणाऱ्या सर्व वस्तू त्याच्या घरी नव्हत्या म्हणून त्याला रडू आले. त्याने नंतर काही विद्वान ब्राह्मणांना विचारले,

'ब्रह्मन्, आज माझ्या पित्याची श्राद्धतिथी आहे. पण माझ्या-पाशी धन नाही. एक कवडीही नाही. अशावेळी मी काय करू?' त्यावर एका विद्वान ब्राह्मणाने म्हटले, 'यावेळी 'कुतप' नावाचा एक मुहूर्त चालू आहे. तू शीघ्र वनात जा व पितरांच्या उद्देशानं गवत गायीस घाल.' त्या ब्राह्मणाने त्वरित गवताचा भारा पितरांचे स्मरण करून गायीस घातला. या पुण्याच्या प्रभावाने तो मग देवलोकात गेला. पितृ-यज्ञाखेरीज मोठा धर्म नाही. म्हणून पूर्ण प्रयत्न करून आपल्या शक्तीस

अनुसरून श्राद्धविधी केला पाहिजे. जो मनुष्य या धर्ममय विषयाचा पाठ करील, त्याला गंगाजलात स्नान केल्याचे फळ मिळेल. या पाठामुळे त्याचे जन्माचे पाप संपेल.

## पतिव्रता ब्राह्मणीचे आख्यान, पतिव्रतामहिमा

नरोत्तम ब्राह्मणाने भगवानांना विचारले, ' नाथ, पतिव्रता स्त्रीनं माझा वृत्तान्त कसा जाणला ? कृपा करून आपण मला सांगता ?' भगवानांनी त्याला सर्व पतिव्रतामहिमा समजावून दिला. पतिव्रता स्त्री पतीस स्वतःच्या प्राणासमान मानते. नेहमी पतीच्या हितसंबंधांत ती तत्पर असते. एकाच पुरुषाची सेवा करणारी नारी जगात परम पूजनीय असते.

एक प्राचीन काळातील कथा आहे. मध्यप्रदेशात एक अत्यंत शोभायमान नगरी होती. तीत एक पतिव्रता ब्राह्मणी राहात होती. तिचे नाव शैब्या होते. तिचा पती पूर्वजन्मीच्या पापामुळे कोडी बनला होता. त्याच्या शरीरावरील अनेक जखमा सारख्या वाहत होत्या. शैब्या पतीच्या सेवेत तत्पर होती. पतीच्या मनात जी इच्छा उत्पन्न होईल ती पुरी करण्याचा प्रयत्न ती करी. प्रतिदिन देवाप्रमाणे ती पतीची पूजा करायची. दोषबुद्धी सोडून ती त्याच्यावर विशेष प्रकारचा स्नेह दाखवायची. एके दिवशी तिच्या पतीनें रस्त्याने जाताना एका सुंदर स्त्रीस पाहिले. तो तिला पाहून अतिशय मोहित झाला. त्याच्या मनावर कामदेवाने प्रभाव गाजविला. एक दीर्घ श्वास घेऊन तो फारच उदास झाला. पतीची उदास अवस्था पाहून पत्नी म्हणाली,

' नाथ, आपण आज असे उदास का ? आपण एवढा दीर्घ श्वास का घेतला ? आपणांस काय हवंय ? ते मला सांगा ना. मी आपलं काम पूर्ण करीन. आपणच माझे गुरू, आपणच प्रियतम आहात.'

' प्रिये, ते कार्य कुणीच पुरं करू शकणार नाही. तू नाही, की मी नाही. उगाच व्यर्थ गोष्टीची चर्चा कशासाठी ?'

' नाथ, मी आपलं मनोगत जाणते. मला आज्ञा द्यावी. कोणताही उपाय करून आपल्या मनासारखं करीन.'

'साध्वी, आताच या मार्गानं एक सुंदर वेश्या गेली. तिचं शरीर सर्व बाजूंनी चांगलं मनोहर होतं. तिला पाहून माझ्या मनात कामाग्नी निर्माण झाला. मी जर तुझ्या कृपेनं त्या नवयौवनास प्राप्त करीन तर माझा जन्म सफल होईल. देवी, तू तिला भेट व माझे मनोरथ पूर्ण कर.

'प्रभो, यावेळी थोडं धैर्य धरावं. यथाशक्ती मी आपलं कार्य नक्की करीन.'

इतके म्हणून पतिव्रतेने मनातल्या मनात थोडा निश्चय केला. रात्रीच्या अंतिम प्रहरी ती उषःकाली उठली. हातात शेण व झाडू घेऊन ती प्रसन्न चित्ताने त्या वेश्येच्या घरी गेली. तिने वेश्येचे घर झाडून लिंपून स्वच्छ केले व लोकांच्या दृष्टीस पडण्यापूर्वीच ती परत घरी आली. या प्रमाणे ओळीने तीन दिवस ती त्या वेश्येच्या घरी जात होती. झाडलोट करीत होती. त्या वेश्येने आपल्या दासदासींना विचारले, 'आज अंगणाची इतकी सुंदर स्वच्छता कुणी केली ?' सेवकांनी तिला सांगितले, 'भद्रे, घराच्या सफाईचं हे काम आम्ही कुणीच केलेलं नाही.' हे ऐकून त्या वेश्येस मोठाच विस्मय वाटला. तिने खूप विचार केला. दुसऱ्या दिवशी ती रात्र थोडी राहिली असतानाच उठली. तिची दृष्टी अंगण झाडीत असलेल्या ब्राह्मणीकडे गेली. ती वेश्या तिला म्हणाली,

'हाय ! हाय ! आपण हे काय करता ? राहू द्या झाडणं. क्षमा करावी.'

इतके म्हणून वेश्येने तिचे पाय धरले व पुनः म्हटले, 'पतिव्रते, आपणच माझं आयुष्य, शरीर, संपत्ती, यश व कीर्ती सर्व काही नाहीसं करण्याचं ठरविलं आहे ? साध्वी, तुम्ही काहीही मागा, मी निश्चित देईन. सुवर्ण, रत्न, वस्त्र, मणी जे काय हवं असेल ते मागावं.'

'मला धनाची आवश्यकता नाही. तुझ्या जवळ थोडं काम आहे. करशील तर सांगते. ते काम झालं तर माझ्या मनास भारी संतोष होईल. तू माझे मनोरथ पूर्ण करावेस.'

'पतिव्रते, तू लौकर सांग ना. मी खरंच सांगते. मी तुझं अभिष्ट पूर्ण करीन.'

पतिव्रतेने लाजत लाजत आपल्या पतीच्या मनातील हेतू तिला

सांगितला. ते सर्व ऐकून वेश्येने आपले कर्तव्य व तिच्या पतीची पीडा यांचा विचार केला. दुर्गंधयुक्त कोडी पुरुषाबरोबर संग करण्याचे ऐकून तिच्या मनास फार दु:ख झाले. ती पतिव्रतेला म्हणाली,

'देवी, जर तुझा पती माझ्या घरी आला तर मी त्याची इच्छा पूर्ण करीन.'

'सुंदरी मी आजच रात्री तुझ्या घरी माझ्या पतीस घेऊन येईन. ते आपल्या मनाप्रमाणे अभीष्ट वस्तू मिळवून संतुष्ट होतील. त्यानंतर मी त्यांना परत घरी घेऊन जाईन.'

'महाभागे, तू त्वरित आपल्या घरी जा. तुझ्या पतीस घेऊन तू आजच या महालात ये. मी वाट पाहाते.'

पतिव्रता स्त्री आपल्या घरी गेली. तिने आपल्या पतीस सांगितले,

'प्रभो, आपला हेतू आज सफल होईल. आज रात्रीच तिच्या घरी जायचं.'

'देवी, मी कसं तिच्या घरी जाऊ ? मला तर नीट चालता येत नाही. मग हे कार्य सिद्ध तरी कसं व्हावं ?'

'प्राणनाथ, मी आपल्या पाठीवर आपणांस घेईन आणि तिच्या घरी पोचतं करीन. आपला मनोरथ सिद्ध झाला की मी आपणांस परत घेऊन येईन.'

'कल्याणी, तुझ्या या साह्यानं माझं सर्व कार्य सिद्ध होईल. या वेळी तू जे काम केलं आहेस ते इतर स्त्रीस करणं कठीण आहे.'

त्या नगरात कोणा एका धनवान गृहस्थाची घरी चोरांनी बरेच धन चोरले. राजास ही वार्ता समजली तेव्हा त्याने रात्री गस्त घालणाऱ्या सर्व गुप्तचरांना बोलावून सांगितले, 'तुम्हांला जिवंत राहायचं असेल तर आजच त्या चोरास पकडून माझ्या हवाली करावं.' राजाची ही आज्ञा ऐकून सर्व गुप्तचर व्याकुळ झाले. चोराला पकडण्यासाठी ते रात्रीच बाहेर पडले. त्या नगरापाशी एक घनदाट जंगल होते. त्या जंगलात एका वृक्षाखाली महातेजस्वी मुनिवर मांडव्य समाधी लावून बसले होते. ते योगी लोकांत प्रधान महर्षी होते. अग्नीप्रमाणे त्यांचे तेज होते. या तेजस्वी मुनींकडे पाहून दुष्ट गुप्तचरांनी एकमेकांस

म्हटले, ‘ हाच चोर आहे. या लबाडानं हे अद्‌भुत रूप धारण केलं आहे. या जंगलात निवास करून राहिला आहे.’ त्या पापी सेवकांनी मांडव्य-मुनींना बांधले. हे होत असताना त्या थोर मुनींनी प्रतिकार केला नाही. त्यांच्याकडे त्यांनी पाहिलेही नाही. गुप्तचरांनी त्यांना राजापुढे आणून उभे केले. राजा त्यांना म्हणाला, ‘ आज बरा हा चोर मिळाला. तुम्ही याला नगराच्या जवळच्या प्रवेशद्वारावर न्यावं. आणि याला योग्य असं शासन करावं.’ गुप्तचरांनी मांडव्यमुनींना मार्गात गाडलेल्या एका सुळावर चढविले. तो सूळ ऋषीच्या गुदद्वारातून वर जाऊन मस्तकातून बाहेर पडला. त्यांचे सारे शरीर विदीर्ण झाले.

अशा परिस्थितीत मध्यरात्रीस ती पतिव्रता ब्राह्मणी आपल्या पतीस पाठीवर घेऊन वेश्येच्या घरी निघाली होती. त्या सुळाच्या जवळून जात असताना त्या कोडी माणसाच्या शरीराचा धक्का मांडव्यमुनींना लागला. कोडी माणसाच्या संसर्गाने त्या मुनींची समाधी भंग पावली. ते रागावून म्हणाले, ‘ ज्यानं मला या वेळी कष्टदायक वेदना दिल्या तो सूर्योदयाच्या आत भस्म होऊन जाईल.’ मांडव्यांनी इतके म्हटले तेव्हाच तो कोडी पती जमिनीवर पडला. त्यावेळी त्या पतितेने म्हटले, ‘ आजपासून तीन दिवसपर्यंत सूर्यच नाही उगवणार.’ इतके म्हणून ती पतिव्रता आपल्या पतीला घेऊन घरी गेली. तिने त्याला एक सुंदर मऊ शय्येवर झोपविले.

इकडे मांडव्यांनी कोडी माणसाला शाप देऊन ते आपल्या स्थानास निघून गेले. जगात तीन दिवसपर्यंत सूर्य उगवला नाही. सर्व प्राणिमात्रांसह त्रिलोक व्यथित झाले. सर्व देव इंद्रास पुढे घालून ब्रह्मदेवांकडे गेले. त्यांनी म्हटले,

‘ भगवान, सूर्योदय न होण्याचं कारण ? आम्हांस काही समजत नाही. आपणच आता जे उचित असेल ते करावं.’

ब्रह्मदेवांनी पतिव्रता ब्राह्मणी, मांडव्यमुनी यांचा सारा इतिहास देवांना निवेदन केला. सर्व देव त्या कोडी मनुष्याच्या घरी आले. पतिव्रता आपल्या पतीशेजारी झोपली होती. ब्रह्मदेव तिला म्हणाले,

‘ माता, सर्व देव, ब्राह्मण, गायी, प्राणी यांचा मृत्यू होण्याचा

समय आला आहे. असं हे भयंकर कार्य तुम्ही का केलं ? सूर्याविरुद्ध तुमचा असा क्रोध का ? या रागाचा त्याग करावा.'

'भगवान्, एकमात्र पती हाच माझा गुरू आहे. सर्व लोकांपेक्षा हाच मला श्रेष्ठ वाटतो. सूर्योदय होताच मुनींच्या शापानं यांचा मृत्यू होणार आहे. तो टळावा म्हणून मी सूर्याला शाप दिला. क्रोध, मोह, लोभ, मत्सर, काम यांना वश होऊन मी हे कार्य केलं नाही.'

'माते, एकाच्या मृत्यूनं तीनही लोकांचं हित होणार असेल तर? अशा अवस्थेनं तुला अधिक पुण्य लाभेल.'

'पतीचा त्याग करून मला आपला परम कल्याणदायक सत्यलोक वरा नाही वाटत.'

'देवी, सूर्योदय होऊन जेव्हा सर्व जगताचे व्यवहार सुरू होतील तेव्हा तुझा पती भस्म होऊन जाईल. पण मी तुझं कल्याण करीन. आमच्या आशीर्वादानं तुझा कोडी ब्राह्मण कामदेवाप्रमाणे सुंदर होईल.'

ब्रह्मदेवांच्या सांगण्यानुसार पतिव्रतेने होकार दिला. त्वरित सूर्योदय झाला. मुनींच्या शापाने कोडी ब्राह्मण भस्म होऊन पडला. त्या राखेतून कामदेवाप्रमाणे एक सुंदर पुरुष प्रकटला. सर्व नगरवासी लोकांना या घटनेचे आश्चर्य वाटले. देव प्रसन्न झाले. सर्व लोकांची मने प्रसन्न झाली. एवढ्यात स्वर्गाहून एक विमान आले व त्यात ती पतिव्रता पतीसह बसून देवांच्यासह स्वर्गास गेली.

ही सर्व हकीगत सांगून भगवान म्हणाले, 'शुभा अशीच एक पतिव्रता स्त्री आहे. म्हणूनच ती माझ्या समान आहे. सतीत्वाच्या प्रभावानं ती भूत, भविष्य जाणते.' यानंतर नरोत्तम ब्राह्मणाने विचारले, 'भगवन्, मांडव्य मुनींच्या शरीरास शूलाचा आघात कसा झाला ? त्या पतिव्रता स्त्रीच्या पतीस कोड कसं निर्माण झालं ?' या प्रश्नाचे उत्तरही भगवानांनी थोडक्यात दिले.

हे मांडव्य मुनी जेव्हा बालक होते तेव्हा त्यांनी अज्ञानाने मोहवश होऊन एका रातकिडयाच्या गुदद्वारात गवताची काडी घातली होती. या त्यांच्या एका अपराधामुळे त्या रात्री त्यांना तसे कष्ट भोगावे लागले. मांडव्यमुनी समाधीच्या अवस्थेत असल्याने त्यांना वेदनेचा पूर्ण

अनुभव आला नाही. त्या पतिव्रता स्त्रीच्या पतीने पूर्वजन्मात एका कोढी ब्राह्मणाचा वध केला होता. म्हणून या जन्मी त्याच्या शरीरात कोड उत्पन्न झाले. पण त्या ब्राह्मणाने चार गौरीदाने, तीन कन्यादाने केल्यामुळे त्याची स्त्री पतिव्रता झाली. 'त्याच्या पत्नीमुळेच त्याला माझी प्राप्ती झाली' असे भगवानांनी सांगितले.

पतिव्रता स्त्रीचा महिमा सांगितल्यावर भगवानांनी काही कुलटा, व्यभिचारिणी स्त्रियांचाही निर्देश केला. सर्वस्व अर्पण करणाऱ्या पुरुषा-विरुद्ध काही स्त्रिया आचरण करतात. काही नारी कामास वश होतात. निर्धन, कुरूप, गुणहीन, नीच कुळातील नोकरही त्यांना स्वीकारणीय वाटतो. आपल्या गुणवान, कुलीन, अत्यंत धनी, सुंदर, रतिकार्यात कुशल पतीचाही त्या त्याग करतात. एकदा नारदांनीच पार्वतीस कामिनीच्या चेष्टा, कुचेष्टा विचारल्या. देवी पार्वतीने त्या नारदांना समजावून सांगितल्या.

युवती स्त्रीचे लक्ष सदा पुरुषाकडे असते. नारी तुपाने भरलेल्या घड्याप्रमाणे आहे. आणि पुरुष प्रखर अंगाराप्रमाणे आहे. अंगार व तूप यांना कधी एका स्थानी ठेवू नये. मत्त हत्तीस जसा माहुत अंकुशाने ताब्यात ठेवतो त्याचप्रकारे स्त्रियांना धाक दाखवून काबूत ठेवायला हवे. लहानपणी पिता, जवानीत पती, वृद्धावस्थेत पुत्र नारीचे रक्षण करतो. त्यांना कधीच स्वातंत्र्य देण्यासारखे नसते.

**पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।**
**पुत्राश्च स्थाविरे भावे न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ।।**

सुंदर स्त्रीला जर तिच्या इच्छेनुसार वागू दिले तर ती पर-पुरुषाच्या प्रार्थनेस वश होऊन व्यभिचारास प्रवृत्त होईल. या कुलटेच्या संसर्गाने सारे कुल दूषित होते. दुसऱ्याच्या बीजापासून उत्पन्न होणारा मनुष्य वर्णसंकराचा असतो. सदाचारिणी स्त्री पितृकुल व पतिकुल या दोनही कुलांचा सन्मान वाढविते. साध्वी नारी आपल्या कुलाचा उद्धार करते व दुराचारिणी स्त्री त्या कुलास नरकात लोटते. असे म्हटलेच आहे की, या जगात स्वर्ग, कुल, कलंक, यश, अपयश, पुत्र, पुत्री, मित्र आदींची स्थिती स्त्रीच्या अधीन आहे. विद्वान पुरुषाने संतानाच्या

हेतूने विवाह करावा. जो पापी मनुष्य मोहवश होऊन साध्वी स्त्रीस सोडून देतो तो त्या स्त्रीच्या हत्येचे पाप भोगत राहतो. जो परक्या स्त्रीवर बलात्कार करतो अथवा धनाचा लोभ दाखवून तिला फसवितो तो या जगात स्त्रीहत्यारा म्हणूनच ओळखला जातो. मरणानंतर तो घोर नरकात जातो. परक्या स्त्रीचे अपहरण करून मनुष्य चांडाल-कुलात जन्मतो. पतीची वंचना करून व्यभिचार करणारी स्त्री चिरकाला-पर्यंत नरक भोगून कावळ्याच्या जन्माला जाते. उच्छिष्ट व दुर्गंधयुक्त पदार्थ खाऊन ती जगत असते. मनुष्ययोनीत आली की ती विधवा होते. माता, गुरुपत्नी, ब्राह्मणी, राजाची राणी यांच्याशी गमन करणारा अक्षय नरकात जातो. बहीण, भाच्याची स्त्री, बेटी, सून, काकी, मामी, आत्या, मावशी यांच्याशी अन्यायपूर्वक समागम केल्याने नरकात जावे लागते. ब्रह्महत्येचे पापही लागते. तो अंध, मुका, बहिरा होऊन त्याचा सतत अध:पातच होतो.

परंतु असे पातक घडले तरी मनुष्याच्या उद्धाराचे काही मार्ग आहेत. अशा तऱ्हेचा अनाचार करणाऱ्या पुरुषाने एक लोखंडाची स्त्री-मूर्ती बनवावी. तिला खूप तापवावे व गाढ आलिंगन देऊन प्राणत्याग करावा. शुद्धता येऊन त्याला परलोकची यात्रा घडेल. गृहस्थाश्रमात जो सर्व सोडून भगवंताकडे मन लावतो, प्रतिदिन 'गोविंद' या नावाचे स्मरण करतो त्याचे सर्व पाप नष्ट होते. हजारो ब्रह्महत्या, शेकडो गुरु-पत्निसमागम, लाख वेळा केलेले मदिरासेवन, सुवर्णाची चोरी, पाप्यांशी चिरकाल संग, ही सर्व पापे केवळ भगवंतांचे नाम घेण्याने नष्ट होतात. म्हणून मनुष्याने 'गोविंद' हे नाव घेऊन पवित्र व्हावे. नामावर भरवसा ठेवून पाप करणे मात्र चालणार नाही. 'गोविंद' या नामाचे पुण्य गंगातटावर चंद्रग्रहणास मंगलमय वेळेस कोटयवधी गोदान करण्यासारखे आहे. 'गोविंद' या नामाचे कीर्तन करणारा मनुष्य श्रीहरीबरोबर वैकुंठातच असतो. पुराणातील हरिकथा ऐकल्याने मानव श्रीहरिरूप बनतो. म्हणून प्रतिदिन पुराण ऐकायला हवे.

सती स्त्रीचे उत्कृष्ट गुणही ऐकण्यासारखे आहेत. सती स्त्रीचा वंश शुद्ध असतो. तेथे नेहमीच लक्ष्मीचा निवास असतो. सतीचे पितृकुल

पतिकुल या दोनही कुलांना व तिच्या स्वामीसही स्वर्गलोक मिळतो. ज्या स्त्रिया आपल्या पूर्वकालात पुण्यपापमय कर्मे करीत होत्या, पण नंतर पतिव्रता झाल्या त्यांनाही उत्तम गती मिळते. जी स्त्री आपल्या स्वामीचे गुणगान करते, अनुगमन करते ती शराबी, ब्रह्महत्यारा व सर्व प्रकारच्या पापांत लडबडलेला आपला पती पापमुक्त करते व त्याच्यासह ती स्वर्गात जाते. पतीस अनुसरणारी स्त्री अंगावर जितके केस तितकी म्हणजे साडेतीन कोटी वर्षे स्वर्गात राहाते. ब्राह्मण जातीच्या स्त्रीने आपल्या मरण पावलेल्या पतीबरोबर सती जाऊ नये अशी ब्रह्मदेवांची आज्ञा आहे. ब्राह्मणीने वैधव्यव्रताचे आचरण करावे. जी विधवा एकादशीव्रत करीत नाही ती पुढील जन्मातही विधवाच होते. प्रत्येक जन्मात ती दुर्भागी बनते. मांस खाण्याने, व्रत न करण्याने ती चिरकाल नरकात राहून कुत्र्याच्या योनीत जन्म घेते. जी कुलनाशिनी विधवा दुराचरणी होऊन मैथुनात रस घेते ती नरकयातना भोगल्यानंतर गाढवी होते.

कन्यादानाचे महत्त्वही ऐकण्यासारखे आहे. रूपवान, गुणवान, कुलीन, तरुण, समृद्धशाली, धनधान्याने संपन्न वरास कन्येचे दान करावे जो मनुष्य आभूषणांनी युक्त अशा कन्येचे दान करतो त्याच्याकडून पर्वत, वन, अरण्ये यांच्यासह पृथ्वीचे दान झाले आहे असे समजावे. जो मनुष्य कन्येचे शुल्क (पैसे) घेतो तो नरकात जातो. जो मूर्ख आपली कन्या विकतो त्याचा नरकातून कधी उद्धार होत नाही. जो लोभवश होऊन अयोग्य पुरुषास कन्या देतो तो रौरव नरकात पडून शेवटी चांडाल होतो. विद्वान पुरुष दामादाकडून (जावयाकडून) शुल्क घेण्याचा कधीच विचार करीत नाही. आपणांकडून जे जावयास दिले जाते ते अक्षय होते. पृथ्वी, गाय, सुवर्ण, धनधान्य, वस्त्र इत्यादी वस्तू जावयास दिल्याने त्या अक्षय होतात. जो खूप खातो, जो खूप दूर राहातो, जो फारच धनवान आहे, जो दुष्ट आहे, ज्याचा जन्म उत्तम कुलात नाही, जो मूर्ख आहे अशास आपली कन्या देऊ नये. अतिवृद्ध, अत्यंत दीन, रोगी, अति निकट राहाणारा, अत्यंत क्रोधी, असंतुष्ट यांनाही कन्यादान करू नये. यांना कन्येचे दान दिल्याने मनुष्य नरकात पडतो. धन वा

सन्मान यांच्या लोभानें वा एक कन्या दाखवून दुसरीशी विवाह करण्यानें मनुष्य नरकात जातो.

## तुलाधाराची समता, सत्यप्रीती इत्यादी

सत्यामुळेच सूर्याचा उदय होतो, सत्यामुळेच वायूचे चलनवलन होते. सत्यामुळेच समुद्र आपली मर्यादा सोडीत नाही. भगवान कच्छाने आपल्या पाठीवर पृथ्वी सत्यामुळेच धारण केली आहे. तीन लोक व पर्वत हे सत्यामुळेच स्थिर आहेत. सत्यभ्रष्ट प्राणी खात्रीने नरकात जातो. सत्यवाणी, सत्यकार्य यांत रमलेला मनुष्य भगवानरूप होतो. समस्त ऋषिमुनींना सत्यामुळेच परमगती मिळते. राजा युधिष्टिर सत्यामुळेच स्वर्गास गेला. सर्व शत्रूंना जिंकून त्याने सत्यानेच धर्माने लोकांचे पालन केले. अत्यंत दुर्लभ असा विशुद्ध राजसूययज्ञ केला. तो प्रतिदिन चौऱ्यांशी हजार ब्राह्मणांना भोजन देई. त्यांना अपार धन देई. अनेक ब्राह्मणांचे दारिद्रय त्याने दूर केले. हा सर्व सत्याचा प्रभाव आहे. राजा हरिश्चंद्राने सत्याचा आधार घेऊन वाहन, परिवार, स्वत:चे शरीर यांसह तो सत्यलोकात गेला. त्याच्याप्रमाणेच अनेक राजे, सिद्ध, महर्षी, ज्ञानी, यज्ञकर्ते हे सत्यापासून विचलित झाले नाहीत. या जगात सत्यपरायण लोकच जगताचा उद्धार करतात.

महात्मा तुलाधार सत्यभाषणात स्थित होता. सत्य बोलण्याच्या गुणानेच त्याच्या समान दुसरा कोणी जगात झाला नाही. महाग व स्वस्त अशा सर्व प्रकारच्या वस्तूंच्या खरेदी-विक्रीत त्याने सत्य प्रमाण मानले. सत्य भाषण करणाऱ्यास नेहमीच अश्वमेधयज्ञाचे फल मिळते. लोभ व द्वेष यांच्या मोहानें असत्य बोलणारा मनुष्य रौरव नरकात पडतो. एक महान शूद्र होता. तो कधी लोभात पडायचा नाही. तो केवळ भाजी खाऊन, बाजारातील अन्नाचे दाणे खाऊन, शेतातील धान्यकण वेचून मोठ्या कष्टाने उदरनिर्वाह करायचा. त्याच्या जवळ दोन जुनेंपुराणे फाटके कपडे होते. आपल्या हाताचे तो पात्र करून जेवीत असे. त्याला कधी कधी आवश्यक वस्तू मिळत नसे. पण तो कधी दुसऱ्याचे धन घेत नसे. एके दिवशी भगवान त्याची परीक्षा पाहाण्यासाठी दोन नवी वस्त्रे

नदीच्या तीरावर ठेवून दूर गेले. ती दोन वस्त्रे पाहून त्या शूद्राच्या मनात लोभ उत्पन्न झाला नाही. कोणाची तरी ती पडली असतील असे समजून तो मुकाट्याने स्वतःच्या घरी गेला. फळातील सोने पाहूनही त्याच्या मनाची चलबिचल झाली नाही. लाभ व लोभ हे त्याला कधी जडलेच नाहीत. लाभाने लोभ उत्पन्न होतो. लोभग्रस्त मनुष्य नरकात जातो. लोभामुळे उन्माद, उन्मादाने काम, कामाने बुद्धिभ्रम, क्रोध इत्यादींची निर्मिती होऊन तपस्या संपते. तपस्या संपली की चित्तास मोह पाडणारे मालिन्य तयार होते. या मलिनतेच्या साखळीने जखडलेला मनुष्य कधी सावध होतच नाही.

शूद्राने सुवर्णमिश्रित फलही घेतले नाही हे पाहून भगवंत हे एका क्षपणकाच्या रूपाने त्याच्यापाशी गेले. त्याच्याजवळ त्यांनी लोकांच्या भाग्याची चर्चा केली. त्या शूद्राच्या स्त्रीने क्षपणकास भाग्याची गोष्ट विचारली. क्षपणक तिला म्हणाला, ‘महाभागे, आज तुझ्या पतीला चांगली संधी होती. त्याला खूप द्रव्य मिळणार होते. पण तुझ्या मूर्ख पतीनं त्याचा त्याग केला. तुझ्या घरात धनाचा अभाव दिसतोय. पण हा तुझा पती जिवंत आहे तोवर तू अशीच दरिद्री राहाशील यात संशय नाही. माते, तू तुझ्या पतीला या धनासंबंधी विचार.’

ती पत्नी घरी आली व तिने आपल्या पतीस धनासंबंधी विचारले. त्याने आपल्या स्त्रीसह त्या क्षपणकाची भेट घेतली. तो एकान्तात म्हणाला,

‘क्षपणक, तू सांग काय ते.’

‘तुम्हांला प्रत्यक्ष धन मिळत होतं. पण तू त्याची एखाद्या गवताच्या काडीसारखी अवज्ञा केलीस. तू असं का केलंस ? तुझ्या भाग्यात धन नाही असंच वाटतंय. धनाच्या अभावानं तुला जन्मापासून मृत्यूपर्यंत दुःख होईल. म्हणून तू त्वरित त्या धनाचा स्वीकार करावास.’

‘क्षपणका, मला धनाची इच्छा नाही. धन या जगात बंधनकारक होतं. त्यात फसलेल्या मनुष्याचा उद्धार कधीच होत नाही. धनामुळे चोर, बंधुबांधव, राजा यांचा रोष निर्माण होतो. धन कधीच सुखाचं

होत नाही. धनामुळेच प्राणघात होतो. धन हे पापांचं साधन आहे. धनी माणसाचं जीवन कामादी दोषांनी परिपूर्ण असतं, धन हेच दुर्गतीचं प्रधान कारण आहे.'

'पण धनामुळेच मित्र मिळतात. यश, पांडित्य, रूप, भोग, सुख हे सर्व धनामुळेच मिळतं. धनहीन मनुष्यास त्याची स्त्री व त्याचा पुत्र हेही सोडतात. यज्ञादी धर्मकार्यं धनानंच संपन्न होतात. यज्ञानं दान सिद्ध होतं. व्रतांचं पालन होतं. तर्पणविधी नीट होतो. धनामुळं सर्व प्रकारचे भोग प्राप्त होतात,'

'पण क्षपणका, कामनांचा त्याग केल्यानंच सर्व प्रकारची सुखं प्राप्त होतात. क्रोध सोडला की तीर्थांचं सेवन होतं. दया ही जपासमान आहे. संतोष हे खरं धन आहे. अहिंसा ही सर्वांत मोठी सिद्धी आहे. सागाचं भोजन हे अमृतासमान आहे. उपवास हीच तपस्या. संतोष हाच मोठा भोग. परस्त्री ही मातेसमान, परद्रव्य हे मातीसमान मी मानतो. परस्त्री सर्पिणीसारखी आहे. म्हणून मी त्या धनाचा लोभ धरला नाही.'

हा क्षपणकही साक्षात विष्णूच होता. शूद्रावर देवांनी पुष्पवृष्टी केली. त्यांनी त्याचा जयजयकार केला. शूद्र सपरिवार विमानात बसून स्वर्गलोकास निघून गेला. म्हणून हा बुद्धिमान तुलाधार श्रेष्ठ व सर्व प्रकारच्या ज्ञानांत निपुण झाला. मूक चांडाळही असाच परमधामास जाऊन सुखी झाला. नरोत्तम ब्राह्मणानेही आपल्या माता-पित्यांची सेवा करून कुटुंबासह भगवद्धामाची प्राप्ती करून घेतली.

## कीर्ती व धर्म यांची प्राप्ती करून देणारे आचार

तलाव खोदणे, वृक्ष लावणे, पिंपळाची पूजा करणे, पाणपोई चालविणे, गोचरभूमी ठेवणे, मंदिर बांधणे ही सर्व धर्म, कीर्ती प्राप्त करून देणारी कामे आहेत. खोदलेल्या तलावात वा तयार केलेल्या वनात गायी एक महिना वा सात दिवस जरी तृप्त होऊन राहिल्या तरी त्यांचा मालक सर्व देवांकडून पूजिला जातो. तलावात पावसाचे पाणी पडते. त्यावेळी पाण्याचे जितके तुषार उडतात, तितकी हजार वर्षे

तलाव बनविणारा मनुष्य स्वर्गसुखे भोगतो. जलाने शेती पिकते. शेती पिकल्याने मनुष्य प्रसन्न राहातो. जलाशिवाय माणसास प्राण धारण करणे कठीण होईल. पितरांचे तर्पण, शौच, सुंदर रूप, दुर्गंधीचा नाश; ही सर्व कामे जलानेच पूर्ण होतात. कपडे धुणे, भांडी स्वच्छ करणे, ही सर्व कामे जलामुळेच होतात. म्हणून माणसाने पैसा खर्च करून विहीर, आड, तलाव यांची निर्मिती केली पाहिजे. जलाशय निर्माण करण्याचे पुण्य फार मोठे आहे..

फार पूर्वीची एक हकीगत आहे. एका धनिकाच्या पुत्राने एक मोठा जलाशय निर्माण केला. त्यासाठी त्याने दहा हजार सुवर्णाच्या मोहरा खर्च केल्या. काही काळानंतर तो निर्धन झाला. तेव्हा दुसरा एक धनवान त्याच्यापाशी आला व म्हणाला की, ' मी या जलाशयासाठी दहा हजार सुवर्णमुद्रा देतो. हा तलाव खोदण्याचं पुण्य तर तुला मिळालंच आहे. मी केवळ मूल्य देऊन आता त्यावर माझा अधिकार सांगू पाहातो.' त्यावर तो निर्धन म्हणाला, ' बंधो, दहा हजारांचं पुण्य-फल मला तर या तलावामुळं रोजच मिळतं. या निर्जन व निर्जल प्रदेशात मी हा तलाव एवढ्यासाठीच खोदला की, सर्व लोकांनी आपल्या मनाप्रमाणं इथं स्नान करावं. जलपान करावं. दानं करावीत.'

निर्धनाच्या या बोलण्याची सर्वांनी हसून थट्टा केली. तेव्हा तो निर्धन मनुष्य म्हणाला, ' माझं बोलणं खरंच आहे. विश्वास नसेल तर धर्मपरीक्षा करावी.' त्यावर तो धनी म्हणाला, ' बंधो, माझं ऐक. मी प्रथम तुला दहा हजार सुवर्णमुद्रा देईन. यानंतर मी फत्तर आणून तुझ्या जलाशयात टाकीन. फत्तर स्वाभाविकपणे पाण्यात बुडतील. पण काही वेळाने हे फत्तर जर पाण्यावर तरंगतील तर माझे पैसे गेले. नाहीतर या जलाशयावर माझा अधिकार होईल.' त्या दरिद्री माणसाने दहा हजार मुद्रा घेतल्या व तो घरी गेला. धनीने काही साक्षीदारांसमोर त्या महान जलाशयात फत्तर टाकले. धर्मतुलेवर त्या दहा हजार मुद्राही मोजल्या. त्या जलाशयाच्या एक दिवसाच्या जलदानाएवढ्याही भरल्या नाहीत. आपले धन व्यर्थ जाते असे पाहून धनीस कष्ट झाले. दुसऱ्या

दिवशी ते फत्तरही पाण्यावर तरंगू लागले. लोकांना या गोष्टीचा भारी विस्मय वाटला. हे सर्व ऐकून तो दरिद्री व धनी दोघेही जलाशयापाशी आले. धनी माणसाने आपला पराभव मान्य केला. जलाशयाच्या स्वामीने ते फत्तर उचलून दूर फेकून दिले. नष्ट झालेल्या जलाशयाचा पुन्हा उद्धार केल्यास मनुष्य स्वर्गात जातो व प्रत्येक जन्मात तो शांत, सुखी होतो. तपस्वी, अनाथ, ब्राह्मण यांच्यासाठी जीर्ण जलाशयाचा उद्धार करावा. जलाशयाचे हे आख्यान ऐकल्यानेही सर्व पापे नष्ट होतील.

जलाशयाच्या भोवती खूप वृक्ष लावावेत. पिंपळाचा वृक्ष लावल्याने शेकडो यज्ञांचे फल मिळते. गर्मीच्या दिवसांत पिंपळाच्या छायेत गाय, देव, ब्राह्मण यांना विश्रांती मिळेल व पिंपळाचा वृक्ष लावणारा सुखी होईल. त्याचे पितर अक्षय स्वर्गाची प्राप्ती करून घेतील. पिंपळाची पूजा करण्याचे फायदे अनेक आहेत. स्नान करून पिंपळास स्पर्श करणारा मनुष्य पापापासून मुक्त होतो. अश्वत्थाच्या दर्शनाने पापाचा नाश होतो. स्पर्शानें लक्ष्मीची प्राप्ती होते. त्याला प्रदक्षिणा घातल्यानें आयुष्य वाढते. अश्वत्थ वृक्षास हविष्य, दूध, नैवेद्य, फूल, धूप, दीपक इत्यादी अर्पण करणारा मनुष्य कधी स्वर्गभ्रष्ट होत नाही. पिंपळाच्या मुळाशी बसून जप, होम, स्तोत्रपाठ, यंत्रमंत्रादी साधने करणाऱ्या माणसास कोटिगुणांचे फल मिळते. पिंपळाच्या मुळात श्रीविष्णू, शरीरात शंकर, अग्रभागात ब्रह्मदेव आहेत. त्याला या जगात कोण पूजणार नाही ? सोमवती अमावास्येस मौन राहून, स्नान करून, एक हजार गायी दान दिल्यानें जे फल मिळते ते पिंपळास नुसता नमस्कार केल्याने प्राप्त होते. पिंपळास नेहमी प्रदक्षिणा घालाव्यात. या पिंपळासारखा दुसरा वृक्ष नाही. पिंपळाच्या वृक्षाच्या रूपाने साक्षात श्रीहरी या भूतलावर विराजमान असतात. पिंपळ लावणे, त्याचे रक्षण करणे, त्याची पूजा करणे यांमुळे धन, पुत्र, मोक्ष यांची प्राप्ती होते. अश्वत्थ वृक्षाची फांदी तोडणारा एक कल्पपर्यंत नरकात जातो व नंतर चांडालाच्या घरी जन्म घेतो.

जेथे जलाचा अभाव असेल तेथे पवित्र स्थानावर एक लहानसा

मांडव घालावा. या मार्गाने अनेक पथिक जाणारे येणारे असावेत. त्या मंडपात पिण्याच्या पाण्याची व्यवस्था असावी. अशी पाणपोई घालणारा पापमुक्त होऊन त्याला सद्‌गती प्राप्त होते. जेथील मार्ग दुर्गम आहे, दुस्तर चिखलाने माखलेला आहे, कंटकांनी भरलेला आहे, तेथे पूल बांधून मनुष्य पवित्र होतो. त्याचप्रमाणे जो गायींसाठी मोकळी भूमी सोडतो त्याला शंभरांपेक्षा अधिक ब्राह्मणांना भोजन दिल्याचे श्रेय मिळते. जो पवित्र वृक्ष व गोचरभूमी यांचा उच्छेद करतो त्याच्या एकवीस पिढ्या नरकात जातात. जो मनुष्य श्रीविष्णूंच्या मूर्तीसाठी तीन वा पाच खांबांनी युक्त असे मंदिर बनवितो, त्याचा शोभासंपन्न व सुंदर कळस बनवितो, मंदिरात इष्ट देवाची प्रतिमा यथाशास्त्र स्थापन करतो त्याला भगवानांची सायुज्यता मिळते. अशा रीतीने शिवाची, गणेशाची मंदिरे बनवावीत. सूर्यमंदिर बनविणारा उत्तम गतीस जातो. या मंदिरांची, मूर्तींची हानी करणारांची दशा काय होते हेही पद्मपुराण सांगते. लिंगरूप भगवान शंकरांच्या धनाचे अपहरण करणारा मनुष्य रौरव नरकात जातो. भगवान शिवांच्या अन्नपानाचे भक्षण केल्यास मनुष्यास दुर्गती प्राप्त होते.अनाथ, दीन, श्रोत्रिय ब्राह्मणांना सुंदर घर बांधून दिल्याने बांधून देणाऱ्यास स्वर्गाची प्राप्ती होते. हे सर्व आख्यान ऐकणाराही अक्षय स्वर्गाचा धनी होतो. त्यालाही मंदिर निर्माणाचे फल मिळते.

## रुद्राक्षाचा महिमा, तुलसीदलाचा महिमा

रुद्राक्षाची माळ गळयात घालणारा पुरुष सर्व प्राण्यांत श्रेष्ठ आहे. त्याच्या दर्शनानेच लोकांच्या पापराशी नष्ट होतात. रुद्राक्षाच्या स्पर्शाने मनुष्यास स्वर्गसुखाचा अनुभव येतो. रुद्राक्ष धारण करणारा मोक्षसुख अनुभवतो. तो या जगात प्रत्यक्ष भगवान शिवाच्या रूपाचा मानावा. रुद्राक्षधारी मनुष्य जेथे राहातो तो देश पुण्यवान मानावा. रुद्राक्षाचे फल महान तीर्थाप्रमाणे आहे. ब्रह्मग्रंथीने युक्त अशी रुद्राक्ष-माला घेऊन जो जप, दान, स्तोत्र, मंत्र, देव यांचे पूजन करतो त्याच्या पापांचा क्षय होतो. ज्या रुद्राक्षास योनीचे चिन्ह नसते, ज्याला किड्याने

भोक पाडले आहे, ज्याचे लिंगचिन्ह मिटले आहे, ज्याच्यात दोन बीजे एकत्र आली आहेत, असे रुद्राक्ष माळेत नसावेत. जी माला आपल्या हातांनी गुंफली असेल, सैल असेल, जिचे मणी एक दुसऱ्यास भिडलेले आहेत, जी शूद्राने गुंफली असेल अशी माळ अशुद्ध मानावी. जी माला सर्पाप्रमाणे एका बाजूस मोठी व दुसऱ्या बाजूस क्रमाने लहान होणारी असेल, नक्षत्रांप्रमाणे शोभा देणारी असेल, सुमेरूनें युक्त, सुटचा मण्यांनी शोभणारी ती माळ उत्तम मानावी. याच शुद्ध माळेने जप करावा. या माळेने जप केल्यास तो मोक्षदायक ठरतो. रुद्राक्षमाळेचे एक एक बीज एक एका देवासमान आहे. रुद्राक्ष धारण करणारा मनुष्य देवासमान आहे.

या रुद्राक्षाची उत्पत्ती कशी झाली हे ऐकण्यासारखे आहे. पूर्वी सत्ययुगात एक त्रिपुर नावाचा दानव राहात होता. देवांचा वध करून तो आपल्या अंतरिक्षचारी नगरात लपून वसायचा. ब्रह्मदेवांच्या वर-दानाने तो प्रबल बनन सर्व लोकांच्या विनाशाचा प्रयत्न करीत होता. देवांच्या निवेदनावरून भगवान शंकरांना एके दिवशी हे भयंकर वृत्त समजले. त्यांनी आपले आजगव नावाचे धनुष्य तयार केले. त्यावर विकराल नावाचा बाण चढविला. दिव्य दृष्टीने पाहून भगवान शिवांनी त्या दानवास मारले. दानव आकाशातून ढासळणाऱ्या उल्केसमान पृथ्वी-वर पडला. या कार्यात अत्यंत परिश्रम झाल्याकारणाने रुद्राच्या शरी-रातून घामाचे बिंदू टपकू लागले. त्या बिंदूंनी या पृथ्वीवर रुद्राक्षांचा एक महान वृक्ष प्रकट केला. त्याचे फल अत्यंत गुप्त असल्याने सर्व साधारण जीवास त्याची महती समजली नाही. एके दिवशी कैलासावर देवाधिदेव शंकरांस प्रणाम करून कार्तिकेयाने विचारले,

'तात, मी रुद्राक्षाचं यथार्थ फल जाणू इच्छितो. त्यानं जप करणं, तो धारण करणं, याचं दर्शन घेणं, त्याला स्पर्श करणं यांचं फल काय मिळतं हो ?'

'रुद्राक्ष धारण केल्यानं मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. जर एखादा हिंसक पशू कंठात रुद्राक्ष धारण करील व मरण पावेल तर तो रुद्रस्वरूप होईल. जो मनुष्य मस्तकावर, हृदयावर रुद्राक्षांची माळ

धारण करतो तो पदोपदी अश्वमेधयज्ञाचे फल मिळवितो. रुद्राक्षास एकापासून चौदापर्यंत मुखे असतात. जो कितीही मुखांचे रुद्राक्ष धारण करतो तो शिवसमान होतो. म्हणून पुत्रा, तू प्रयत्न करून रुद्राक्ष धारण कर. रुद्राक्ष धारण करून या भूतलावर प्राणत्याग करणारा सर्व देवांना पूजनीय होतो व रमणीय धामास जातो. जो मृत्युकाली मस्तकावर एक रुद्राक्षाची माळ धारण करतो तो शैव, वैष्णव, शाक्त, गणेशोपासक, सूर्योपासक असतो.'

'जगदीश्वर, मी आणखी काही फळांबद्दल प्रश्न विचारतो. सर्व लोकांसाठी कोणतं फल उत्तम आहे ?'

'बेटा, आवळीचं फळ सर्व लोकांत प्रसिद्ध व उत्तम आहे. तो वृक्ष लावून स्त्री व पुरुष सर्व जन्ममृत्यूंच्या बंधनापासून मुक्त होतात. हे पवित्र फळ भगवान विष्णूंना प्रसन्न करणारं असून याच्या भक्षणाने मनुष्याच्या सर्व पापांतून त्याची सुटका होते.' भगवान शंकरांनी कार्तिकेयास आवळीचे महत्त्व विस्ताराने समजावून दिले. आवळा खाल्ल्याने आयुष्य वाढते. त्याचे जल पिण्याने धर्मसंचय होतो. त्याचे स्नान केल्यास दरिद्रता दूर होते. सर्व प्रकारचे ऐश्वर्य प्राप्त होते. ज्या घरात आवळा असतो तेथे दैत्य व राक्षस नसतात. एकादशीस जरी एक आवळा मिळाला तरी त्याचे महत्त्व गंगा, गया, काशी, पुष्कर आदी तीर्थांपेक्षा अधिक महत्त्वाचे असते. दोनही पक्षांतील एकादशीस जो आवळ्यांनी स्नान करतो त्याची सर्व पापे नष्ट होतात. तो विष्णुलोकात सन्मानित होतो. जो आवळ्याच्या रसाने सदा आपले केस साफ करतो तो पुन्हा जन्मास येत नाही. आवळ्याचे दर्शन, त्याचा स्पर्श, त्याचे नामोच्चारण यांनी भगवान वरदनायक विष्णू अनुकूल होतात. जेथे आवळा तेथे भगवान विष्णू असतात. त्या घरात ब्रह्मदेव व लक्ष्मी यांचा स्थिर निवास असतो. म्हणून घरात आवळ्याचे झाड अगत्याचे आहे. जो आवळ्यांचा मुरंबा नैवेद्यास देतो त्याच्यावर भगवान विष्णू खूप संतुष्ट असतात.

योगी, मुनी व ज्ञानी यांना प्राप्त होणारी गती आवळ्यांचे सेवन करणाऱ्यास मिळते. आवळ्याचे फळ खाऊन तीर्थदास व तीर्थयात्रा यांचे फल मिळते. प्रत्येक रविवार, सप्तमी तिथीस आवळ्याचे फळ दुस-

घ्यास द्यावे. संक्रांतीचा दिवस, शुक्रवार, षष्ठी, प्रतिपदा, नवमी, अमावस्या, या दिवशी आवळयांचा दुरूनच परित्याग करावा. आवळयाच्या संपर्काने मृत व्यक्तीही भगवद्धामास जाते. जो धार्मिक मनुष्य आवळयाचा रस अंगाला लावून स्नान करतो त्याला अश्वमेधयज्ञाचे फल मिळते.

फार पूर्वीची एक हकीगत आहे. एक चांडाल शिकार करण्यासाठी वनात गेला. तेथे त्याने अनेक मृग, पक्षी, प्राणी यांना मारून तो दमला. विश्रांती घेण्यासाठी तो एका वृक्षाखाली बसला. तो वृक्ष आवळयाचा होता. तो चांडाल भुकेने व तहानेने पीडलेला होता. आवळीस मोठमोठे आवळे लागले होते. तो चांडाळ सहजतेने त्या वृक्षावर चढला व आवळयाची फळे खाऊ लागला. प्रारब्धवश होऊन तो एकाएकी वृक्षावरून खाली पडला व वेदनांनी व्याकुळ होऊन मरून गेला. त्या नंतर सर्व राक्षस, भूतगण, यमराजाचे सेवक त्याला न्यायला आले. पण त्यांना त्या चांडालास काही नेता येईना. भूतगण बलवान असले तरी त्यांनी त्या चांडालाकडे डोळे वटारून पाहिले सुद्धा नाही. ते सर्व दूत मुनींच्यापाशी जाऊन म्हणाले,

'ज्ञानी महर्षींनो, हा चांडाल तर मोठा पापी होता. पण आम्ही यमराजाचे सेवक असूनही आम्ही याला घेऊन जाऊ शकत नाही ! हा एवढा सूर्याप्रमाणे समर्थ कसा झाला ? त्याच्याकडं पाहाणं सुद्धा आम्हांला कठीण वाटतं.'

'प्रेतगण, या चांडाळानं आवळयाची पिकलेली फळं खाल्ली-आहेत. या वृक्षाची एक फांदी तुटल्यामुळं याचा मृत्यू झाला आहे. मृत्यूच्या वेळीही याच्या आसपास आवळयाची वरीच फळं पडलेली होती. म्हणून तुम्हांस याला नेणं अवघड होतं आहे.'

'ऋषींनो, आपलं ज्ञान उत्तम आहे. एका प्रश्नाचं उत्तर जोपर्यंत इथं भगवान विष्णूंचं विमान येत नाही. तोपर्यंत द्यावं. जिथं वेदांचा, नाना मंत्रांचा, विद्यांचा गंभीर घोष होतो, जिथं पुराणांचे व स्मृतींचे स्वाध्याय होतात, तिथं आम्ही क्षणभरही थांबत नाही. यज्ञ, होम, जप, देवपूजा इत्यादी शुभ कार्यांत आम्ही कधी नसतो. म्हणून आम्हांस असं

सांगा की, कोणत्या कर्मानं मनुष्यास ही प्रेतयोनी मिळेल ?'

'जो खोटी साक्ष देतो, वध वा वंधन यांनी मृत्यू येतो, तो नरकात जातो व त्यालाच प्रेतरूप कळा येते. जो ब्राह्मणांचे दोष शोधतो, जो गुरुजनांच्या शुभ कार्यात बाधा घालतो, जो ब्राह्मणास दिल्या-जाणाऱ्या दानास हरकत घेतो, तोच चिरकाल प्रेतयोनीत पडून सदैव नरकात खितपत पडतो. जो मूर्ख आपल्या व दुसऱ्यांच्या बैलांना कष्ट देतो पण त्यांचं रक्षण करीत नाही, जो आपली प्रतिज्ञा मोडतो, असत्य बोलतो, व्रताचा भंग करतो, कमलाच्या पानावर जो भोजन करतो तोच या पृथ्वीवर प्रेतरूप होतो. जो आपल्या सदाचारिणी कन्या व साध्वी स्त्रिया यांना विकून टाकतो तो प्रेतरूप होतो.'

'ब्राह्मणांनो, कोणत्या कर्मांनी मनुष्य प्रेत होत नाही.'

'ज्या बुद्धिमान पुरुषानं तीर्थांत स्नान केलं आहे, शिवांस नमस्कार केला आहे, जो एकादशीस वा द्वादशीस उपवास करून भगवान विष्णूंची पूजा करतो, जो वेदांची अक्षरं, सूक्तं, स्तोत्रं, मंत्र, इत्यादींच्या द्वारे पूजा करतो तो कधी प्रेत होत नाही. नाना प्रकारच्या व्रतांची अनुष्ठानं करणारा, रुद्राक्ष धारण करणारा, प्रेतयोनीस जात नाही. जो आवळ्यांचा रस सेवन करतो, भगवान विष्णूंचं पूजन करतो, तो कधीच पिशाच योनीत जात नाही.'

'महर्षींनो, संतांच्या दर्शनानं पुण्य होतं. आज आम्हांस आपलं दर्शन झालं आहे. कोणत्या उपायानं आमची ही प्रेतावस्था संपेल ? आम्ही आपणांस शरण आलो आहोत. कृपया आपण आम्हांस त्वरित उपाय सांगावा.'

'तुम्ही आवळ्याची फळं खाऊन पाहा. ती तुम्हांस कल्याणकारक वाटतील.'

त्यानंतर ते पिशाचगण आवळ्याच्या झाडावर चढले. त्याची फळे त्यांनी मौजेने खाल्ली. तेव्हा देवलोकातून एक पिवळ्या रंगाचे विमान शीघ्रतेने आले. पिशाचगण त्या विमानात चढून स्वर्गलोकास गेले. आवळ्याच्या सेवनाचे हे असे फल.

कार्तिकेयासाठी महादेवांनी प्रेत अथवा पिशाच्च राहतात कोठे ?

कोणत्या कारणांनी प्रेतरूप योनी मिळते याचेही थोडे विवेचन केले. ज्या घराची मालकीण सहज काबूत येणारी नसते, जी पतिव्रता नसते, दुराचारिणी असते, तेथे प्रेतांचा निवास असतो. जो कुल व जाती यांनी नीच आहे, बल व उत्साह यांनी रहित आहे, जो बहिरा, दुर्बल, दीन आहे तोच पिशाच होतो. जो माता, पिता, गुरू, देव यांची निंदा करतो, जो पाखंडी व वाममार्गी आहे, जो गळ्यास फास लावून, पाण्यात बुडून, तलवार वा सुरा भोसकून, विष खाऊन आत्मघात करतो तोच प्रेतरूप होतो व या लोकात चांडालादी योनीत फिरून जन्म ग्रहण करतो. जो मातापित्यांचा द्रोह करतो, ध्यान व अध्ययन यांपासून दूर राहतो, व्रत व देवपूजा करीत नाही, मंत्र व स्नानहीन राहून जो गुरुपत्नीशी समागम करतो, जो चांडालादी स्त्रियांशी संग करतो तोच प्रेत वा पिशाच होतो. म्लेच्छांच्या देशात ज्याचा मृत्यू होतो, म्लेच्छासमान ज्याचे आचरण असते, स्त्रीच्या धनाने जो उपजीविका करतो, जो स्त्रियांचे रक्षण करीत नाही तोच निःसंदेह प्रेत होतो.

जो क्षुधेने पीडित, थकलाभागलेला, गुणवान व पुण्यात्मा अतिथी म्हणून आलेल्या ब्राह्मणाचा सत्कार करीत नाही, जो गोभक्षी म्लेच्छांच्या हाती गाय विकत देतो, जो कधी जीवनात स्नान, संध्या, वेदपाठ, यज्ञानुष्ठान, अक्षरज्ञान यांपासून दूर राहतो, जो नदीत वा तीर्थात आपले मलमूत्र विसर्जित करतो तो प्रेत होतो. ज्या स्त्रिया पतीचा त्याग करून दुसऱ्यांजवळ राहतात त्या दीर्घकाळपर्यंत प्रेतलोकातच असतात. विषय व इंद्रिये यांच्या मोहास बळी पडून जी स्त्री पतीस धोका देऊन स्वतः मिठाई खातात त्या पापाचरणी स्त्रिया या पृथ्वीवर पिशाच्चिनी होतात. म्हणून आवळा खाऊन, त्याच्या रसाने स्नान करून सर्व पापांपासून मुक्त व्हावे व विष्णुलोकाची प्राप्ती करून घ्यावी. सर्व प्रकारचे प्रयत्न करून आवळीची फळे मिळवावीत.

कार्तिकेयाने विचारल्यावरून महादेवांनी त्याला तुलसीदलाचे माहात्म्यही समजावून दिले. सर्व प्रकारची पाने व फुले यांच्यांत तुळस श्रेष्ठ मानली गेली आहे. ती परम मंगलमयी, सर्व कामना पूर्ण करणारी, शुद्ध आहे. ती विष्णूला प्रिय असल्यामुळे 'वैष्णवी' म्हणून प्रसिद्ध

आहे. ती भोग व मोक्ष देणारी आहे. भगवान विष्णूंनी पूर्वी सर्व लोकांच्या हितासाठी तुळशीचे एक रोप लाविले. तुळशीची पाने व तिच्या मंजिऱ्या यांना सर्व धर्मांत प्रतिष्ठा आहे, ही तुळस महादेवांनाही प्रिय आहे. ज्याने तुलसीदलाने भगवान विष्णूंचे पूजन केले आहे, त्याने दान, होम, यज्ञ, व्रत इत्यादींचे पुण्य संपादन केले आहे असे मानायला हरकत नाही. ज्याप्रमाणे पुण्यसलिला गंगा मुक्ती देते, त्याचप्रमाणे तुलसीही कल्याणदायक आहे. मंजिरीयुक्त तुळशींनी भगवान विष्णूंची पूजा केली तर तिचे पुण्यफल वर्णन करणेही शक्य नाही. जेथे तुलसीचे वन आहे तेथे भगवान कृष्णांची समीपता आहे. तेथेच ब्रह्मदेव व लक्ष्मी यांचाही निवास असतो. म्हणून आपल्या नजीकच तुळस लावून तिची पूजा करणे अगत्याचे आहे.

प्रेत, पिशाच, कूष्मांड, ब्रह्मराक्षस, भूत, दैत्य इत्यादी तुलसीपासून दूर राहतात. ब्रह्महत्यादी पापे, वाईट विचार, त्यांनी उत्पन्न होणारे रोग हे सर्व तुलसीवृक्षाजवळ राहू शकत नाहीत. ज्याने भगवानांची पूजा करण्यासाठी तुळशीचे उद्यान लावले आहे त्याने जणू उत्तम दक्षिणेने युक्त असे शंभर यज्ञ केले आहेत. जो भगवानांच्या मूर्तीवर तथा शालग्रामावर चढविलेल्या तुळसीदलाचा प्रसाद सेवन करतात त्यांना श्रीविष्णूंची सायुज्यता प्राप्त होते. जो श्रीहरीच्या मस्तकावरील तुलसीदल सेवन करतो तो पापांपासून मुक्त होऊन स्वर्गास जातो. कलियुगात तुलसीचे पूजन, कीर्तन, ध्यान, रोपण, धारण करूनच पापे जळून जातात. सर्ग व मोक्ष तुलसीमुळेच मिळतात. जो तुलसीच्या पूजनासंबंधी दुसऱ्यास उपदेश करतो व स्वतःही तसे आचरण करतो तो भगवान श्रीलक्ष्मीपतीच्या परमधामास जातो.

पूजने कीर्तने ध्याने रोपणे धारणे कलौ ।
तुलसी दहते पापं स्वर्गं मोक्षं ददाति च ।।
उपदेशं ददेदस्याः स्वयमाचरते पुनः ।
स याति परमं स्थानं माधवस्य निकेतनम् ।।

जी वस्तू भगवान विष्णूंना अतिशय प्रिय ती शिवांनाही प्रिय होते. श्राद्ध व यज्ञ आदी कार्यांत तुळशीचे एक पानही महान पुण्य

देणारे असते. ज्यानें तुलसीची सेवा केली त्यानें गुरू, ब्राह्मण, देव व तीर्थं यांचे सेवन केल्यासारखे आहे. जो शेंडीत तुलसीपत्र ठेवून प्राण-त्याग करतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. तुलसीच्या सेवेमुळे राजसूययज्ञाचे फल प्राप्त होते. तुलसीच्या एका पानानेंही श्रीहरीची पूजा केल्यास त्याला वैष्णवत्व प्राप्त होते. ज्याने तुलसीदलांनी भगवान विष्णूंची पूजा केली ते पुन्हा कधी जन्मास येत नाहीत. तुलसीचे हे आख्यान जो रोज ऐकेल, त्याची सर्व पापे संपतील. जन्ममृत्यूंच्या बंधना-पासून तो मुक्त होऊन जाईल. या माहात्म्याचा पाठ जो करील त्याला कधी रोग होणार नाही, त्याच्याजवळ कधी अज्ञान राहणार नाही. त्याचा सदा विजयच होईल.

## तुलसीस्तोत्रमाहात्म्य

स्कंदपुराणात जे काही आले आहे तेच येथेही थोडक्यात शतानंद मुनींनी आपल्या शिष्यांसाठी निवेदन केले. शतानंदांनी ते पूर्वी ब्रह्म-देवांच्या मुखातून ऐकले होते. तुलसीचे नाव उच्चारताच असुरांचा दर्प हरण करणारे भगवान विष्णू प्रसन्न होतात. मनुष्याची पापे नष्ट होतात व त्याला अक्षय पुण्याची प्राप्ती होते. कलियुगातील लोक धन्य आहेत. कारण त्यांच्या घरी शालग्रामशिलेची पूजा करण्यासाठी तुलसीचा वृक्ष बहरलेला असतो. ही तुलसी अमृतापासून उत्पन्न झाली व सदा केशवांची प्रिया बनली. ‘कल्याणी, मी भगवानांची पूजा तुझ्या पानांनी करतो. तू माझ्यासाठी वरदायिनी हो. तुझ्या पानांनी व मंजिऱ्यांनी मी नेंहमीच श्रीहरीची पूजा करीन. पवित्रांगी तुलसी, तू कलिमलाचा नाश करणारी आहेस.’ अशा अर्थाच्या मंत्राने तुलसीदलांनी भगवान वासुदेवांची पूजा करावी. तुलसीचे माहात्म्य गाताना म्हणावे,

‘देवेश्वरी, मोठमोठे देवही तुझ्या प्रभावाचं गायन करतात. मुनी, सिद्ध, गंधर्व, पातालनिवासी नागराज शेष, सर्व देवही तुझा प्रभाव जाणीत नाहीत. केवळ भगवान विष्णूच तुझ्या महिम्यास पूर्णत्वानं जाणतात. ज्यावेळी क्षीरसागराचं मंथन झालं त्यावेळी श्रीविष्णूंच्या आनंदांशातून तुझा जन्म झाला. पूर्वकालात श्रीहरीनं तुला स्वतःच्या

मस्तकावर धारण केलं होतं. देवी, त्यावेळी श्रीविष्णूंचा संपर्क पावून तू परम पवित्र झालीस. तुलसी, मी तुला प्रणाम करतो.

'देवी, साक्षात श्रीकृष्णांनी तुला गोमती तटावर लावलं व वाढविलं. वृंदावनात फिरताना त्यांनी सर्व जगाच्या व गोपींच्या हितासाठी तुलसीचं सेवन केलं. जगत्प्रिया तुलसी, पूर्वी वसिष्ठांच्या सांगण्यावरून श्रीरामांनी राक्षसांचा वध करण्याच्या उद्देशानं तुला शरयूच्या तटावर लावलं होतं. तुलसीदेवी, मी तुला प्रणाम करतो. रामचंद्रांचा वियोग झाला तेव्हा अशोकवाटिकेत राहणाऱ्या जनककिशोरीनं तुझं ध्यान केलं होतं. त्यामुळं तिला तिच्या प्रियतमाची संगत पुन्हा लाभली. पूर्वी हिमालय पर्वतावर भगवान शंकरांच्या प्राप्तीसाठी पार्वतीदेवीनं तुला लावलं होतं. त्यामुळं तिची इच्छा सफल झाली. तुलसीदेवी, मी तुला नमस्कार करतो. सर्व देवांगना, किन्नर यांनी नंदनवनात तुझं सेवन केलं होतं. देवी, तुला नमस्कार असो. धर्मारण्य गयेत साक्षात पितरांनी तुझं सेवन केलं होतं. दंडकारण्यात रामचंद्रांनी तुला लावलं व तुझी जोपासना लक्ष्मण व सीता यांनी केली. तुझ्या दलाचं महत्त्व गंगेप्रमाणं, गोदानाप्रमाणं आहे. देवी, माझ्यावर प्रसन्न हो. देवेश्वरी, हरिप्रिये, माझ्यावर प्रसन्न हो. मी तुला मनापासून प्रणाम करतो.'

या तुलसीस्तोत्राचा पाठ द्वादशीच्या रात्री जागरण करून करावा. भगवान विष्णू पाठ करणाऱ्याचे बत्तीस अपराध क्षमा करतील. या तुलसीस्तोत्राने संतुष्ट होऊन भगवान सुख व अभ्युदय देतील. ज्या घरात तुलसीचे स्तोत्र लिहिलेले असेल तेथे कधी अशुभ होणार नाही. सर्व काही मंगलमय होईल. तेथे नेहमीच सुकाळ राहील. ते घर प्रचुर धनधान्यांनी संपन्न होईल. तुलसीस्तोत्राचा पाठ करणाऱ्याच्या हृदयात भगवान विष्णूंची अविचल भक्ती राहील. वैष्णवांशी त्याचा कधी वियोग होणार नाही. त्याची बुद्धी कधी अधर्मात प्रवृत्त होणार नाही.

## गणेशमहिमा, त्याची स्तुती

एकदा व्यासांच्या शिष्याने, संजयाने व्यासांनाच विचारले, 'गुरुदेव, आपण देवांच्या पूजनाचा सुनिश्चित क्रम सांगावा. प्रतिदिन

कुणाची पूजा प्रथम करावी ?' व्यास त्याला म्हणाले, 'संजया, सर्व विघ्नं दूर करणाऱ्या गणेशाची पूजा सर्वांत आधी करावी. पार्वतीदेवीनं पूर्वी भगवान शंकरांच्या संयोगाने स्कंद (कार्तिकेय) व गणेश या नावांच्या दोन पुत्रांना जन्म दिला. देवांची पार्वतीवर मोठीच श्रद्धा जडली. त्यांनी अमृतानं तयार केलेला एक मोदक पार्वतीच्या हातात दिला. मोदक पाहून दोनही बालके तो पार्वतीस मागू लागली. पार्वती त्यांना म्हणाली, 'मी प्रथम याच्या गुणांचं वर्णन करते. तुम्ही दोघांनी सावधान राहून ऐकावं, या मोदकाचा केवळ वास घेतल्यानंच अमरत्व प्राप्त होतं. जो याला खातो तो सर्व शास्त्रांचा मर्मज्ञ, सर्व तंत्रांत प्रवीण, लेखक, चित्रकार, विद्वान, ज्ञानविज्ञान जाणणारा सर्वज्ञ होतो. यात थोडाही संशय नाही. पुत्रांनो, तुम्ही धर्माचरण करून श्रेष्ठता मिळविण्यासाठी आला आहात. ते सिद्ध करून दाखवावं. जो सिद्ध करील त्यास मी हा मोदक देते. तुझ्या पित्यानंही याला संमती दिली आहे.'

'आईच्या मुखातून हे शब्द येताच परम चतुर स्कंद मयूरावर आरूढ झाला व त्वरित तो त्रिलोकाच्या तीर्थयात्रेस निघून गेला. एका मुहूर्तातच तो सर्व तीर्थयात्रा करून परतही आला. पण लंबोदर गणेश त्याच्यापेक्षाही बुद्धिमान होता. त्यानं मातापित्यांनाच प्रदक्षिणा करून पित्याच्या पुढे उभा राहिला. नंतर स्कंदही आला व पित्याच्या समोर उभा राहिला. 'मला मोदक दे.' असं त्यानं म्हटल्यावर पार्वतीनं दोनही पुत्रांकडे पाहून म्हटलं, 'सर्व तीर्थांत केलेलं स्नान, सर्व देवांना केलेला नमस्कार, सर्व यज्ञांचं अनुष्ठान, सर्व प्रकारची व्रतं, मंत्र, योग, संयम, हे सर्व मातापित्यांच्या पूजनाच्या सोळाव्या अंशाच्याही बरोबर होत नाहीत. म्हणून हा गणेश शेकडो पुत्रांपेक्षा, गणांपेक्षा मोठा आहे. देवांनी तयार केलेला हा मोदक मी यालाच देते. मातापित्यांच्या भक्तीमुळं हा प्रत्येक यज्ञात सर्वांच्या आधी पूजा स्वीकारील.'

व्यासांनी संपूर्ण गणेशमहत्त्व संजयासाठी विशद केले. ब्राह्मणांनी यज्ञप्रसंगी सर्वांच्या आधी गणेशाचे पूजन करावे. असे केल्याने यज्ञाचे फल कोटिगुणांनी वाढते. सर्व देवांचे, देवींचे हेच सांगणे आहे. गणपती सर्व देवांच्या गणांचा अधिपती झाला. मोठे यज्ञ, स्तोत्रपाठ, नित्यपूजा

यांत पहिली गणेशपूजा करूनच मनुष्य सर्व सिद्धी प्राप्त करून घेतो. चतुर्थीच्या दिवशी उपवास करून गणेशाचे पूजन करावे. रात्री अन्न ग्रहण करून त्याची स्तुती अशी करावी;

गणाधिपे नमस्तुभ्यं सर्वविघ्नप्रशान्तिद ।
उमानंदप्रद प्राज्ञ त्राहि मां भवसागरात् ।।
हरानंदकर ध्यानज्ञानविज्ञानद प्रभो ।
विघ्नराज नमस्तुभ्यं सर्वदैत्यैकसूदन ।।
सर्वप्रीतिप्रद श्रीद सर्वयज्ञैकरक्षक ।
सर्वाभीष्टप्रद प्रीत्या नमामि त्वां गणाधिप ।।

'श्रीगणेशा, आपणांस नमस्कार असो. आपण सर्व विघ्नांचा नाश करून शांती देणारे आहात. उमेस आनंद देणाऱ्या परम बुद्धिमान प्रभो, या भवसागरातून आपण माझा उद्धार करावा. आपण भगवान शंकरांना आनंद देणारे आहात. आपलं ध्यान करणारा ज्ञान व विज्ञान यांची प्राप्ती करून घेतो. विघ्नराजा, आपण सर्व दैत्यांचे एकमेव संहारक आहात. आपणांस नमस्कार असो. आपणच सर्वांना प्रसन्नता व लक्ष्मी देणारे आहात. आपणच सर्व यज्ञांचं रक्षण करता. आपणच सर्व प्रकारचे मनोरथ पूर्ण करता. गणपते, मी प्रेमपूर्वक आपणांस नमस्कार करतो.' अशा प्रार्थनेने गणपतीची पूजा करणारा सर्व पापांपासून मुक्त होऊन स्वर्गलोकात प्रतिष्ठित होतो. गणेशाची बारा नावेही रोज म्हणावीत.

गणपतिर्विघ्नराजो लम्बतुण्डो गजाननः ।
द्वैमातुरश्च हेरम्ब एकदन्तो गणाधिपः ।।
विनायकश्चारुकर्णः पशुपालो भवात्मजः ।
द्वादशैतानि नामानि प्रातरुत्थाय यः पठेत् ।।
विश्वं तस्य भवेद्वश्यं न च विघ्नं भवेत् क्वचित् ।।

'गणपती, विघ्नराज, लंबतुण्ड, गजानन, द्वैमातुर, हेरंब, एकदन्त, गणाधिप, विनायक, चारुकर्ण, पशुपाल, भवात्मज या बारा नावांचा रोज प्रभातकाळी पाठ करावा. सर्व विश्व त्याला वश होऊन राहील. त्याला कधी विघ्नाशी सामना करावा लागणार नाही.'

उपनयन, विवाह, सर्व मंगल कार्ये यांत गणपतीचे पूजन आधी

करावे. त्यामुळे अक्षय पुण्याचा लाभ होतो. जो मनुष्य यज्ञात सर्व कलशांना ' गणानां त्वा ' या मंत्राने आवाहन करतो त्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. त्याला स्वर्ग व मोक्ष यांची प्राप्ती होते. मातीच्या भिंतीच्या कोनाड्यात प्रतिमा, चित्र, फत्तराची गणेशाची मूर्ती बसवावी. जे स्थान नित्य दृष्टीस पडते तेथेही गणेशास स्थान द्यावे. आपल्या शक्तीस अनुसरून त्याची पूजा करावी. त्याचे सर्व कार्य सिद्धीस जाईल. त्याला कोणतेच विघ्न येणार नाही. तीनही लोक त्याला वश होतील. सर्व देव आपल्या अभीष्टाच्या सिद्धीसाठी ज्याला नमस्कार करतात, पूजन करतात, सर्व विघ्नांचा उच्छेद जो करतो त्या गणेशास नमस्कार असो.

**अभिप्रेतार्थसिद्ध्यर्थंपुजितो यः सुरैरपि ।**
**सर्वविघ्नच्छिदे तस्मै गणाधिपतये नमः ॥**

भगवान विष्णूंना प्रिय असणाऱ्या फुलांनी, फलांनी, मोदकांनी, दही, व दूध यांनी, धूप व दीप यांनी गणेशाची पूजा करतो त्याला सर्व प्रकारच्या सिद्धी प्राप्त होतात.

## मनुष्ययोनीतील दैत्य व देव

संजयाच्या प्रश्नांवरूनच व्यासांनी मनुष्यांत दैत्य व देव कसे निर्माण होतात याचे थोडक्यात वर्णन केले. द्विज अथवा अन्य जातींत आपापल्या पूर्वकर्मांनुसार असुर, राक्षस, प्रेत अथवा पिशाच यांचा जन्म येतो. पण ते आपला स्वभाव सोडीत नाहीत. मनुष्यांत जे असुर जन्मतात ते सदा लढाई, झगडा करण्यास उत्सुक असतात. जो मायावी, क्रूर व दुराचारी आहे त्यालाच या पृथ्वीवर राक्षस समजले पाहिजे.

याच्या उलट एक बुद्धिमान, सुयोग्य पुत्रही जन्मतो व सर्व कुलाचे रक्षण करतो. एकच वैष्णव पुत्र आपल्या अनेक पिढ्यांचा उद्धार करतो. जो पुण्यतीर्थ, मुक्तिक्षेत्र यांत ज्ञानपूर्वक मृत्यू पावतो तो संसार, सागर तरून जातो. जो ब्रह्मज्ञानी असतो तो स्वतःच तरून जातो. दुसऱ्यांनाही तो तारतो. एक पतिव्रता स्त्री आपल्या कुलाच्या अनेक पिढ्यांचा उद्धार करते. कलियुगाच्या शेवटी जेव्हा शहरे व गावे यांतील

धर्माचा नाश होईल तेव्हा एकच धर्मात्मा पुरुष सर्व पुरे, ग्रामे, जन-समुदाय, कुले यांचे रक्षण करील.

जो मनुष्य अपवित्र, दुर्गंधयुक्त पदार्थ खाण्यात आनंद मानतो, पापे करतो, रात्री फिरून चोरी करतो, त्याला विद्वान पुरुषांनी वंचक समजावे. त्याला सर्व कर्तव्यांची, कर्मांची, सदाचाराची माहिती नसते. तो वास्तविक मूर्खअवस्थेतील पशूच होय. जो हिंसक आहे, सजातीय मनुष्यास उद्वेग देणारा आहे, कलहप्रिय आहे, भित्रा आहे, उच्छिष्ट भोजनाचा प्रेमी आहे, त्या मनुष्यास कुत्रे म्हटले आहे. तो स्वभावानेच चंचल असतो. भोजनासाठी नेहमी उत्सुक, उडत उडत चालणारा असतो. जंगलात राहाणारा असतो. अशा मनुष्यास वानरच म्हणायला हवे. जो वाणीने व बुद्धीने आपले कुटुंबीय व दुसरे लोक यांची चुगली करतो तो सर्वांनाच उद्वेगजनक वाटतो. असा पुरुष सर्पासमान मानावा. जो बलवान आहे, आक्रमक आहे, नितान्त निर्लज्ज आहे, दुर्गंधयुक्त मांस खाणारा आहे, भोगासक्त आहे, तो मनुष्यांतील सिंह समजावा. त्याचा आवाज ऐकून माणसे भयभीत होऊन दुःखी होतात. ज्याची दृष्टी दूरवर पोचत नाही त्याला लोक हत्ती मानतात.

नररूपात काही देवांचाही निवास असतो. द्विज, देव, अतिथी, गुरू, साधू, तपस्वी यांच्या पूजनात राहाणारा, नित्य तपस्यापरायण, धर्म व शास्त्र यांचा ज्ञाता, क्षमाशील, क्रोधजयी, सत्यवादी, जितेन्द्रिय, लोभहीन, प्रिय बोलणारा, शांत, धर्मशास्त्री, प्रेमी, दयाळू, लोकप्रिय, मितभाषी, वाणीवर अधिकार चालविणारा, सर्व कार्यांत दक्ष, गुण-वान, महाबली, साक्षर, विद्वान, आत्मविद्येत रमलेला, तूप, गायीचे दूध दही, शाकाहारी भोजन यांत रुची असणारा, अतिथीस दान देणारा, स्नान, दान या शुभ कार्यांत रमणारा, व्रत, यज्ञ, देवपूजन, स्वाध्याय यांत काळ व्यतीत करणारा, कोणताही दिवस व्यर्थ न घाल-णारा मनुष्य देव आहे, या देवांच्या आचरणावरूनच मुनींनी सदा-चरणाचा आदर्श बनविला आहे. प्रत्यक्ष देवांत सत्त्वगुण अधिक असतो तर मनुष्यांत भय अधिक असते. देव गंभीर असतात तर मनुष्य

स्वभावाने सदा मृदू असतो.

मनुष्यांत जर पति-पत्नींत जन्मगत संस्कारांचा भेद असेल तर त्यांना थोडेही सुख होत नाही. शुभ कार्यांत रमणाऱ्या मनुष्यास दीर्घायुष्य प्राप्त होते, तर दैत्य आदी श्रेणींत गणले गेलेले पापात्मे लौकर मरण पावतात. सत्ययुगात देवासारखी मनुष्ये या पृथ्वीवर जन्मास आली. दैत्य अथवा अन्य जातींची नाही. त्रेतात एक चतुर्थांश, द्वापरात अर्धा, कलियुगात सर्व भूमंडलच दैत्यांनी व्यापले गेले. देव व असुर यांची संख्या समान झाली, म्हणूनच महाभारतीय युद्ध झाले. दुर्योधनाच्या बाजूस असलेले योद्धे, सेनासाह्यक सर्व दैत्यच होते. कर्ण आदी वीर सूर्याच्या अंशापासून निर्माण झाले. गंगानंदन भीष्म वसुधेत प्रधान आहे. आचार्य द्रोण देवमुनी बृहस्पतीच्या अंशाने प्रकट झाले. नंदनंदन श्रीकृष्ण साक्षात भगवान विष्णू आहेत. विदुर धर्म आहेत. गांधारी, द्रौपदी, कुंती, या सर्व देवी आहेत.

जो मनुष्य जितेन्द्रिय, दुर्गुणांपासून मुक्त, नीतिशास्त्रज्ञ आहे तो देवरूपच मानावा. स्वर्गाचा निवासी असो की पृथ्वीचा असो, पुराणे व तंत्र यांत सांगितलेले आचरण करणाराच या पृथ्वीचा उद्धार करतो. जो शिव, विष्णू, शक्ती, सूर्य व गणेश यांचा उपासक आहे, तो सर्व पितरांना तारून या पृथ्वीचा उद्धार करतो. जो वैष्णवास पाहून प्रसन्न होतो, त्याची जो पूजा करतो, तो सर्व पापांतून मुक्त होतो. जो ब्राह्मण यजनयाजनादी सहा कर्मे, सर्व प्रकारचे यज्ञ यांत रमून नेहमी धार्मिक आख्याने ऐकतो तोच या पृथ्वीचा उद्धार करण्यास समर्थ आहे.

जे लोक विश्वासघातकी, कृतघ्न, व्रतांचे उल्लंघन करणारे, ब्राह्मण व देव यांचे द्वेषी असतात तेच या पृथ्वीचा नाश करतात. जे माता-पिता, स्त्री, गुरुजन, बालके यांचे पोषण करीत नाहीत, देव, ब्राह्मण, राजा यांपासून धन हरण करतात, मोक्षावर ज्यांची श्रद्धा नसते तेच लोक या पृथ्वीचा नाश करतात. जे पापी मद्य पिण्यात, जुगार खेळण्यात आसक्त होतात, जे पाखंडी व पतित यांच्याशी बातचीत करतात, जे महापातकी व अतिपातकी आहेत, ज्यांच्याकडून पुष्कळच जीवजंतू मारले गेले आहेत तेच या पृथ्वीचा विनाश करतात. जे लोक सत्कर्म-

रहित, दुसऱ्यांबद्दल सदा उद्‌विग्न, स्मृती व धर्मशास्त्र न मानणारे, जे नीच वृत्तीचा आश्रय घेतात, जे द्वेषवश होऊन गुरूची निंदा करतात तेच लोक भूतलाचा नाश करतात. जे दात्यांना दानापासून रोखतात, पापकर्माकडे प्रवृत्त होतात, दीन व अनाथ यांना पीडा करतात तेच या भूतलाचा पूर्ण नाश करतात.

## सूर्याचे व संक्रांतिदानाचे माहात्म्य

एकदा वैशंपायनांनी व्यासांना विचारले, ‘विप्रवर, आकाशात प्रत्येक दिवशी कुणाचा उदय होतो ? याचा प्रभाव काय ? किरणांच्या या स्वामींचा प्रादुर्भाव केव्हा झाला ? मी तर पाहातो आहे की, मोठ-मोठे मुनी, सिद्ध, चारण, दैत्य, राक्षस, ब्राह्मण हे सर्व त्याचीच सदा आराधना करतात !’ त्यावर व्यासमुनी म्हणाले,

‘वैशंपायन, ब्रह्माच्या स्वरूपातून ब्रह्माचंच हे तेज प्रकट झालेलं आहे. याला तू साक्षात ब्रह्मच समज. धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ देणारं हे तेज आहे. निर्मल किरणांनी शोभणाऱ्या या तेजाचा पुंज अतिशय प्रचंड व दुःसह असतो. याला पाहून, याच्या प्रखर किरणांनी पीडित होऊन सर्व लोक इकडे तिकडे विखरून लपतात. चारही समुद्र, सर्व मोठ्या नद्या, नद आदी सुकून जातात. प्राणी मनुष्याचा घास बनतात. मानवसमुदाय शोकाने आतुर बनतो. या तेजास पाहून इंद्र व देव ब्रह्मदेवांपाशी गेले. त्यांनी त्यांना हा सर्व वृत्तान्त सांगितला. तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, ‘देवांनो, हे तेज आदि-ब्रह्माच्या स्वरूपापासून जलातून प्रकट झाले. हा तेजोमय पुरुष त्या ब्रह्माच्या समान आहे. यात व त्या आदिब्रह्मात काहीच अंतर नाही. ब्रह्मापासून कीटकापर्यंत सर्व चराचर प्राणिसृष्टीत याचीच सत्ता आहे. हा सूर्यदेव सत्त्वमय आहे. याच्याद्वारेच जगाचं पालन होतं. देव, जरायुज, अंडज, स्वेदज, उद्‌भिज आदी सर्व प्राण्यांचं रक्षण या सूर्या-मुळं होतं. या सूर्यदेवाचा प्रभाव पूर्णपणानं वर्णन करता येत नाही. यानंच लोकांचं उत्पादन व पालन केलेलं आहे. हाच सर्वांचा रक्षक

असल्यानं याची समानता करणारा दुसरा कुणीच समर्थ नाही. पहाटे याचं दर्शन झालं की, पापराशी संपून जाते. द्विज आदी सर्व माणसं याच सूर्यदेवाची आराधना करून मोक्ष मिळवतात. संध्योपासनेच्या वेळी ब्रह्मवेत्ता ब्राह्मण आपले हात उंच करून याच सूर्याची प्रार्थना करतो. सूर्यदेवाच्या मंडळात राहणारी संध्यारूपिणी देवीची उपासना करूनच सर्व द्विज स्वर्ग व मोक्ष यांची प्राप्ती करून घेतात.

'या पृथ्वीवर जे कुणी पतित आहेत ते भगवान सूर्यनारायणाच्या किरणांनी पवित्र होतील. संध्याकाळी सूर्याची उपासना करून द्विज सर्व पापांपासून मुक्त होतात. जो मनुष्य चांडाल, कसाई, पतित, कोडी, महापातकी आहे व ज्यानं भगवान सूर्याचं दर्शन घेतलं आहे तो सर्व पापांपासून मुक्त होतो. सूर्याची उपासना केल्यानं मनुष्याची सर्व रोगांतून सुटका होते. सूर्याची उपासना करणारे लोक इहलोकात व परलोकात अंध, दरिद्री, दुःखी व शोकग्रस्त होत नाहीत. श्रीविष्णू व शिव आदी देवांचं दर्शन सर्व लोकांना होत नाही, ध्यानात त्यांचं रूप साक्षात्कारानं जाणावं लागतं, पण भगवान सूर्य तर प्रत्यक्ष देवच आहे.'

या भगवान सूर्याची आराधना करावी, उपासना करावी हे खरे असले तरी त्याचे दर्शनच प्रलयकालीन अग्नीप्रमाणे असते. भूतलावरील सर्व प्राणी त्यांच्या तेजाच्या प्रभावाने मृत्यू पावतात. समुद्र आदी जलाशय नष्ट होतात. लोकांना त्याचे तेज सहन होत नाही. मग त्यांनी भगवान सूर्याचे पूजन कसे करावे? सर्व लोकांनी भक्तिपूर्वक अशी सूर्याची आराधना कशी करावी?

लोकांच्या मनातील ही शंका ऐकून स्वतः ब्रह्मदेव सूर्याकडे गेले व त्यांनी त्याची स्तुती करून म्हटले, 'देवा, आपण सर्व जगताचे नेत्रस्वरूप व निरामय आहात. आपण साक्षात ब्रह्मरूप आहात. आपणांकडं पाहणंही कठीण आहे. आपण प्रलयकारी अग्नीच्या समान तेजस्वी आहात. आपल्या रूपात वायूचा सखा अग्नी निरंतर विराजमान आहे. आपल्यामुळंच अन्नाचं पचन होतं. जीवनाचं रक्षण होतं. देवा, आपल्यामुळेच उत्पत्ती होते, प्रलय होतो. आपणच या जगाचे एकमेव स्वामी आहात. आपणांशिवाय या जगाचं एकही दिवस चालणार नाही.

आपणच सर्व लोकांचे प्रभू, चराचर प्राण्यांचे रक्षक, पिता व माता आहात. आपल्याच कृपेनं हे जग टिकून आहे. भगवन्, सर्व देवांत आपल्याएवढा थोर देव नाही. शरीराच्या आत, बाहेर, सर्व विश्वात आपलीच सत्ता आहे. आपणच या जगतास धारण केलं आहे. आपणच रूप व गंध यांची निर्मिती केली आहे. रसांतील स्वाद आपणांमुळेच आहे. याप्रकारे सर्व जगाचे ईश्वर व रक्षणकर्ते आपणच आहात. प्रभो, तीर्थे, पुण्यक्षेत्रे, यज्ञ यांचे कारण केवळ आपणच आहात. आपण परम पवित्र आहात. या जगाचं एकमात्र कारण आपणच आहात. आपण परम पवित्र, सर्वसाक्षी व गुणांचे धाम आहात. आपणच सर्वज्ञ, सर्वांचे कर्ते, संहारक, रक्षक, अंधकार, चिखल, रोग यांचा नाश करणारे, दरिद्र्याचं दुःख हरण करणारे आपणच आहात.'

'महाप्राज्ञ पितामह, आपणच विश्वाचे स्वामी व स्रष्टा आहात. आपण आपला मनोरथ त्वरित सांगावा. मी पूर्ण करीन.'

'सुरेश्वरा, आपली किरणं अत्यंत प्रखर आहेत. लोकांना ती फार दुःसह होतात. आपण त्यात थोडी मृदुता आणावी.'

'प्रभो, वास्तविक माझी कोटी कोटी किरणं जगताचा नाश करणारीच आहेत. आपणच त्यांचा दाह कमी करावा.'

तेव्हा ब्रह्मदेवांनी विश्वकर्म्यास बोलविले. त्याने सूर्याच्या किरणांची उष्णता खूपच कमी केली. त्या छाटलेल्या तेजाने भगवान विष्णूंचे सुदर्शनचक्र बनले. अमोघ यमदंड, शंकरांचे त्रिशूल, काळाचे खड्ग, कार्तिकेयाची शक्ती, भगवती दुर्गेचा शूल इत्यादींची निर्मिती याच तेजापासून झाली. ब्रह्मदेवांच्या आज्ञेने विश्वकर्म्याने या सर्व अस्त्रांची निर्मिती केली. सूर्यदेवाची एक हजार किरणे फक्त उरली. बाकी सर्व छाटली गेली.

कश्यपमुनीच्या अंशाने व अदितीच्या गर्भातून सूर्याचा जन्म झाला म्हणून तो आदित्य या नावाने प्रसिद्ध झाला. सूर्य बारा स्वरूपे धारण करून बारा मासांत, बारा राशींत संक्रमण करून राहातो. त्यांच्या संक्रमणामुळे संक्रांत होते. या संक्रातीस पुण्यकर्मे करून अनेक थोर फले प्राप्त करून घेता येतात. मकरसंक्रातीस सूर्योदयाच्या आधी

स्नान करावे. यामुळे दहा हजार गोदानांचे फल मिळते. या वेळी केलेले दान, तर्पण, देवपूजा अक्षय होते. थंडीत रुईदार वस्त्र दान करावे. शरीरास कसलेच दुःख होणार नाही. तुलादान व शय्यादान यांचेही महत्त्व विशेष आहे. माघ शुक्ल तृतीयेस मन्वन्तरतिथी समजतात. या दिवशी केलेले दान अक्षय होते. दान व सत्पुरुषांचे पूजन ही परलोकात अनंत फले देणारी आहेत.

## भगवान सूर्याची उपासना

स्कंदाने महादेवांना सूर्य, रविवार यांचे माहात्म्य विचारल्यावरून महादेवांनी ते स्कंदास सविस्तर सांगितले. रविवारी मनुष्याने व्रतस्थ राहून सूर्याला लाल फुलांनी अर्घ्य द्यावेत. रात्री हविष्यान्नाचे भोजन करावे. असे केल्याने स्वर्गभ्रष्ट होत नाही. रविवारचे व्रत परम पवित्र व हितकारी आहे. ते सर्व कामना पूर्ण करणारे, पुण्यप्रद, ऐश्वर्यदायक, रोगनाशक, स्वर्ग व मोक्ष देणारे आहे. रविवारी जर सूर्याची संक्रान्त, शुक्लपक्षाची सप्तमी असेल तर त्या दिवशीचे व्रत, पूजा, जप सर्व काही अक्षय होते. शुक्लपक्षाच्या रविवारी ग्रहपती सूर्याची पूजा करावी. लाल कमलावर विराजमान झालेल्या, सुंदर ग्रीवाने शोभणाऱ्या, रक्तवस्त्रधारी, लाल रंगाच्या आभूषणांनी शोभणाऱ्या भगवान सूर्याचे ध्यान करावे. आपल्या हातातील फूल हुंगून ईशान्य कोपऱ्यात फेकून द्यावे यानंतर 'आदित्याय विद्महे भास्कराय धीमहि तन्नोभानुः प्रचोदयात्' या सूर्यगायत्रीचा जप करावा. भक्तीने पुष्प व केळी आदी सुंदर फळे अर्पण करावीत. पाणी द्यावे. चंदन, धूप, दीप, नैवेद्य, जलनिवेदन करून मग जप, स्तुती, मुद्रा, नमस्कार यांनी सूर्याची आराधना करावी. पहिल्या मुद्रेचे नाव आहे अंजली व दुसऱ्या मुद्रेचे आहे धेनू.

भगवान सूर्य एक असूनही कालभेदांनुसार नाना रूपे धारण करून प्रत्येक मासात प्रकट होतो. एकच सूर्य बारा रूपांत प्रकट होतो. मार्गशीर्षात मित्र, पौषात सनातन विष्णू, माघात वरुण, फाल्गुनात सूर्य, चैत्रात भानू, वैशाखात तापन, ज्येष्ठात इंद्र, आषाढात रवी, श्रावणात गभस्ती, भाद्रपदात यम, आश्विनात हिरण्यरेता, कार्तिकात दिवाकर.

अशी यांची बारा मासांची बारा नावे आहेत. त्याचे रूप अत्यंत विशाल, महान तेजस्वी, प्रलयकालीन अग्नीच्या समान आहे. सर्वांना प्रसन्नता देणाऱ्या सूर्याच्या महामंत्राचा प्रभाव फार मोठा आहे. हा महामंत्र असा आहे;

ॐ नमः सहस्रबाहवे आदित्याय नमो नमः ।
नमस्ते पद्महस्ताय वरुणाय नमो नमः ॥
नमास्तिमिरनाशाय श्रीसूर्याय नमो नमः ।
नमः सहस्रजिव्हाय भानवे च नमो नमः ॥
त्वं च ब्रह्मा त्वं च विष्णू रुद्रस्त्वं च नमो नमः ।
त्वमग्निस्सर्वभूतेषु वायुस्त्वं च नमो नमः ॥
सर्वगः सर्वभूतेषु नहि किंचित्त्वया विना ।
चराचरे जगत्यस्मिन् सर्वदेहे व्यवस्थितः ॥

'सहस्र किरणांनी सुशोभित असणाऱ्या भगवान आदित्यास नमस्कार असो. हातात कमल धारण करणाऱ्या वरुणदेवास वारंवार नमस्कार असो. अंधाराचा नाश करणाऱ्या सूर्यदेवास अनेकदा नमस्कार असो. रश्मिमयी सहस्र जिव्हा धारण करणाऱ्या भानूस नमस्कार असो. भगवान, आपणच ब्रह्मा, आपणच विष्णू, आपणच रुद्र आहात. आपणांस नमस्कार असो. आपण सर्व प्राण्यांत अग्नी व वायू या रूपांनी विराजमान आहात. आपणांस नमस्कार असो. आपलीच सर्वत्र गती व सर्व भूतांत स्थिती असते. आपणांशिवाय कोणत्याच वस्तूस सत्ता नसते. आपणच या चराचर जगतात, सर्व देहधारी यांच्यात स्थित आहात.'

या मंत्राचा जप करून मनुष्याने संपूर्ण अभिलाषित पदार्थ व स्वर्ग आदींचा भोग प्राप्त करून घ्यावा. आदित्य, भास्कर, सूर्य, अर्क, भानू, दिवाकर, सुवर्णरेता, मित्र, पूषा, त्वष्टा, स्वयंभू व तिमिराश – ही सूर्याची बारा नावे आहेत. जो मनुष्य पवित्र होऊन या बारा नामांचा पाठ करतो तो सर्व पापे व रोग यांपासून मुक्त होऊन परमगतीस जातो.

या भास्करास आणखीही काही प्रधान नावे आहेत. तपन, तापन, कर्ता, हर्ता, महेश्वर, लोकसाक्षी, त्रिलोकेश, व्योमाधिप, दिवाकर, अग्निगर्भ, महाविप्र, खग, सप्ताश्ववाहन, पद्महस्त, तमोभेदी, ऋग्वेद,

यजु:सामग, कालप्रिय, पुंडरीक, मूलस्थान, भावित; ही सर्व सूर्याचीच नावे असून मनुष्याने भक्तिपूर्वक यांचे स्मरण करून रोगाचे व भयाचे नाव पुसून टाकावे. 'ॐ इंद्राय नमः स्वाहा' 'ॐ विष्णवे नमः' या मंत्रांनी जप, होम, संध्योपासन केले पाहिजे. हे मंत्र सर्व प्रकारची शांती देणारे असून सर्व विघ्नांचा नाश करणारे आहेत.

सर्व मनकामना पूर्ण करणारा व सर्व प्रयोजने सिद्ध करणारा भास्कराचा एक मूलमंत्र आहे. 'ॐ ऱ्हां ऱ्हीं सः सूर्याय नमः' या मंत्राने सर्व प्रकारच्या सिद्धी प्राप्त होतात. या जपाने रोग नाहीसे होतात. अनिष्टाचे भय उरत नाही. जे लोक अभक्त, पाखंडी असतील त्यांना हा मंत्र सांगू नये. नास्तिकाला हा मंत्र कधी सांगू नये. पुत्राची कामना करणाऱ्यांनी, कन्येची इच्छा करणाऱ्यांनी, विद्या व धन मिळविण्याची इच्छा करणाऱ्यांनी शुद्ध आचाराने संपन्न होऊन या मंत्राचा जप करावा.

सूर्यदेवाच्या उपासनेने मध्यप्रदेशातील राजा भद्रेश्वर याला फार चांगली व थोर प्रचीती आली. हा चक्रवर्ती राजा तपस्या व नाना प्रकारची व्रते ह्यांनी पवित्र झाला होता. प्रतिदिन देव, ब्राह्मण, अतिथी, गुरुजन ह्यांचे पूजन तो करी. त्याचे वर्तनही न्यायास अनुकूल होते. तो स्वभावाने सुशील व पारगामी विद्वान होता. एकदा त्याच्या डाव्या हातास कुष्ठ झाले. वैद्यांनी खूप उपचार केले, पण ते श्वेतकुष्ठ बरे झाले नाही. प्रधान ब्राह्मणांनी त्याला एक उपाय सांगितला,

'महाराज, आपण धर्मशील आहात. परमबुद्धिमान आहात. आपण जर या राज्याचा त्याग केला तर सारी प्रजा कष्टी होईल. आपण आता या रोगास प्रतिबंधक म्हणून एक उपाय करावा. महाराज, आपण याच आपल्या राज्यात राहून भगवान सूर्याची उपासना करावी. आपण या भयंकर पापापासून मुक्त व्हाल. आपणांस स्वर्ग व मोक्ष यांची प्राप्ती होईल.'

राजाने सूर्याची आराधना सुरू केली. प्रत्येक दिवशी मंत्रपाठ, नैवेद्य, नाना प्रकारची फळे, अर्घ्य, अक्षत, जपापुष्प, लाल चंदन, कुंकू, शेंदूर, कदलीपत्र, त्याचे मनोहर फूल इत्यादींनी तो भगवान सूर्याची

मनोभावे पूजा करायचा. तो मन लावून सूर्यास अर्घ्य द्यायचा. त्याने सूर्याची उपासना एकाग्र चित्ताने केली. त्यामुळे राजाचा रोग समूळ नष्ट झाला. त्याच्यावर सूर्य प्रसन्न झाला व म्हणाला, 'राजा, मी संतुष्ट आहे. कोणताही एक वर माग.'

'सर्वांना नेत्र देणाऱ्या सूर्यदेवा, मला अभीष्ट वर देता ? तर अशी कृपा करा की, आम्ही सर्व आपणांपाशी सुखरूप राहू.'

'राजा, तुझे मंत्री, पुरोहित, ब्राह्मण, स्त्रिया, अन्य परिवार हे सर्व शुद्ध व पवित्र होऊन माझ्या रमणीय धामात येतील.'

त्यानंतर भद्रेश्वर सर्व परिवारासह सूर्यलोकात गेला. जो मनुष्य पवित्रतापूर्वक या प्रसंगाचा पाठ करील तो सर्व पापांतून मुक्त होऊन रुद्राप्रमाणे या पृथ्वीवर पूजित होईल. जो याचे श्रवण करील त्यालाही अभीष्ट फलाची प्राप्ती होईल, हे अत्यंत गोपनीय रहस्य भगवान सूर्याने यमराजास उपदेशिले होते. व्यासांच्यामुळे ते या पृथ्वीवर उपलब्ध झाले.

## पाप व पुण्य यांची फले

राजा ययाती व इंद्रसारथी मातली यांच्या भेटीत तत्त्वचर्चा जशी झाली तशी आचारासंबंधीही खूपच विवेचना झाली. या मर्त्यलोकात माणसे फार पापे करतात. त्यांच्या कर्मांची फले कशी मिळतात ? या ययातीच्या प्रश्नाचे उत्तर देताना मातलीने पाप व पुण्य यांचे व त्यांच्या फलांचे वर्णन केले आहे. जे लोक वेदांची निंदा करतात, वेदोक्त सदाचरणाची निंदा करतात, आपल्या कुलाचा आचार सोडून देतात, जे साधूंना पीडा देतात ते सर्व पातकीच होत. तत्त्ववेत्त्या पुरुषांनी या दुष्कर्मांना पातक असेच नाव दिले आहे. जो मातापित्यांची निंदा करतो, बहिणीस सदा मारतो, तिची गर्हणा करतो, त्याची ही कर्मे पातकेच होत. जो श्राद्धकाली रागावतो, कामलोभांनी त्रस्त होतो, पाच कोसांच्या आत राहणाऱ्या जावयास, भाच्यांना, बहिणीस जो बोलावीत नाही, त्याच्या श्राद्धकर्मात पितर जेवत नाहीत. जावयाची उपेक्षा केल्याने श्राद्धकर्ता पुरुष पितृहत्येसारखे पातक करतो. दान करताना खूप ब्राह्मण

आले, पण त्यांतील काहींना दान दिले, एखाद्यास दिले नाही तरी दान करणाऱ्यास पाप लागते. श्राद्धाच्या वेळी निमंत्रित ब्राह्मणाखेरीज इतर दुसरा ब्राह्मण जरी आला तरी त्याला भोजन, वस्त्र, तांबूल, दक्षिणा देऊन त्याचा सत्कार करावा. यामुळे श्राद्ध करणाऱ्याच्या पितरांना मोठाच हर्ष होईल. श्राद्धात ब्राह्मणभोजन झाल्यावर जो आदरपूर्वक दक्षिणा देत नाही त्याला गोहत्या आदीसमान पातक लागते.

निमंत्रित ब्राह्मणाचा उचित आतिथ्यसत्कार केला पाहिजे. ब्राह्मणाशिवाय जो श्राद्ध करतो त्याच्या घरी पितर भोजन करीत नाहीत. शाप देऊन ते परत जातात. ब्राह्मणहीन श्राद्ध केल्याने मनुष्य महापापी होतो. पितृकुलाचा आचार सोडून जो वर्तन करतो तो महापापी मानावा. जो मनुष्य शिवभक्तांचे दोष काढतो, जो ब्राह्मणांशी द्रोह करतो, जो विष्णूंची निंदा करतो तो महापापी आहे.

प्रथम पुण्यमय भागवतपुराणाची पूजा करावी. त्यानंतर विष्णुपुराण, हरिवंश, मत्स्यपुराण, कूर्मपुराण यांची पूजा करावी. जो पद्मपुराणाची पूजा करतो त्याच्याकडून प्रत्यक्ष भगवानांचीच पूजा होते. जो मनुष्य भगवानांच्या या ज्ञानस्वरूप पुराणाची पूजा केल्याखेरीज वाचतो, लिहितो, लोभात येऊन विकतो, अपवित्रस्थानी राखतो, स्वत: अशुद्ध राहून अशुद्ध स्थानी पुराण सांगतो, त्याचे हे सर्व कार्य गुरुनिंदेच्या समान आहे. गुरूची पूजा न करताच जो त्याच्याकडून शास्त्र श्रवण करतो, त्याची आज्ञा मोडण्याचा विचार करतो, त्याला प्रतिवाद करतो, जो गुरूच्या कार्याची उपेक्षा करतो, रोगपीडित, असमर्थ, शत्रूच्या द्वारे अपमानित गुरूस जो सोडतो तो पापी मनुष्य कुंभीपाक नरकात निवास करतो. जो स्त्री, पुत्र, मित्र यांची अवहेलना करतो, त्याला गुरुनिंदेसारखेच पातक लागते. ब्राह्मणाची हत्या करणारा, सुवर्ण चोरणारा, शराबी, गुरूच्या आसनावर, शय्येवर बसणारा, झोपणारा पातकी असतो. जो क्रोध, द्वेष, भय, लोभ, यांनी प्रेरित होऊन ब्राह्मणाचा अपमान करतो तो ब्राह्मण घातकी मानला गेला आहे.

ज्याचे शरीर भूक व तहान यांनी पीडलेले आहे, जो अन्न खाऊ इच्छितो, त्याच्या कार्यात विघ्न उत्पन्न करणारा मनुष्य ब्राह्मण घातकी

आहे. जो चुगलखोर, सर्व लोकांचे दोष शोधणारा, सर्वांना उद्वेगात टाकणारा, क्रूर असणारा, देव, ब्राह्मण, गाय यांना दिलेली भूमी हरण करणारा तो ब्रह्मघातीच असतो. दुसऱ्याचे, ब्राह्मणाचे धन अपहरण करणारा ब्रह्महत्येसमान भारी पातकी असतो. जो अग्निहोत्र, पंचयज्ञादी कार्ये यांचा त्याग करून माता, पिता, गुरू यांचा अनादर करतो, खोटी साक्ष देतो, अभक्ष्य वस्तूंचे भक्षण करतो, वनात जाऊन प्राण्यांची हत्या करतो, गोशाला, देवमंदिर, गाव व नगर यांना जो आग लावतो, त्याच्या हातून मोठेच पाप घडते.

दीन माणसांचे सर्वस्व हरण करणे, परक्याची स्त्री, हत्ती, घोडा, गाय, पृथ्वी, चांदी, रत्न, धान्य, रस, चंदन, अरगजा, कापूर, कस्तुरी, मालपुवा, वस्त्र यांची चोरी करणे, दुसऱ्याची ठेव लुबाडणे, ही सर्व पापे सुवर्णाच्या चोरीप्रमाणे आहेत. विवाहयोग्य कन्येचा योग्य वराशी विवाह न करणे, पुत्र व मित्र यांच्या भार्यांशी, आपल्या बहिणीशी समागम करणे, कुमारी कन्येवर बलात्कार करणे, अंत्यज जातीच्या स्त्रीचे सेवन, सवर्णा स्त्रीशी संभोग, ही पापे गुरुपत्नीशी गमन केल्याच्या पातकासमान आहेत. जो ब्राह्मणास कबूल करूनही धन देत नाही, त्याची त्याला आठवणही राहात नाही, त्याला उपपातक लागते.

ब्राह्मणाच्या धनाचे अपहरण, मर्यादेचे उल्लंघन, अत्यंत मान, अधिक क्रोध, दंभ, कृतघ्नता, अत्यंत विषयासक्ती, कृपणता, शठता, मात्सर्य, परस्त्रीगमन, साध्वी कन्येस कलंकित करणे, परिवित्ती, (मोठा भाऊ अविवाहित असता धाकटया भावाने लग्न केल्यास मोठा भाऊ परिवित्ती व धाकटा परिवेत्ता समजला जातो.) परिवेत्ता व त्याची पत्नी यांच्याशी संपर्क ठेवणे, धनाच्या अभावामुळे पुत्र, मित्र, पत्नी यांचा त्याग करणे, काही कारण नसताना स्त्रीस सोडून देणे, साधू व तपस्वी यांची उपेक्षा करणे, गाय, क्षत्रिय, वैश्य, स्त्री, शूद्र यांचे प्राण घेणे, शिवमंदिर, वृक्ष, फुलवाडी यांना नष्ट करणे, आश्रमवासियांना कष्ट देणे, नोकरवर्गास दुःख देणे, वस्त्र व पशू यांची चोरी करणे, ज्यांना मागणे उचित नाही त्यांना याचना करून मागणे, यज्ञ, तलाव, उद्यान, स्त्री, संतान यांची विक्री करणे, तीर्थयात्रा, उपवास, व्रत, शुभकर्मांची फले विकणे, स्त्रियांच्या

धनावर उपजीविका चालविणे, ही सर्व पापेच आहेत. दुसऱ्याचे दोष सांगणे, दुसऱ्याच्या छिद्रावर दृष्टी ठेवणे, दुसऱ्याचे धन हडपणे, परस्त्रियां-वर वाईट नजर ठेवणे ही पापे गोहत्येसारखीच मानावी लागतात.

जो मनुष्य खोटे बोलतो, स्वामी, मित्र, गुरू, यांच्याशी द्रोह करतो, माया रचतो, शठता करतो, जो स्त्री, पुत्र, मित्र, बालक, वृद्ध, दुर्बल मनुष्य, भृत्य, अतिथी, बंधुबांधव यांना भुकेले सोडून एकटाच भोजन करतो, जो स्वतःच खूप मिठाई खातो, दुसऱ्याला अन्न देत नाही, हे सर्व पापाचारच होत. जो सर्वप्रकारच्या पापांत डुबतो, साधू, ब्राह्मण, गुरू, गाय यांना जो मारतो, सन्मार्गी स्त्रीस जो मारतो, ज्याच्या शरीरात आळस भरून राहिला आहे, जो दुर्बल पशूंना कामास जुंपतो, बलपूर्वक त्यांना हाकतो, त्यांच्यावर अधिक भार लादतो, घायाळ झाले तरी जो त्यांना कामासाठी जुंपतो, तो महापापी आहे. भुकेलेल्या अतिथीचा जो आदरसत्कार करीत नाही तो नरकात जातो. जो मूर्ख, अनाथ, विकल, दीन, बालक, वृद्ध, क्षुधातुर व्यक्तीवर दया करीत नाही तो नरकाच्या समुद्रात पडतो. नीतिशास्त्रांची आज्ञा मोडून जो मनास येईल तशी वसुली करतो, अकारण दंड जो घेतो त्यालाही नर-कात जाणे भाग पडते. ज्या राज्यात प्रजा लाचखोर अधिकारी व चोर यांनी पीडित होते तो राजा नरकात जातो. जो ब्राह्मण अन्यायी राजा-कडून दान घेतो तो घोर नरकात जातो. पापाचारी पुरवासियांचे पाप त्या राजाचेच समजले जाते.

जो मनुष्य दुसऱ्यांचे तूप, तेल, मध, गूळ, ऊस, दूध, दही, फूल, चांदी, पादत्राण, छत्री, बैलगाडी, पालखी, मुलायम आसन, शंख, वंशी, बाजा, कपडे, वस्त्रे, द्रव्य इत्यादींचे हरण करतो तो सदा नरकात जातो. दुसऱ्याची वस्तू थोडी असेल, पुष्कळ असेल, जो तिच्यावर ममत्व दाखवितो, ती चोरतो, तो निःसंदेह नरकात जातो. अशा पापांना यम-राजाचे दूत कडक शासन करतात.

श्रेष्ठ ब्राह्मणास पादत्राण देणे, खडावा देणे, हे मोठे पुण्यदायक आहे. वस्त्र दान करणारा मनुष्य दिव्य वस्त्र धारण करून परलोकात जातो. पालखी दान करणारा मनुष्य विमानद्वारे सुखपूर्वक यात्रा करतो. उद्यान

लावणारा पुरुष शीतल छायेत सुखाने परलोकाची यात्रा करतो. देवांसाठी मंदिर, संन्याश्यांसाठी आश्रम आणि अनाथ व रोगी लोकांसाठी घर बनवितो तो परलोकात उत्तम महालात राहातो. जो देव, अग्नी, गुरू, ब्राह्मण, माता, पिता, यांची पूजा करून विद्वान, गुणवान व दीन यांना राहायला घर देतो, तो सर्व कामना पूर्ण करणाऱ्या ब्रह्मलोकास जातो. ज्याने श्रद्धेने ब्राह्मणास एका कवडीचे दान केले असेल तो स्वर्गात देवांचा अतिथी बनतो.

अहिंसा, क्षमा, सत्य, लज्जा, श्रद्धा, इंद्रियसंयम, दान, यज्ञ, ध्यान ही धर्माची दहा प्रमुख साधने आहेत. अन्न देणारा प्राणदाता होतो. अन्नदानाचे फल सर्वांत अधिक आहे. अन्नाने पुष्ट होऊनच मनुष्य अधिक पुण्याचा संचय करतो. धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांना साधण्यासाठी सुदृढ शरीर हवे. शरीरास अन्न हवे. म्हणून अन्न व जल यांचे दान विशेष महत्त्वाचे आहे. अन्न, पाणी, घोडा, गाय, वस्त्र, शय्या, सूत, आसन या आठ वस्तूंचे दान प्रेतलोकासाठी उत्तम आहे. या दानधर्मामुळेच मनुष्य धर्मराजाच्या नगरास सुखपूर्वक जातो. दान दिल्यानेच मनुष्य अनुपम सुख भोगतो. मनुष्यांत श्रेष्ठ, सदाचारी, यज्ञकर्ता, सुनीतियुक्त, विद्वान ब्राह्मणच ब्रह्मलोकास जातो. युद्धास उत्साहपूर्वक जाणाऱ्यांना इंद्रलोकाची प्राप्ती होते.

## ब्रह्मचाऱ्याने पाळावयाचे नियम

ऋषिमुनींच्या विचारण्यावरून व्यासांनी सनातन कर्मयोगाचे वर्णन विस्ताराने केले. कर्मयोग ब्राह्मणांना अक्षय फल देणारा आहे. श्रेष्ठ ब्राह्मणास उचित आहे की, त्याने गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणे वयाच्या आठव्या वर्षी उपनयन झाले की, वेदांच्या अध्ययनास आरंभ करावा. दंड, मेखला, यज्ञोपवीत, काळे मृगचर्म धारण करून मुनिवेष घ्यावा. भिक्षा मागून अन्न ग्रहण करावे. ब्रह्मदेवांनी पूर्वीच यज्ञोपवीत बनविण्यासाठी कापसाची निर्मिती केली. ब्राह्मणासाठी तीन पदरी जानवे शुद्ध मानले गेले आहे. द्विजाने यज्ञोपवीत धारण करूनच राहावे. आपल्या शेंडीस गाठ मारावी. यज्ञोपवीत न घालता, शेंडी न बांधता केलेले कर्म विधिपूर्वक होत नाही. वस्त्र रुईप्रमाणे सफेद वा भगव्या

रंगाचे असावे. श्वेत वस्त्र अत्यंत उत्तम. शुभ आच्छादन काळे मृगचर्म मानले गेले आहे. यज्ञोपवीताचे 'उपवीत' 'निवीत' 'प्राचीनावीत' इत्यादी प्रकार समजावून घ्यावेत. हवनगृहात, गोशालेत, होम व जपाच्या वेळी, स्वाध्यायात, भोजनकाळी, उपवीत ढंगाप्रमाणे यज्ञोपवीत असावे.

ब्राह्मणास तीन वेढ्यांची मूंजाची मेखला असावी. मूंज न मिळाल्यास कुशाची करावी. मेखलेस गाठ एक वा तीन असाव्यात. द्विजाने बांबूचा दंड अथवा पलाशाचा दंड धारण करावा. दंड त्याच्या पायांपासून डोक्यापर्यंत उंच असावा. द्विजाने सकाळी व संध्याकाळी एकाग्र चित्ताने संध्या करावी. काम, क्रोध, लोभ, भय, मोह यांनी वश होऊन जो संध्योपासन सोडतो त्याचे पतन होते. संध्या केल्यानंतर द्विजाने प्रसन्न चित्ताने सायंकाळी व प्रातःकाळी अग्निहोत्र करावे. दुसऱ्या वेळेस स्नान करून देव, ऋषी, पितर यांना तर्पण करावे. त्यानंतर पत्र,पुष्प, फल, जव व जल आदींनी देवांची पूजा करावी. विधिपूर्वक गुरुजनांना नमस्कार करावा.

जल, भिक्षा, फूल, समिधा यांचा दुसऱ्या दिवसासाठी संग्रह करू नये. प्रत्येक दिवशी जाऊन आवश्यकतेनुसार या वस्तू आणाव्यात. ब्राह्मणाची भेट झाली तर त्याची कुशलता विचारावी. क्षत्रियास अनामय, वैश्यास क्षेम, शूद्रास आरोग्य विचारावे. उपाध्याय (गुरू), पिता, मोठा बंधू, राजा, मामा, श्वशुर, काका इत्यादी पुरुषांना गुरू मानावे. माता, आजी, गुरुपत्नी, आत्या, मावशी, मोठी बहीण, दूध पाजणारी दाई या स्त्रियांनाही गुरू मानावे. या गुरुवर्गासाठी मन, वाणी, क्रिया यांनी अनुकूल वर्तन ठेवावे. गुरुजनास पाहून उभे राहून हात जोडून प्रणाम करावा. त्यांच्याबरोबर एका आसनावर बसू नये. त्यांच्याशी वादविवाद करू नये. आपल्या जीविताच्या रक्षणासाठीही गुरूशी द्वेषपूर्वक बोलणे करू नये. पिता, माता, आचार्य हे तीन गुरू सर्वश्रेष्ठ आहेत. यांत माता ही सर्वांत महत्त्वाची. उत्पन्न करणारा पिता, जन्म देणारी माता, विद्येचा उपदेश देणारा गुरू, मोठा भाऊ, स्वामी हे पाच गुरू परमपूज्य मानले गेले आहेत. कल्याणकामी पुरुषाने प्रयत्नपूर्वक

प्राणत्याग करूनही या पाच गुरूंचे रक्षण व सन्मान केला पाहिजे. पिता व माता जिवंत आहेत तोपर्यंत सर्व सोडून पुत्राने त्यांची सेवा करावी. मातेसमान देवता व पित्यासमान गुरू नाही. म्हणून मन, वाणी व क्रिया यांनी नेहमी त्यांचे प्रिय करावे.

ज्येष्ठ बंधू पित्यासमान मानावा. जो मूर्ख त्याचा अपमान करतो त्याला मृत्यूनंतर घोर नरकात पडावे लागते. मातेचे उपकार नेहमी स्मरावेत. धर्मज्ञ पुरुषाने वयाने व ज्ञानाने मोठ्या असणाऱ्या व्यक्तीस 'आपण' असे म्हणावे. विद्या, कर्म, वय, भाईबंधू, कुल या पाचांचा सन्मान करावा. नव्वद वर्षांच्या वरील शूद्राचाही सन्मान करावा. ब्राह्मण, स्त्री, राजा, नेत्रहीन, वृद्ध भारवाही, रोगी व दुर्बल यांना जाण्यासाठी रस्त्यातून मार्ग द्यावा.

ब्रह्मचाऱ्याने प्रतिदिन मन व इंद्रिये यांचा संयम राखून शिष्ट पुरुषांच्या घरी भिक्षा मागावी. व ती गुरूस सांगावी. गुरू तीतून जेवढे अन्न भोजनासाठी देईल तेवढेच मौनभावाने सेवन करावे. उपनयन-संस्कारयुक्त ब्राह्मणाने 'ॐ भवति भिक्षां मे देहि' म्हणून भिक्षा मागावी. क्षत्रिय ब्रह्मचाऱ्याने वाक्याच्या मध्ये, वैश्याने अंती 'भवत्' शब्दाचा प्रयोग करावा. ब्रह्मचारी पुरुषाने प्रथम आपल्या मातेस, बहिणीस, मावशीस भिक्षा मागावी. सजातीय लोकांच्या घरीच भिक्षा मागावी. पतिताच्या घरी भिक्षा मागू नये. ज्याने वेदाध्ययन केले नाही, ज्याने यज्ञाची परंपरा बंद केली आहे, त्याच्या घरी भिक्षा मागू नये. गुरूच्या कुलात भिक्षा मागू नये. आपले कुटुंब, कुल व संबंधी लोक यांच्याही घरी भिक्षेसाठी जाऊ नये.

अशा रीतीने भिक्षा मागितल्यानंतर मग भोजन करावे. जितें-द्रिय राहावे मौन राहून ब्रह्मचारी पुरुषाने प्रतिदिन भिक्षेचे अन्न खावे. एका ठिकाणचे अन्न खाऊ नये. भिक्षेवर केलेला निर्वाह ब्रह्मचाऱ्यास उपवासासारखाच असतो. गर्वात येऊन अन्नाची गर्हणा न करावी. त्याला पाहून हर्ष प्रकट करावा. मन प्रसन्न ठेवावे, सर्व प्रकारांनी त्या अन्नाचे अभिनंदन करावे. अधिक भोजन आरोग्य, आयुष्य, स्वर्गप्राप्ती यांना हानी करणारे आहे. ते पुण्याचा नाश करणारे व लोकनिंदित

आहे. पूर्वाभिमुख होऊन अन्नाचे भोजन करावे. उत्तराभिमुख होऊन भोजन कधीच करू नये. भोजन करणाऱ्या पुरुषाने हात-पाय नीट धुवावेत. शुद्ध स्थानावर बसून प्रथम जलाने आचमन करावे. भोजन झाल्यावरही दोनदा आचमन करावे.

भोजन केल्यावर, पाणी प्याल्यावर, झोपून उठल्यावर, स्नान केल्यावर, गावात हिंडून आल्यावर,ओठ चाटल्यावर, वस्त्र बदलल्यावर, वीर्य, मल, मूत्र यांचा त्याग केल्यावर, अनुचित वार्ता बोलल्यावर, अध्ययनास आरंभ करतेवेळी, खोकला येतो तेव्हा, चौक वा स्मशानभूमी येथे फिरून आल्यावर, दोनही संध्यासमयी श्रेष्ठ द्विजाने आचमन केल्यावरही पुन्हा आचमन करावे. चांडाल, म्लेच्छ, स्त्री, शूद्र, उष्टया मुखाचा मनुष्य यांच्याशी वार्तालाप केल्यावर आचमन करावे. आपल्या शरीराचा स्त्रीला स्पर्श झाला तर, आपले केस, घसरणारे वस्त्र यांच्या स्पर्शानंतरही आचमन करावे. आचमनासाठी पाणी फार गरम नसावे, त्यात फेस नसावा. ते खारे नसावे. पवित्रतेसाठी पुरुषाने पूर्वाभिमुख व उत्तराभिमुख बसूनच आचमन करावे. कोठूनही बाहेरून आले की, दोन पाय धुतल्याखेरीज पुरुष पवित्र होत नाही. कोसळणाऱ्या पावसाच्या धारेत उभे राहून, हाताने उडविलेल्या जलाने आचमन करू नये. यज्ञोपवीत नसताना आचमन निषिद्ध आहे. खडावा घालून आचमन करू नये. बोलताना, हसताना, बिछान्यावर बसून आचमन करू नये. आचमनाच्या वेळी हाताच्या बोटांनी आवाज करू नये. मनात दुसरा विचार आणू नये. हृदयापर्यंत पोचेल इतक्याच जलाने आचमन करावे. क्षत्रियाने कंठापर्यंत पोचेल असे आचमन करावे. वैश्याने जिव्हेच्या द्वारे आचमन करावे. स्त्री व शूद्र जलाच्या स्पर्शानेच शुद्ध होतात.

अंगठ्याच्या मुळाशी ब्रह्मतीर्थ असते. अंगठा व तर्जनी यांच्या मधल्या भागास पितृतीर्थ म्हणतात. अशा प्रकारे बोटांच्या आश्रयाने प्राजापत्यतीर्थ, देवतीर्थ, (आर्षतीर्थ) देवतीर्थ, आग्नेयतीर्थ (सौमिकतीर्थ) इत्यादींचा निवास असतो. ब्राह्मणाने सदा ब्रह्मतीर्थापासूनच आचमन करावे. त्याने पितृतीर्थापासून आचमन कधी करू नये. द्विजाने दोन वेळा जलाचे आचमन करावे. त्यामुळे ब्रह्मा, विष्णू व महेश तृप्त होतात.

मुखाचे परिमार्जन केल्याने गंगा व यमुना तृप्त होतात. दोन नेत्रांच्या स्पर्शानें सूर्य व चंद्र संतुष्ट होतात. नासिकेच्या दोनही छिद्रांना स्पर्श केल्यास अश्विनीकुमार तृप्त होतात. कानांना स्पर्श केल्यास वायू व अग्नीची तृप्ती होते. हृदयस्पर्शाने सर्व देवगण संतुष्ट होतात. मस्तकाच्या स्पर्शाने अंतर्यामी अद्वितीय पुरुष संतुष्ट होतो. मधुपर्क, सोमरस, पान, फूल, मूल, ऊस या सर्वांना मनूने दोष नाही दिला. यांनी मुख उष्टे होत नाही.

रात्रीच्या समयी जंगलातून चोर, व्याघ्र यांची भीती असल्यास पुरुषाने द्रव्य हातात धरूनही मलमूत्राचा त्याग करायला हरकत नाही. दिवसा एरव्ही शौचास जाणे झाले तर जानवे कानावर अडकवून ठेवावे. उजव्या कानावर जानवे ठेवून उत्तराभिमुख होऊन मलमूत्राचा त्याग करावा. रात्री मात्र दक्षिणेकडे तोंड करावे. पृथ्वीवर लाकूड, पाने, माती, गवत टाकून व आपल्या मस्तकास वस्त्राने झाकून मलमूत्राचा त्याग केला पाहिजे. झाडाच्या सावलीत, विहिरीच्या जवळ, नदीच्या किनाऱ्यावर, गोशाला, मंदिर, जलाशय, रस्ता, राख, अग्नी, स्मशानभमी इत्यादी ठिकाणी मलमूत्राचा त्याग करू नये. उभे राहून वा नग्न बनून मल-मूत्राचा त्याग करू नये. चालताना मलमूत्राचा त्याग करू नये. खडावा वा पादत्राण घालून, छत्री उघडून, अंतरिक्षाकडे तोंड करून, स्त्री, गुरू, ब्राह्मण, गाय, देव, देवालय, जल यांच्याकडे तोंड करून, नक्षत्रे व ग्रह पाहून, सूर्य, चंद्रमा, अग्नीकडे पाहून मलमूत्राचा त्याग करू नये. शौचआदी झाल्यावर दुर्गंधी घालविण्यासाठी मातीने चोळून शुद्ध व्हावे. ही माती कोठली घ्यावी? कोठली घेऊ नये? देवमंदिर, विहीर, घराची भिंत, जल यांतून ही माती घेऊ नये, हातपाय स्वच्छ धुऊन प्रतिदिन आचमन करून शुद्ध व्हावे.

## ब्रह्मचारी शिष्याचे धर्म

दंड मेखला, मृगचर्म आदींनी संपन्न होऊन, शुद्ध होऊन ब्रह्मचारी युवकाने गुरूच्या मुखाकडे पाहावे. ते जेव्हा बोलावतील तेव्हा अध्ययना-साठी त्यांच्याकडे जावे. सदा हात जोडून उभे राहावे. सदाचारी व संयमी

बनावे. जेव्हा गुरू बसण्याची अनुज्ञा देतील तेव्हा त्यांच्या समोर वसावे. गुरूचे निरूपण ऐकणे, त्यांच्याशी बोलणे, ही दोनही कामे पडल्या पडल्या वा भोजन करताना करू नयेत. गुरूजवळील शिष्याचे आसन, त्याची शय्या यांना नेहमीच खालचे स्थान असावे. गुरूच्या परोक्षही त्यांचे नाव घेऊ नये. त्यांची चाल, त्यांची बोली, त्यांची रीत यांचे अनुकरण करू नये. जेथे गुरूंस लांच्छन लागत आहे, जेथे त्यांची निंदा होत आहे, तेथे कान देऊ नये. अथवा तेथून निघून जावे. दूर उभे राहून, क्रोधाने व्याप्त होऊन, स्त्रीच्या समीप राहून श्रीगुरूंची पूजा करू नये. गुरूंना प्रत्युत्तर देऊ नये. गुरू जर शेजारी उभे असतील तर आपण बसू नये.

गुरूसाठी नेहमी घडा, कुश, फूल, समिधा आणून ठेवाव्यात. प्रतिदिन त्यांच्या अंगणात झाडलोट करून सडापाणी करावे. गुरूंच्या उपयोगी वस्तूंवर, त्यांच्या शय्येवर, त्यांच्या खडावांवर, त्यांच्या आसनावर कधी पाय देऊ नये. गुरूंसाठी दंतमंजन आदींची व्यवस्था करावी. जे काही प्राप्त होईल ते गुरूंना निवेदन करावे. त्यांना विचारल्यावाचून कोठे जाऊ नये. सदा त्यांच्या हितात व प्रिय गोष्टीत रमावे. गुरूंच्या समीप पाय पसरून बसू नये. त्यांच्या समोर जांभई देऊ नये. हसणे, आळस देणे, खाकरणे या क्रिया गुरूपुढे करू नयेत. गुरूंजवळ खाली वसावे. एकाग्र चित्ताने त्यांची सेवा करावी. गुरू चालू लागले की त्यांच्या मागे आपण असावे. बैलगाडी, घोडागाडी, उंटगाडी, कुशाची चटई, शिलाखंड, नाव यांवर गुरूंच्या बरोबर शिष्याने बसले तरी चालेल.

शिष्य नेहमीच जितेन्द्रिय, जितात्मा, क्रोधहीन व पवित्र असावा. त्याने सदा मधुर व हितकारी वचन बोलावे. चंदन, माळा, स्वाद, शृंगार, प्राण्यांची हिंसा, तेलाचे मालिश, सुरमा, सरबतादी पेये, छत्र-धारण, काम, लोभ, भय, निद्रा, गाणेबजावणे, दुसऱ्यांना फटकारणे, कोणावर तरी लांच्छन लादणे, स्त्रीकडे पाहाणे, तिला स्पर्श करणे, दुसऱ्यांचा घात करणे, चुगली करणे, या दोषांचा शिष्याने त्याग करावा. जलाने भरलेला घडा, फूल, गोवर– शेण, माती, कुश या वस्तूंचा आवश्य-कतेनुसार संग्रह करावा. अन्नाची भिक्षा मागण्यासाठी प्रतिदिन गावात जावे. तूप, मीठ, शिळे अन्न, हे ब्रह्मचाऱ्यास वर्जित आहे. त्याने कधी

नृत्य पाहू नये. संगीत आदीपासून निःस्पृह असावे. स्त्रियांच्या बरोबर एकान्तात राहाणे व शूद्रांशी बातचीत करणे या गोष्टी निषिद्ध आहेत. गुरूंचे उच्छिष्ट औषध, अन्न यांचा त्याने स्वेच्छेने उपयोग करू नये.

ब्राह्मण गुरूंच्या परित्यागाचा विचारही मनात आणू नये. ज्याने लौकिक, वैदिक व आध्यात्मिक ज्ञान दिले त्या गुरूंशी कधीच द्रोह करू नये. गुरू जर घमेंडी असेल, कर्तव्य-अकर्तव्य जाणणारा नसेल, कुमार्ग-गामी असेल तर मनूने त्याचा त्याग करायला सांगितले आहे. जो योगी आहे, जो अधर्मापासून वाचवितो, हिताचा उपदेश करतो, त्याशीही गुरूप्रमाणेच वर्तन करावे. गुरूचा पुत्र, त्याची पत्नी, त्याचे बंधुबांधव यांच्याशी गुरूप्रमाणेच वर्तन असावे, त्यामुळे कल्याण होते. जर गुरूंच्या पुत्राने शिकविले तर गुरूंच्या समानच त्याचाही मान राखावा. पण गुरुपुत्राचे शरीर दावणे, त्याला न्हाऊ घालणे, उच्छिष्ट भोजन करणे, पाय धुणे इत्यादी गोष्टी करू नयेत. गुरूपत्नीस तेल लावणे, न्हाऊ घालणे, शरीर दावणे, केसांचा शृंगार करणे; इत्यादी सेवा करू नये. जर गुरूची स्त्री युवती असेल तर तिच्या चरणांना स्पर्श करून प्रणाम करू नये. 'मी अमुक आहे' असे म्हणून पृथ्वीवरच मस्तक टेकवावे. बाहेर आल्यावर प्रतिदिन गुरुपत्नीच्या चरणांना स्पर्श करावा. मावशी, मामी, सासू, अत्या या सर्व गुरुपत्नीसमान आहेत. म्हणून त्यांचा आदर गुरुपत्नीप्रमाणेच राखावा. थोरल्या भावाच्या सवर्ण पत्नीस प्रतिदिन चरणस्पर्शपूर्वक वंदन करावे. परदेशाहून आलेल्या कुटुंबीय श्रेष्ठ स्त्रियांच्या चरणांवर मस्तक झुकवावे.

शिष्याने अशा प्रकारे सदाचाराने संपन्न असावे. आपले मन ताब्यात ठेवावे. दंभहीन व्हावे. प्रतिदिन वेद, धर्मशास्त्र व पुराणे यांचे अध्ययन करावे. आचार्यांचा पुत्र, सेवापरायण, ज्ञान देणारा, धर्मात्मा, पवित्र, शक्तिशाली, अन्न देणारा, पाणी पाजणारा, साधु पुरुष, आपला शिष्य, हे दहा प्रकारचे शिष्य धर्मतः अध्ययन करणारे होत. कृतज्ञ, द्रोह न करणारा, मेधावी, गुरू करणारा, विश्वासपात्र, प्रिय हे सहा प्रकारचे द्विज विधिपूर्वक अध्ययन करण्यास योग्य आहेत. शिष्याने

आचमन करून, संयमशील होऊन उत्तराभिमुख बसून प्रतिदिन स्वाध्याय करावा. गुरुचरणांना प्रणाम करून दूर उभे राहावे. ' ये. अध्ययन कर ' असे ते म्हणतील त्यावेळी त्यांच्याजवळ जावे. ' आता पुरे ' म्हणतील त्यावेळी पाठ बंद करावा. अग्नीच्या पूर्व आदी दिशांना कुश पसरून उपासना करावी. तीन प्राणायाम करून पवित्र व्हावे. ब्रह्मचारी हा ॐकारजपाचा अधिकारी आहे. विप्राच्या अध्ययनाच्या आदिअंती विधिपूर्वक प्रणवाचा जप होणे अगत्याचे आहे. प्रतिदिनी प्रथम वेदांना अंजली देऊन मग त्यांचे अध्ययन करावे. वेद सर्व भूतांचे सनातन नेत्र आहेत. म्हणून त्यांचे रोज अध्ययन करावे. अन्यथा तो ब्राह्मणत्वापासून च्युत होतो. जो प्रतिदिन ऋग्वेदाचे अध्ययन करतो तो दुधाच्या आहुतीने, जो यजुर्वेदाचा पाठ करतो, तो दह्याच्या आहुतीने, जो सामवेदाचा पाठ करतो तो तुपाच्या आहुतीने, जो अथर्ववेदाचा पाठ करतो तो मधाच्या आहुतीने देवांना तृप्त करतो.

या देवांच्या जवळ नियमपूर्वक नित्यकर्मांनी आश्रय घेऊन वनात जाऊन एकाग्रचित्ताने गायत्रीचा जप करावा. प्रत्येक दिवशी अधिकात अधिक एक हजार जप करावा. मध्यम स्थितीत शंभर, कमीत कमी दहा वेळा तरी गायत्रीचा जप करावा. हा जपयज्ञच म्हटला गेला आहे. भगवानांनी गायत्री व वेद यांना तराजूत घालून तोलले. एका बाजूस चार वेद व एका बाजूस गायत्रीमंत्र. दोनहीकडे वजनें सारखीच झाली. द्विजाने श्रद्धाळू व एकाग्रचित्ताने प्रथम ओंकाराचा व नंतर व्याहृतिपूर्वक गायत्रीचा मंत्र उच्चारावा. पूर्वकल्पात ' भूः ', ' भुवः '. ' स्वः ' या तीन सनातन व्याहृती निर्माण झाल्या. त्या सर्वप्रकारच्या अमंगलाचा नाश करतात. या तीन व्याहृती क्रमशः प्रधान, पुरुष व कालाची, विष्णू, ब्रह्मा व महेशाची, सत्त्वगुण, रजोगुण व तमोगुणाची प्रतीके मानली गेली आहेत. प्रथम ' ॐ ', नंतर ' ब्रह्म ', त्यानंतर गायत्रीमंत्र यांचा मिळून एक महायोग नावाचा मंत्र तयार होतो. तो साराचेही सार आहे. जो ब्रह्मचारी प्रतिदिन या वेदमाता गायत्रीचा जप अर्थ समजून करतो, तो परमगतीस जातो. गायत्री वेदांची जननी आहे. ती सर्व जगतास पवित्र करणारी आहे. गायत्रीच्या शिवाय दुसरा एखादा मोठा जपण्या-

सारखा मंत्र नाही. हा मंत्र जाणूनच मनुष्य मुक्त होतो.

आषाढ, श्रावण व भाद्रपद यांच्या पौर्णिमांना वेदांचे उपाकर्म म्हटले आहे. या तिथींना वेदांच्या स्वाध्यायास आरंभ करावा. जोपर्यंत सूर्य दक्षिणायनाच्या मार्गावर चालतो, तोपर्यंत साडेचार महिने प्रतिदिन पवित्र स्थानावर बसून ब्रह्मचारीने एकाग्रतापूर्वक वेदांचा स्वाध्याय करावा. त्यानंतर द्विजाने पुष्यनक्षत्रावर घराच्या बाहेर जाऊन वेदांचा उत्सर्ग, म्हणजे स्वाध्यायसमाप्ती करावी. शुक्लपक्षात प्रातःकाली व कृष्णपक्षात संध्याकाळी वेदांचा स्वाध्याय करावा. वेदांचे अध्ययन, अध्यापन, त्यांचा प्रयत्न पूर्वक अभ्यास करणाऱ्या पुरुषाने पुढील अनध्यायांच्या समयांस अध्ययन बंद ठेवावे. रात्री जर हवा जोराने वाहू लागली, दिवसा धूळ उडविणारे वादळ आले तर, विद्युत् चमकत राहिली तर मेघांची गर्जना झाली तर, वृष्टी वा महान् उल्कापात झाला तर; अशा वेळी प्रजापती मनूने अनध्याय सांगितला आहे. अग्निहोत्रासाठी अग्नी प्रज्वलित केल्यावर असे उत्पात घडले तर वर्षाकाली अनध्याय समजावा. वर्षाकाल नसताना आकाशात मेघ दिसले तरी अध्ययन थांबवावे. उत्पातसूचक शब्द, भूकंप, चंद्रसूर्यादी ज्योतिर्मयांना उपद्रव दिसला तरी अध्ययन थांबवावे. प्रातःकाळी होमाग्नी प्रज्वलित झाल्यावर, विजेचा गडगडाट, मेघांची गर्जना झाल्यास सज्योती अनध्याय पाळावा. सूर्य असेपर्यंत अनध्याय असावा. रात्रीही अग्नी प्रज्वलित झाल्यावर उत्पात झाले तरी सज्योती म्हणजे तारका दिसेपर्यंत अनध्याय पाळावा. गाव, नगर, दुर्गंधयुक्त स्थाने येथे अनध्याय पाळावा. गावात जर प्रेत पडून असेल तर, शूद्राची समीपता असेल तर, रडण्याचा शब्द कानांवर पडला तर, माणसांची फार गर्दी झाली तर अनध्याय असावा.

जळात, अर्ध्या रात्रीच्या वेळी, मलमूत्राचा त्याग करताना, तोंड उष्टे राहिले तर, श्राद्धाचे भोजन घेतले तर वेदांचे चिंतन करू नये. विद्वान ब्राह्मणाने एकोद्दिष्ट श्राद्धाचे निमंत्रण घेतल्यावर तीन दिवसांपर्यंत वेदांचे अध्ययन बंद ठेवावे. जननाशौच असेल तर तीन दिवस वेदमंत्राचे उच्चारण करू नये. एकोद्दिष्ट श्राद्धात भाग घेणाऱ्या ब्राह्मणाच्या शरीरास जोपर्यंत चंदनाचा, सुगंधचा लेप आहे. तोपर्यंत त्याने

वेदमंत्रांचे उच्चारण करू नये. झोपून, पाय पसरून, गुढघे मोडून, शूद्राचे श्राद्धान्न जेवून वेदाध्ययन करू नये. धुके पडल्यावर, बाणाचा शब्द ऐकल्यावर, दोनही संध्यांच्या मध्ये, अमावस्या, चतुर्दशी, पूर्णिमा, अष्टमी या दिवशी वेदाध्ययन निषिद्ध आहे. वेदांच्या उपाकर्माच्या आधी व उत्सर्गाच्या नंतर तीन रात्री अध्ययन मना आहे. मार्गशीर्ष, पौष, माघ मासांच्या कृष्णपक्षातील तीन अष्टमींना अष्टकातिथी म्हणतात. या तिथींना एक दिनरात्र अध्ययन निषिद्ध आहे. बेहडा, सावरी, मोह, कचनार, कैथ या वृक्षांच्या खाली अध्ययन करू नये. आपला सहपाठी, बरोबर राहाणारा ब्रह्मचारी, आचार्य यांचा मृत्यू झाला तर तीन रात्रींपर्यंत अध्ययन करू नये. नित्यकर्मास अनध्याय नाही. संध्योपासन बरोबर चालावे. उपाकर्मात, उत्सर्गात, होमाच्या अंती, अष्टकातिथींना वायू चालू असेपर्यंत स्वाध्याय करावा. वेदांगे, इतिहास, पुराणे, अन्य धर्मशास्त्र यांच्यासाठी अनध्याय नाही.

ब्रह्मचारीधर्माचे हे संक्षेपानें वर्णन आहे. पूर्वी ब्रह्मदेवांनी शुद्ध अंत:करणाच्या ऋषींना या धर्माचे प्रतिपादन केले. जो द्विज वेदांचे अध्ययन न करता दुसऱ्या शास्त्रांत परिश्रम करतो तो मूढ व वेदबाह्य मानावा. द्विजास केवळ वेदांच्या पाठानेच संतोष मानाला पाहिजे असे नाही. जो केवळ पाठातच रमतो त्याची अवस्था चिखलात रुतलेल्या गायीसारखी होते. जो वेदांचे अध्ययन विधिपूर्वक न करून त्यांच्या अर्थाचा विचार करीत नाही तो मूढ व शूद्रासमान आहे. तो सुपात्र होत नाही. जो नेहमी गुरुकुलात वास करतो तो शरीर आहे तोपर्यंत गुरूची सेवा करील. वनात जाऊन विधिवत अग्नीत होम करून ब्रह्मनिष्ठ व एकाग्रचित्तानें स्वाध्याय करावा. भिक्षेच्या अन्नावर राहून, योगयुक्त होऊन, गायत्रीचा जप करावा. शतरुद्रिय व उपनिषदे यांचा अभ्यास करावा.

### स्नातक व गृहस्थधर्म

एक, दोन, तीन, चार अशा आपल्या शक्तीस अनुसरून वेदांचे अध्ययन पूर्ण करून, त्यांच्या अर्थांना मनात साठवून ब्रह्मचर्यव्रताची

समाप्ती करावी. गुरूंना दक्षिणारूपात धन देऊन त्यांची आज्ञा घेऊन स्नान करावे. व्रत पूर्ण करणारा मनास स्वाधीन ठेवणारा समर्थ पुरुष स्नातक होय. त्याने एक वांबूची काठी, अधोवस्त्र, उत्तरीय यांना धारण करावे. यज्ञोपवीताची एक जोडी, जलाने भरलेला कमंडलू घ्यावा. केस, व नखे कापून, स्नान करून छत्री, पगडी, खडावा वा पादत्राण, सुवर्ण कुंडले यांना धारण करावे. ब्राह्मणाने सोन्याच्या माळेशिवाय दुसरी कोणतीच लाल रंगाची माला धारण करू नये. त्याने सदा श्वेत वस्त्र वापरावे. उत्तम गंधाचे सेवन करावे. दिसण्यास प्रिय अशी वेषभूषा असावी. फाटकी व मलीन वस्त्रे वापरू नयेत. दुसऱ्याने वापरलेले वस्त्र, कुंडले, माला, पादत्राण, खडावा यांचा वापर करू नये. यज्ञोपवीत, आभूषण, कुश, काळे मृगचर्म यांना अपसव्यभावाने धारण करू नये.

आपणांस योग्य अशा स्त्रीशी विवाह करावा. स्त्री शुभगुणांनी युक्त, रूपवती, सुलक्षणा, योनिगत दोषांनी रहित असावी. मातेच्या गोत्रात तिचा जन्म नसावा. उत्तम शीलवान, पवित्र अशा भार्येशी विवाह करावा. जोपर्यंत पुत्राचा जन्म झाला नाही तोपर्यंत केवळ ऋतु-कालात स्त्रीशी समागम करावा. शास्त्रात जे निषिद्ध दिवस सांगितले आहेत ते नीट पाळावेत. षष्ठी, अष्टमी, पूर्णिमा, द्वादशी, चतुर्दशी या तिथी स्त्रीसमागमासाठी निषिद्ध आहेत. या नियमांचे पालन करणारा गृहस्थही ब्रह्मचारी मानला जातो. विवाहकालातील अग्नीस सदा स्थापन करावे व त्यात अग्निदेवासाठी प्रतिदिन हवन करावे.

आपला वर्ण व आश्रम यांना युक्त अशा वेदोक्त कर्माचे अनुसरण आळस सोडून करावे. जो असे करीत नाही तो नक्कीच नरकात जातो. सदा संयमशील राहून वेदांचे अध्ययन करावे. पंचमहायज्ञांचा त्याग करू नये. गृहस्थोचित शुभ कार्ये व संध्योपासन करीत असावे. आपल्या समान, आपल्याहून थोर पुरुषाशी मैत्री करावी. नेहमी भगवानांना शरण असावे. देवांच्या दर्शनासाठी यात्रा करावी. पत्नीचे पालन पोषण नीट करावे. विद्वान पुरुषाने आपल्या धर्मतत्त्वाची प्रसिद्धी लोकांत करू नये, की पापकर्मही लपवू नये. सर्व प्राण्यांवर दया करावी. आपले वय, कर्म, धन, विद्या, उत्तम कुल, देश, वाणी, वुद्धी यांना अनुसरून

सदाचरण करावे. पिता, पितामह यांनी ज्या वृत्तीचे अनुसरण केले त्याच वृत्तीची जोपासना पुरुषाने करावी. प्रतिदिन स्वाध्याय करावा. यज्ञोपवीत नेहमी धारण करावे. सर्वदा सत्य बोलावे. क्रोधास जिंकावे. लोभमोहाचा त्याग करावा. गायत्रीचा जप करावा. पितरांना तर्पण करावे. यांनी मनुष्य मुक्त होतो. माता-पित्यांच्या हितात तत्पर, दाता, याज्ञिक व देवभक्त गृहस्थ ब्रह्मलोकात प्रतिष्ठित होतो. धर्म, अर्थ, काम यांचे सेवन करताना सदा प्रतिदिन देवांचे पूजन करावे. शुद्धभावाने त्यांच्या चरणांवर मस्तक झुकवावे. वलिवैश्वदेव करून सर्वांना अन्न-भाग द्यावा. निरंतर क्षमाशील असावे. सर्वांवर दया करावी. अशाच पुरुषाला गृहस्थ म्हटले आहे, केवळ घरात राहून गृहस्थ होत नाही.

क्षमा, दया, विज्ञान, सत्य, दम, शम, अध्यात्मचिंतन व ज्ञान ही ब्राह्मणाची लक्षणे आहेत. श्रेष्ठ ब्राह्मणाने या गुणांपासून च्युत होऊ नये. आपल्या शक्तीस अनुसरून अनुष्ठान करून निंदित कर्मांचा त्याग करावा. मोहरूपी चिखल धुऊन टाकून परम उत्तम ज्ञानयोग प्राप्त करून घ्यावा. निंदा, पराजय, आक्षेप, हिंसा, बंधन, वध, क्रोध, यांना सहन करणे क्षमा आहे. आपल्या दु.खात करुणा व दुसऱ्यांच्या दुःखात सौहार्द (स्नेहपूर्वक सहानुभूती) हीच दया आहे. सहा अंगे, चार वेद, मीमांसा, विस्तृत न्यायशास्त्र, पुराण, धर्मशास्त्र या चौदा विद्या आहेत. या चौदा विद्यांचे अध्ययन विज्ञान आहे. विधिपूर्वक विद्येचे अध्ययंन करून, धनाचे उपार्जन करून धर्मकार्याचे अनुष्ठान करावे, यालाही विज्ञानच म्हणतात. सत्याने मनुष्यलोकावर विजय मिळविता येतो. हे सत्यही परमपद आहे. जी गोष्ट जशी झाली तशीच सांगणे हे सत्य आहे. शरीराची उपरामता दम आहे. बुद्धीच्या निर्मलतेपासून शम सिद्ध होतो. अक्षर म्हणजे अविनाशी पदास अध्यात्म समजावे. येथे जाऊन पुरुष शोकात पडत नाही, ज्या विद्येने षड्विध ऐश्वर्ययुक्त परमेश्वराचे, साक्षात भगवान ऋषीकेशांचे ज्ञान होते त्यास ज्ञान म्हटले आहे.

विद्वान पुरुष त्या ज्ञानात स्थित, भगवत्परायण, सदा क्रोधा-पासून दूर राहाणारा, पवित्र, महायज्ञाच्या अनुष्ठानात तत्पर असणारा उत्तम पदाची प्राप्ती करून घेतो. मनुष्याचे शरीर धर्माचा आश्रय आहे.

याचे पालन प्रयत्नपूर्वक करावे. कारण की, देहाशिवाय कोणताही पुरुष परमात्मा विष्णूचे ज्ञान प्राप्त करून घेऊ शकत नाही. द्विजानें सदा नियमपूर्वक राहून धर्म, अर्थ व काम यांची साधना करावी. धर्महीन कामाचे, अर्थाचे कधी चिंतनही करू नये. धर्माने चालण्यात कष्ट होतात, तरीही अधर्माचे आचरण करू नये. कारण धर्मदेव साक्षात भगवान-स्वरूप आहे. तीच सर्व प्राण्यांची गती आहे. द्विजाने सर्व भूतांचे प्रिय करावे. द्रोहभावाने केलेल्या कर्मांकडे त्याने लक्ष देऊ नये. वेद व देव यांची निंदा न करावी. निंदा करणाऱ्या बरोबर निवासही करू नये. जो ब्राह्मण प्रतिदिन नियमपूर्वक राहून पवित्र बुद्धीने या धर्माध्यायचा पाठ करील, ऐकील तो ब्रह्मलोकात सुप्रतिष्ठित होईल.

## व्यावहारिक शिष्टाचाराचे वर्णन

कोणत्याही प्राण्यांची हिंसा करू नये. खोटे कधी बोलू नये. अहित करणारे, अप्रिय वाटणारे वचन मुखातून काढू नये. चोरी कधी करू नये. दुसऱ्याची वस्तू कधी घेऊ नये. ती चोरणारा नरकात जातो. राजा, शूद्र, पतित वा इतरांकडून दान घेऊ नये. कधी याचना करू नये. एकाच पुरुषास दुसऱ्यांदा याचना करू नये. ब्राह्मणाचे धन आपत्ती आली तरी घेऊ नये. विषाला विष म्हणत नाहीत. ब्राह्मण व देव यांच्या धनाला विष म्हणतात. देवाच्या पूजेसाठी मालकाच्या आज्ञेशिवाय फुले तोडू नयेत. धर्मकार्यासाठी विद्वान पुरुष गवत, लाकूड, फल, फूल घेऊ शकतो, पण घेण्यापूर्वी त्याने अनुज्ञा घ्यावी. जे लोक मार्ग चालतात, भूकेने पाडित होतात, त्यांनी कोणत्याही शेतातील मूठभर तीळ, मूग, जव आदीं घ्यावे. जे भुकेने पीडलेले नाहीत त्यांना या वस्तू घेण्याचा अधिकार नाही. जो अलिंगी आहे, म्हणजे ज्याने कोणत्याही आश्रमाचे चिन्ह ग्रहण केले नाही त्याने नुसती वेषभूषा धारण करून जीविका चालविली तर त्याला पाप लागते. नीच पुरुषाशी बातचीत करणे, योनिसंबंध राखणे, यांमुळे द्विज च्युत होतो. म्हणून या सर्व गोष्टी संयमाने दूर राखाव्यात. देवद्रोह व गुरुद्रोह करू नये. दुसऱ्यावर लांछन लावू नये. ईश्वर व परलोक यांच्यावर अविश्वास दाखवू नये. कुत्सित

विचार, क्रियालोप, वेद न म्हणणे, ब्राह्मणाचा तिरस्कार करणे यांमुळे उत्तम कुळही अधम होते. असत्य भाषण, परस्त्रीसंगम, अभक्ष्यभक्षण, आपल्या कुलधर्माविरुद्ध आचरण, यांनी कुलाचा नाश होतो.

जो गाव अधार्मिकांनी भरलेला आहे, जेथे रोगांची अधिकता आहे, त्या गावी निवास करू नये. शूद्रांच्या राज्यात, पाखंड्यांनी घेरलेल्या राज्यात राहू नये. द्विजाने हिमालय, विंध्याचल, पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र यांच्यामधील प्रदेश सोडून इतरत्र निवास करू नये, ज्या देशात कृष्णसार मृग सदा विहार करतात, जेथे पवित्र नद्या प्रवाहित होतात तेथेच द्विजाने निवास करावा. श्रेष्ठ द्विजाने नदीतटापासून अर्धा कोस भूमी सोडून अन्यत्र निवास न करावा. चांडालांच्या गावासमीप राहू नये. पतित, चांडाल, पुल्कस (निषाद शूद्र), मूर्ख अभिमानी, अंत्यज व अन्त्यावसायी (निषादाच्या स्त्रीपासून चांडाळास झालेला) यांच्या बरोबर कधी निवास करू नये. एक शय्येवर झोपणे, एका आसनांवर बसणे, एका पंगतीस बसणे, एकाच ताटात जेवणे, दुसऱ्याने शिजविलेल्या अन्नास आपल्या अन्नात मिसळून भोजन करणे, यज्ञ करणे- शिकविणे, विवाहसंबंध प्रस्थापित करणे , एकत्र बसून भोजन करणे, एकत्र शिकणे, एकत्र यज्ञ करणे, संकरतेचा प्रसार करणारे हे अकरा सांकर्यदोष आहेत. समीप राहूनही पाप एका माणसापासून दुसऱ्यात फैलावते. म्हणून सांकर्यदोषांपासून सावध असावे. जे राखेने सीमा आखतात, एक दुसऱ्यास स्पर्श करीत नाहीत, त्यांच्यांत संकरतेचा दोष येत नाही. अग्नी, भस्म, जल, दार, खांब, मार्ग यांनी पंगतीचा भेद होतो.

अकारण वैर करू नये. विवादापासून दूर राहावे. कोणाची चुगली करू नये. दुसऱ्याच्या शेतात चरणाऱ्या गायीचा समाचार कधी सांगू नये. चहाडखोरांच्या बरोबर राहू नये. कोणास बोचेल असे बोलू नये. सूर्यमंडलाचा परिघ, इंद्रधनुष्य, बाणाने प्रकटलेली आग, चंद्र, सुवर्ण यांच्याकडे पुरुषाने दुसऱ्याचे लक्ष वेधून घेऊ नये. अनेक माणसे, भाई-बांधव यांच्यांशी विरोध करू नये. रजस्वला स्त्री व अपवित्र मनुष्य यांच्यांशी बातचीत करू नये. देव, गुरू, ब्राह्मण यांना दिल्या जाणाऱ्या

दानात अडथळा आणू नये. आपली प्रशंसा आपण करू नये. दुसऱ्याच्या निंदेचा त्याग करावा. देवनिंदा व वेदनिंदा यांचा त्याग यत्नपूर्वक करावा.

न चात्मानं प्रशंसेद्वा परनिंदां च वर्जयेत् ।
वेदनिंदा देवनिंदा प्रयत्नेन विवर्जयेत् ।।

जो द्विज, गुरू, देव, वेद, इतिहास-पुराण यांची निंदा करतो तो मनुष्य शंभर कोटी कल्पांपेक्षा अधिक काल रौरव नरकात जातो. जेथे यांची निंदा होईल तेथे गप्प बसावे. उत्तर देऊ नये. कान बंद करून तेथून निघून जावे. निंदा करणाऱ्याकडे दृष्टीही देऊ नये. विद्वान पुरुषाने दुसऱ्याची निंदा न करावी. चांगल्या माणसांशी कधी वाद करू नये. पापी माणसाच्या पापांची चर्चा करू नये. ज्यावर खोटा कलंक लागला आहे, त्या माणसाचे अश्रू मिथ्या कलंक लावणाऱ्याच्या पुत्रांचा व पशूंचा नाश करतात. ब्रह्महत्या, सुरापान, चोरी, गुरुपत्निगमन या पापांतून शुद्ध होण्यासाठी उपाय आहेत, पण मिथ्या कलंक लावणाऱ्या मनुष्याची शुद्धी करणारा उपाय नाही.

काही निमित्त असल्याशिवाय सूर्य व चंद्र यांना उदयकाली पाहू नये. याचप्रमाणे त्यांचा अस्त होताना, जलात प्रतिबिंबित झाले असताना, मेघांनी झाकले गेले असताना, दर्पणात प्रतिबिंब पडले असताना चंद्र-सूर्यास कधी पाहू नये. नग्न स्त्री व नग्न पुरुष यांच्याकडे कधी पाहू नये. मलमूत्रास पाहू नये. मैथुनास प्रवृत्त झालेल्या पुरुषाकडे पाहू नये. विद्वान पुरुषाने अपवित्र अवस्थेत चंद्र, सूर्य आदींकडे पाहू नये. उच्छिष्ट अवस्थेने, कपड्यांनी तोंड झाकून दुसऱ्यांशी बोलणे करू नये. क्रोधाने भरलेल्या गुरूच्या मुखाकडे पाहू नये. तेले व पाणी यांत आपले प्रतिबिंब पाहू नये. भोजन समाप्त झाल्यावर उरलेल्या पंगतीकडे दृष्टी टाकू नये. बंधनापासून मोकळ्या झालेल्या, मस्तवाल झालेल्या हत्तीकडे पाहू नये. पत्नीच्या बरोबर भोजन करू नये. भोजन करणारी, शिंकणारी, जांभई देणारी, आपल्याच तोऱ्यात आसनावर बसणारी आपली भार्या पाहू नये. पुरुषाने शुभ वा अशुभ वस्तूस ओलांडू नये. तीवर पाय ठेवू नये. कधी क्रोधाच्या अधीन न व्हावे. राग व द्वेष यांचा त्याग करावा.

लोभ, दंभ, अवज्ञा, दोषदर्शन, ज्ञाननिंदा, ईर्ष्या, मद, शोक, मोह आदी दोष सोडून द्यावेत. कोणालाही पीडा देऊ नये. नीच पुरुषाची सेवा कधी करू नये. तृष्णेत मन कधी गुंतवू नये. दीनतेस यज्ञपूर्वक सोडून द्यावे. पुरुषाने कोणाचाही अनादर करू नये.

नखांनी धरतीस उकरू नये. गायीस जबरदस्तीने बसवू नये. बरोबर यात्रा करणाऱ्यांना मुक्कामाच्या ठिकाणी वा भोजन करताना सोडू नये. नग्न होऊन जलात प्रवेश करू नये. अग्नीस ओलांडू नये. मस्तकास लावून राहिलेल्या तेलाने शरीर माखू नये. साप व हत्यारे यांशी खेळू नये. आपल्या इंद्रियांना स्पर्श करू नये. रोमावली, गुप्त अंगे यांना पण शिवू नये. अशिष्ट माणसाबरोबर यात्रा करू नये. हात, पाय, वाणी, नेत्र, शिश्न, उदर, कान आदींना चंचल करू नये. अंजलीने जल पिऊ नये. पाण्यावर कधी हाताने वा पायाने आघात करू नये. दगड मारून कधी मूळ व फल तोडू नये. म्लेच्छांची भाषा शिकू नये. पायाने आसन खेचू नये. बुद्धिमान पुरुषाने अकारण नख तोडू नये. ताल धरू नये. खाद्य पदार्थ मांडीवर घेऊन खाऊ नयेत. व्यर्थाची काळजी करू नये. नाचगायन करू नये. वाजा वाजवू नये. दोनही हातांनी आपले डोके खाजवू नये. दौडत चालू नये. पाण्यात मलमूत्र विसर्जित करू नये. उष्टच्या मुखाने बसणे, पसरणे निषिद्ध आहे. नग्न होऊन स्नान करू नये. चालताना वाचू नये. दातांनी नखे वा केस कापू नयेत.

झोपलेल्यास जागे करू नये. सकाळीच उन्हाचे सेवन करू नये. चितेच्या धुरापासून जपावे. रिकाम्या घरात झोपू नये. अकारण थुंकू नये. हातांनी पोहून नदी पार करू नये. पायांनी पाय कधी धुऊ नयेत. पायांना कधी आगीत तापवू नये. काशाच्या भांड्यात कधी पाय धुऊ नयेत. देव, ब्राह्मण, गाय, वायू, अग्नी, राजा, सूर्य, चंद्र यांच्याकडे पाय पसरू नयेत. अशुद्ध अवस्थेत शयन, यात्रा, स्वाध्याय, स्नान, भोजन, बाहेर जाण्यासाठी प्रस्थान करू नये. दोन संध्यासमयी, मध्यान्हसमयी शयन, क्षौरकर्म, स्नान, उटणे, भोजन, यात्रा करू नयेत. ब्राह्मणाने उष्टच्या मुखाने गाय, ब्राह्मण, अग्नी यांना स्पर्श करू नये. त्यांना कधी पाय लावू नये. देवाच्या मूर्तीला उष्टच्या मुखाने स्पर्श करू

नये. अशुद्धावस्थेत अग्निहोत्र, देव, ऋषी यांचे कीर्तन करू नये. अगाध जलात घुसू नये. अकारण दौडू नये. डाव्या हाताने पाणी घेऊन वा पाण्यात तोंड लावून पाणी पिऊ नये. आचमन केल्याशिवाय जलात उतरू नये. पाण्यात वीर्य सोडू नये. अपवित्र भूमी, न लिंपलेली भूमी, रक्त, विष यांना उल्लंघू नये. रजःस्वला स्त्रीबरोबर अथवा जलात मैथुन करू नये. देवालय व स्मशानभूमी येथील वृक्ष तोडू नयेत. पाण्यात थुंकू नये.

बुद्धिमान पुरुषाने अग्नीस उल्लंघू नये. त्याला कधी खाली जमिनीवर ठेवू नये. अग्नीकडे पाय करू नयेत. तोंडाने कधी त्याला फुंकू नये. झाडावर चढू नये. अपवित्र अवस्थेत कोणाकडेही दृष्टिपात करू नये. आगीत आग सोडू नये, की तीत पाणी टाकून ती विझवू नये. आपल्या सुहृदाच्या मृत्यूचा समाचार स्वतः कधी दुसऱ्यास सांगू नये. माल विकताना खोटी किंमत सांगू नये. केलेली प्रतिज्ञा भंग करू नये. पशू, पक्षी, व्याघ्र यांचो परस्पर लढत लावू नये. जल, वायू, धूप आदींनी दुसऱ्यांना कष्ट देऊ नयेत. गुरुजनांना धोका देऊ नये. सकाळी व संध्याकाळी सुरक्षा म्हणून घराचे दरवाजे बंद करावेत. भोजन करताना उभे राहू नये. बातचीत करताना हसू नये. आपण स्थापन केलेल्या अग्नीस हाताने शिवू नये. खूप वेळपर्यंत पाण्यात राहू नये.

अग्नीस पंख्याने, सुपाने, हाताने, मुखाने फुंकू नये. विद्वान पुरुषाने परक्या स्त्रीशी भाषण करू नये. जो यज्ञ करण्यास योग्य नाही त्याच्याकडून यज्ञ करवू नये. ब्राह्मणाने कधी एकटेच राहू नये, पण समुदायापासून दूर राहावे. कधी देवालय डाव्या बाजूस राखून जाऊ नये. देवमंदिरात झोपू नये. अधार्मिक मनुष्याच्या संगतीत राहू नये. रोगी, शूद्र, पतित मनुष्य यांच्याबरोबर यात्रा करू नये. द्विजाने पादत्राणे घातल्याखेरीज चालू नये. जलआदींची व्यवस्था केल्याशिवाय यात्रा करू नये. मार्गात चितेस डावीकडे ठेवून जाऊ नये. योगी, सिद्ध, व्रतधारी, संन्यासी, देवालय, देव, याज्ञिक पुरुष यांची निंदा कधी करू नये. जाणूनबुजून गाव व ब्राह्मण यांच्या छायेवर पाय ठेवू नये. झाडांच्या धुळीपासून जपून असावे. स्नान केल्यानंतरचे वस्त्र, घड्यातून ठिबकणारे पाणी या दोहोंच्या स्पर्शापासून जपून असावे. द्विजाने अभक्ष्य वस्तूचे

भक्षण करू नये. न पिण्याजोग्या वस्तूचे पान करू नये.

## गृहस्थाचा भक्ष्याभक्ष्यविचार, दानधर्मवर्णन

ब्राह्मणाने शूद्राचे अन्न खाऊ नये. जो ब्राह्मण आपत्तिकाला-शिवाय मोहवश होऊन स्वेच्छेने शूद्रान्न सेवन करतो तो मरणानंतर शूद्र योनीत जातो. जो द्विज सहा महिनेपर्यंत शूद्राचे कुत्सित अन्न खातो तो जिवंतपणीच शूद्रासमान होतो. मरणानंतर कुत्र्याच्या जन्मास येतो. जो मनुष्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांचे अन्न पोटात ठेवून मरण पावतो तो त्या त्या योनीत जन्म पावतो. नट, नर्तक, चांडाल, चांभार, समुदाय व वेश्या या सहांच्या अन्नाचा त्याग करावा. तेली, धोबी, चोर, शराव विकणारा, नाचणे-गाणे करणारा, लोहार, मरणाशौचात असलेला यांनी दिलेले अन्न घेऊ नये. कुंभार, चित्रकार, व्याज घेणारा, पतित, द्वितीय पती स्वीकारणाऱ्या स्त्रीचा पुत्र, अभिशापग्रस्त, सोनार, रंगमंचावर खेळ करणारे, व्याध, वंध्या, रोगी, चिकित्सक (वैद्य), व्यभिचारिणी स्त्री, हकीम, नाभिक, देवनिंदक, सोमरसाची विक्री करणारे, स्त्रीस वश होणारे, स्त्रीच्या उपपतीस घरी ठेवणारे, परित्यक्त, कृपण, उष्टे खाणारे, महापापी, शस्त्रांनी जीविका चालविणारे, भयभीत, रडणारे यांचेही अन्न त्याज्य आहे. ब्रह्मद्वेषी व पापात रुची असणारे यांचे अन्न, श्राद्धाचे अन्न, बलिवैश्वदेवरहित तयार झालेले अन्न, रोग्याचे अन्न खाऊ नये. संतानहीन स्त्री, कृतघ्न, कारागीर, परिवेत्ता (मोठ्या भावास अविवाहित ठेवून स्वतःचा विवाह करणारा) यांचेही अन्न घेऊ नये. पुनर्विवाहिता स्त्री व दिधिषूपतिका (भावाच्या विधवा पत्नीशी संभोग करणारा) यांचेही अन्न त्याज्य आहे. अवहेलना, अनादर, रोषपूर्वक मिळालेले अन्न खाता कामा नये. गुरूचे अन्न जर संस्काररहित असेल तर ते खाता कामा नये.

आर्धिक (किसान), कुलमित्र, गोपाल, दास, न्हावी, आत्मसमर्पण करणारा पुरुष यांचे अन्न भोजन करण्यास योग्य आहे. कुशीलव, चारण, क्षेत्रकर्मक यांचेही अन्न घेण्यास हरकत नाही. थोडी किंमत देऊन विद्वान पुरुषाने यांचे अन्न ग्रहण करावे. तेलात तळलेली वस्तू, गोरस,

सत्तू, तेल इत्यादी वस्तू शूद्राकडून घ्यावयास हरकत नाही. कमलनाल, कुसुंभ, कांदा, लसूण, शुक्त, गोंद यांचा त्याग करायला हवा. रात्री तेल व दही यांचा त्याग करावा.

जे अन्न दूषित झाले आहे, दुष्ट पुरुषाच्या संपर्कात जे आले आहे, ज्याला कुत्र्याने हुंगले आहे, ज्यावर चांडाळ, रजःस्वला स्त्री, पतित यांची दृष्टी पडलेली आहे, जे गायीने हुंगले आहे, ज्याला कावळ्याने वा कोंवड्याने स्पर्श केला आहे, ज्यात किडे पडले आहेत, ज्याचा वास मनुष्याने घेतला आहे, कोडी मनुष्याचा ज्यास स्पर्श झाला आहे, ज्याला व्यभिचारिणी वा रोगिणी स्त्रीने पाहिले आहे, अशा अन्नाचा त्याग करावा. वासरू नसलेल्या गायीचे, उंटिणीचे, एक खुराच्या पशूचे, घोडी, मेंढी, हत्तीण यांचे दूध पिऊ नये असे मनू सांगतो. मांस खाऊ नये. द्विजाने मदिरा दुसऱ्यास देणे, स्वतः पिणे, तिला स्पर्श करणे, तिच्याकडे पाहणे मना आहे. सर्व प्रकारच्या मद्यांचा त्याग करावा. ब्राह्मणाने अभक्ष्य वस्तूंचा, अपेय वस्तूंचा त्याग करावा.

उत्तम दानधर्माचेही वर्णन करता येईल. योग्य व्यक्ती पाहून श्रद्धापूर्वक धन अर्पण करणे म्हणजेच दान होय. ओंकाराचा उच्चार करून केलेले दान भोग व मोक्ष देणारे आहे. दान तीन प्रकारचे असते– नित्य, नैमित्तिक व काम्य. एका चौथ्या प्रकाराचे नाव 'विमल' दान आहे. विमल दान सर्व प्रकारच्या दानांत श्रेष्ठ आहे. आपणांवर ज्याचा कोणताच उपकार नाही अशा ब्राह्मणास फळाची इच्छा न करता जे दान दिले जाते ते नित्य दान होय. जे पापाच्या शांतीसाठी दिले जाते ते नैमित्तिक दान होय. संतान, विजय, ऐश्वर्य, सुख यांच्या प्राप्तीसाठी दिलेले दान काम्य होय. भगवंतांच्या प्रसन्नतेसाठी धर्मयुक्त चित्ताने ब्रह्मवेत्त्या पुरुषास जे अर्पण केले जाते ते कल्याणमय व सात्त्विकदान विमल दान होय.

योग्य व्यक्ती मिळताच आपल्या शक्तीस अनुसरून दान करावे. कुटुंबास भोजन व वस्त्र दिल्यानंतर जे शिल्लक राहील त्याचेही दान करावे. वेदपाठी, कुलीन, विनीत, तपस्वी, व्रतपरायण, दरिद्री यांना भक्तिपूर्वक दान द्यावे. भक्तिपूर्वक दान दिल्याने मनुष्य परमधामास

जातो. वेदवत्त्या ब्राह्मणास गव्हाची शेती दान दिल्यास मनुष्यास पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. जो दरिद्री माणसास गायीच्या चामड्या-बरोबर भूमीचे दान देतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. भूमिदाना-शिवाय मोठे श्रेष्ठ दान नाही. केवळ अन्नदानच त्याची समानता करू शकेल. विद्यादान त्याहून अधिक आहे. जो शांत, पवित्र, धर्मात्मा ब्राह्मणास विधिपूर्वक विद्यादान करतो तो ब्रह्मलोकात प्रतिष्ठित होतो. गृहस्थ ब्राह्मणास अन्नदान केल्याने मनुष्यास उत्तम फल प्राप्त होते. काळ्या मृगचर्मावर तिल, सुवर्ण, मधू, तूप राखून ब्राह्मणास दान दिल्याने सर्व पापांपासून मुक्तता होते. सुवर्ण व तिलसहित जलाची पात्रे सात वा पाच ब्राह्मणांना देऊन जो तृप्त करतो तो ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त होतो. माघातील कृष्णपक्षाच्या द्वादशी तिथीस उपवास करावा. श्वेत वस्त्र धारण करून तिळांनी अग्नीस आहुती द्यावी. त्यानंतर एकाग्र चित्ताने ब्राह्मणांना तिलदान करावे. जन्मभरची पापे त्याने नष्ट होतील.

विष्णू, शंकर, इंद्र, सूर्य इत्यादींची आराधना करून निरनिराळ्या निमित्तांनी दाने द्यावीत. ऐश्वर्यासाठी इंद्राची पूजा करावी. ब्रह्मतेजा-साठी व ज्ञानाच्यासाठी ब्रह्मदेवांची उपासना करावी. आरोग्याची इच्छा करणाऱ्याने सूर्याची पूजा करावी. धनासाठी अग्नीची, कर्मसिद्धीसाठी गणेशाची पूजा करावी. भग म्हणजे भाग्य हवे असेल तर चंद्राची, बल हवे असेल तर वायूची, संसारबंधनातून सुटकेसाठी श्रीहरीची यत्नपूर्वक आराधना करावी. योग, मोक्ष, ईश्वरीय ज्ञान या तीनांच्या प्राप्तीसाठी महादेवांची अर्चना करावी. महान भोग व विविध प्रकारचे ज्ञान यांची इच्छा करणाऱ्यांनी भोगीपुरुष भूतनाथांची, महेश्वरांची, भगवान श्रीविष्णूंची पूजा करावी. जलदानाचेही महत्त्व विशेष आहे. भूमिदान, दीपदान, सुवर्णदान, गृहदान, वस्त्रदान, अश्वदान, अन्नदान, शय्यादान अशी विविध प्रकारची दाने महत्त्वाची आहेत. अभयदान देणाऱ्यास ऐश्वर्याची प्राप्ती होते. धान्यदात्यास सनातन सुख प्राप्त होते. वेददान करणारा शाश्वतचा ब्रह्मलोकी निवास करतो.

वेदविद्यासंपन्न ब्राह्मणास धान्य देणारा मृत्यूनंतर स्वर्गात जातो.

गोदान करणारा सर्व पापांतून मुक्त होतो. इंधन दान करणाऱ्याचा जठराग्नी प्रदीप्त होतो. जो ब्राह्मणांना फल, फूल, पेय पदार्थ, निरनिराळ्या भाज्या यांचे दान करतो तो सदा आनंदी राहतो. जो रोगी लोकांना औषध, तेल, आहार यांचे दान देतो तो रोगहीन, सुखी, दीर्घायुषी बनतो. जो छत्री व पादत्राणे दान करतो तो नरकापासून वाचतो. अयन-परिवर्तनदिन, विषुव नावाचा योग, चंद्र व सूर्य यांचे ग्रहण, संक्रांत, इत्यादी प्रसंगी दिलेले दान अक्षय होते. प्रयाग आदी तीर्थे, पुण्य मंदिरे, नद्या, वने यांत केलेले दान अक्षय होते. मानव, गाय, ब्राह्मण, अग्नी, देव यांना दिलेल्या अन्नास जो रोखतो तो पशुपक्ष्यांच्या योनींत जातो. द्रव्य मिळवून जो ब्राह्मण, देव यांना दान करीत नाही त्यांना राजा राज्यातून बाहेर हाकलतो. जो दुष्काळात पीडित ब्राह्मणांना अन्न देत नाही तो नेहमीच निंदित असतो. जो ब्राह्मण स्वाध्यायशील, विद्वान, जितेन्द्रिय, सत्यशील, संयमयुक्त आहे त्याला दान करावे. अविद्वान ब्राह्मण चांदी, सोने, गाय, घोडा, पृथ्वी, तिल इत्यादींचे दान ग्रहण करील तर तो सुक्या इंधनाप्रमाणे भस्म होऊन जाईल.

धनात फसलेला ब्राह्मण ब्राह्मणत्वापासून भ्रष्ट होतो. म्हणून त्याने धन वाढविण्याचा उद्योग करू नये. दान घेण्याची रुची त्यास नसावी. जीवन-निर्वाहासाठी जेवढे आवश्यक तेवढेच धन न घेता अधिक धनाच्या मागे लागलेला ब्राह्मण अधोगतीस जातो. ज्याला संतोष नाही त्याला स्वर्गलोक मिळणार नाही. गृहस्थ पुरुषाने मनास वश करून देव, अतिथी यांचे पूजन करून जितेंद्रियभावाने राहावे. गृहस्थाने पत्नीस पुत्राच्या हवाली करून स्वतः वनात जावे. ज्ञानप्राप्तीसाठी वनातील एकांतवास साधावा. हा गृहस्थधर्म नीट जाणून ईश्वराचे पूजन व स्मरण करून असावे.

### वानप्रस्थ आश्रमाचा धर्म

पत्नीस बरोबर घेऊन वा तिला पुत्रांच्या स्वाधीन करून गृहस्थाने उत्तरायणाचा श्रेष्ठ काल आल्यावर शुक्लपक्षात वनात जाऊन एकाग्रचित्ताने तपस्या करावी. प्रतिदिन फलमूलांचा पवित्र आहार घ्यावा.

आपला जसा आहार असेल त्याच आहाराने देव व पितर यांचे पूजन करावे. नित्य अतिथिसत्कार करावा. स्नान करून देवांची पूजा करावी. जटा वाढवाव्यात. नखे व केस कापू नयेत. सदा स्वाध्यायात मग्न असावे. अन्य समयास मौन स्वीकारावे. अग्निहोत्र करीत असावे. आपोआप उत्पन्न झालेल्या निरनिराळ्या पदार्थांनी, शाकांनी, मूल-फळांनी पंचमहायज्ञांचे अनुष्ठान करावे. नेहमी फाटके, जुने वस्त्र वापरावे. तीन समयांना स्नान करावे. पवित्र वृत्तीने राहावे. प्रतिग्रह न घेता सर्व प्राण्यांवर दया करावी.

द्विजाने दर्श व पौर्णमास नावांचे यज्ञ करावेत. ऋत्विष्टी, आग्रपण व चातुर्मास्य व्रतांचे आचरण करावे. क्रमशः उत्तरायण व दक्षिणायन यज्ञ करावेत. वसंत व शरद ऋतूंत उत्पन्न होणाऱ्या पवित्र पदार्थांचा पुरोडाश, चरू बनवून विधिपूर्वक देवांना अर्पण करावा. परम पवित्र जंगली अन्नांनी हविष्य देऊन आपणही यज्ञशेष अन्नाने भोजन करावे. जमिनीवर उगवलेले तृण, गवत, बेहेड्याचे फल खाऊ नये. नांगराने तयार केलेल्या शेतीचे अन्न कोणी दिले तरी खाऊ नये. कष्ट पडले तरी ग्रामीण फुले, फले यांचा उपयोग करू नये. श्रोत्रविधीस अनुसरून सदा अग्निदेवाची उपासना करावी. कोणत्याही प्राण्याशी द्रोह करू नये. निर्द्वंद्व व निर्भय राहावे. रात्री काही खाऊ नये. त्यावेळी केवळ परमात्म्याचे चिंतन करावे. इंद्रियांना व क्रोधास ताब्यात ठेवावे. तत्त्वज्ञानाचे चिंतन करावे. सदा ब्रह्मचर्यव्रताचे पालन करावे. आपल्या पत्नीशीही संसर्ग ठेवू नये. पत्नीसहित वनात जाऊन जो कामनापूर्वक मैथुन करतो त्याचे वानप्रस्थव्रत नष्ट होते. तेथे त्याला होणारे संतान वेदाच्या अधिकारास अपात्र होते.

वानप्रस्थी लोकांनी भूमीवर नेहमीच शयन करावे. गायत्रीच्या जपात सदा तत्पर असावे. सर्व भूतांचे रक्षण करण्यात तत्पर असावे. सत्पुरुषांना सदा अन्नाचा भाग द्यावा. निंदा, मिथ्या अपवाद, अधिक निद्रा, आलस्य यांचा त्याग करावा. एकमात्र अग्नीचे सेवन करावे. घर बनवून राहू नये. भूमीवर जल शिंपडून बसावे. जितेंद्रिय होऊन मृगांच्या बरोबर फिरावे. त्यांच्यासह निवास करावा. एकाग्रचित्त

होऊन पत्थरावर झोपावे. वानप्रस्थ आश्रमाच्या अवस्थेत केवळ फल, मूल, फूल यांवरच जीवननिर्वाह करावा. यांनाही तोडू नये. जेव्हा स्वाभाविक रीतीने ती झाडावरून पडतील तेव्हांच त्यांचा उपयोग करावा. धैर्याचा त्याग कधी करू नये. गर्मी आली की पंचाग्नीचे सेवन करावे. वर्षाकाळात खुल्या मैदानात राहावे. हेमंत ऋतूत ओले वस्त्र पांघरावे. या प्रकारे आपली तपस्या क्रमाक्रमाने वाढवावी. तीनही वेळांना स्नान करून देवांना व पितरांना तर्पण करावे. एका पायावर खडे उभे राहून सदा सूर्यकिरणांचे पान करावे, पंचाग्नीचा धूर, गर्मी, सोमरस यांचे पान करावे. शुक्लपक्षात जल व कृष्णपक्षात गोमूत्राचे पान करावे. सुकलेला पाला खाऊन राहावे. क्लेशमय वृत्तीने सदा राहावे.

योगाभ्यास सदा करावा. प्रतिदिन रुद्राष्टाध्यायीचा पाठ करावा. अथर्ववेद व वेदान्त यांचा अभ्यास वाढवावा. आळस सोडून सदा यम-नियमांचे सेवन करावे. काळे मृगचर्म व उत्तरीय वस्त्र धारण करावे. शुभ्र यज्ञोपवीत असावे. आपल्या आत्म्यात अग्नीस आरोपित करून ध्यानपरायण व्हावे. तपस्वी ब्राह्मणांकडून यात्रेत असताना भिक्षा घ्यावी. वनात निवास करणाऱ्या अन्य द्विजापासून भिक्षा घ्यावयास हरकत नाही. आत्मज्ञानासाठी नाना उपनिषदांचा अभ्यास करावा. गायत्रीमंत्र, विशेषमंत्र, रुद्राष्टाध्यायी यांचा जप करावा. महाप्रस्थानाची आमरण यात्रा करून निरंतर उपवास करावा. ब्रह्मार्पणविधीत स्थित व्हावे.

## संन्यासाश्रमाचा धर्म

आयुष्याचा तिसरा भाग हळूहळू संपवून चतुर्थ आश्रम स्वीकारावा. द्विजाने या वेळी परिव्राजक अथवा संन्यासी व्हावे. योगाभ्यासात तत्पर, शांत व ब्रह्मविद्यापरायण असावे. मनात सर्व वस्तूंबद्दल वैराग्य निर्माण झाले की संन्यास घ्यावा. प्राजापत्य अथवा आग्न्येयी दृष्टीचे अनुष्ठान करून मनातील वासना धुऊन काढावी व मग जितेंद्रियभावाने

ब्रह्माश्रम, संन्यास घ्यावा. संन्यासी तीन प्रकारचे आहेत. कोणी ज्ञान-संन्यासी असतात. कोणी वेदसंन्यासी असतात. तर कोणी कर्मसंन्यासी असतात. जो सर्व बाजूंनी मुक्त, निर्द्वंद्व, निर्भय होऊन आत्म्यात स्थित होतो तो ज्ञानसंन्यासी. जो कामना व परिग्रह यांचा त्याग करून मुक्तीची इच्छा धरून संन्यासी होतो व वेदांचा अभ्यास करतो तो वेदसंन्यासी. जो द्विज अग्नीस आपल्यात लीन करून स्वत: ब्रह्मात सर्मपित होतो तो कर्मसंन्यासी होय. या तिघांत ज्ञानी सर्वांत श्रेष्ठ मानला आहे. त्या विद्वानाला एखादे कर्तव्य वा आश्रमचिन्ह याची आवश्यकता नाही. संन्याशाने ममता, भय, यांनी रहित होऊन शांत व निर्द्वंद्व असावे. पाने खाऊन त्याने राहावे. जुनी कौपीन पांघरावी वा नंगे राहावे. त्याने ज्ञानपरायण व्हावे. ब्रह्मचर्य पाळून आहारासही जिंकावे. भोजनासाठी गावातून अन्न मागून आणावे. अध्यात्मचिंतनात राहून निरपेक्ष व्हावे. भोग्य वस्तूंचा त्याग करावा. केवळ आत्मसुखा-साठी या जगात उरावे. जीवन वा मृत्यू, कोणाचेच अभिनंदन करू नये. सेवक स्वामीची प्रतीक्षा करतो तशी संन्याशाने कालाची प्रतीक्षा करावी. त्याने कधी अध्ययन, प्रवचन अथवा श्रवण केले नाही तरी चालेल.

या प्रकारे यज्ञनारायण योगी ब्रह्मभावाचा अधिकारी होतो. विद्वान संन्याशाने एक वस्त्र धारण करावे. अथवा केवळ कौपीन धारण करावी. डोक्याचे मुंडन तरी करावे अथवा दाढी, जटा वाढवा-व्यात. त्रिदंड धारण करावा. कोणत्याही वस्तूचा संग्रह करू नये. कावेच्या रंगाचे वस्त्र पांघरावे. सदा ध्यानयोगात तत्पर असावे. गावाच्या जवळ एखाद्या वृक्षाखाली वा मंदिरात राहावे. शत्रू व मित्र, मान व अपमान यांना समान मानावे: सदा भिक्षेवरच निर्वाह करावा. कधी एकाच स्थानाचे अन्न सेवन करू नये. जो संन्यासी मोहवश होऊन एकाच स्थानाचे अन्न खातो त्याला उद्धाराचा मार्ग धर्मशास्त्राने सांगितलेला नाही. संन्याशाचे चित्त रागद्वेषरहित असावे. मातीचा ढीग, पत्थर, सुवर्ण हे त्याला एकच भासावे. त्याने कोणत्याही प्राण्याची हिंसा करू नये. मौनभावाचा आश्रय घेऊन सदा नि:स्पृह असावे.

संन्याशाने नीट काळजी घेऊन पाऊल टाकावे. वस्त्राने गाळून जल प्यावे. सत्याने पवित्र झालेली वाणी उच्चारावी, मनाने पवित्र असावे.

संन्यासी माणसाने वर्षाकालाशिवाय कोणत्याही एका स्थानावर दीर्घकाळ निवास करू नये. स्नान करून शौचाचाराने संपन्न व्हावे. हातात सदा कमंडलू असावा. वनात राहून नेहमी मोक्षासंबंधी विचार करावा. ब्रह्मसूत्राचे ज्ञान राखून जितेन्द्रियभावाने राहावे. जर संन्यासी दंभ, अहंकार यांनी मुक्त असेल, निंदा, चुगली यांनी रहित असेल, आत्मज्ञानासाठी अनुकूल गुणांचा असेल तर त्याला मोक्ष प्राप्त होतो. यतीने विधिपूर्वक स्नान व आचमन करून पवित्र व्हावे. देवालयात प्रणवाचा निरंतर जप त्याने करावा. तेथे शांतचित्त होऊन, हातात कुश धारण करून, धुतलेले भगवे वस्त्र पांघरून, सर्व शरीरास भस्म लावून त्याने वेदान्तप्रतिपादित अधियज्ञ, आधिदैविक तथा आध्यात्मिक ब्रह्माचे एकाग्रभावाने चिंतन करावे. अहिंसा, सत्य, चोरीचा अभाव, ब्रह्मचर्य, उत्तम तप, क्षमा, दया, असंतोष ही संन्याशाची विशेष व्रते आहेत. त्याने प्रतिदिन स्वाध्याय, दोनही संध्यांच्या वेळी गायत्रीमंत्राचा जप करावा. एकान्तात बसून निरंतर परमेश्वराचे ध्यान त्याने करावे. एका स्थानाचे अन्न, राग, काम, संग्रह यांचा त्याने त्याग करावा. एकदोन वस्त्रे धारण करून, शिखा व यज्ञोपतीस धारण करून त्याने हातात कमंडलू घ्यावा. अशा प्रकारे त्रिदंड धारण करणारा विद्वान संन्यासी परमपदास जातो.

संन्याशाने फलमूल अथवा भिक्षेचे अन्न यावर निर्वाह करावा. त्याने एकदाच भिक्षा मागावी. अधिक भिक्षेच्या संग्रही त्याने आसक्त होऊ नये. भिक्षेत आसक्त होणारा संन्यासी विषयांत पण आसक्त होऊ शकतो. सात घरी भिक्षा मागावी. जर तेथे मिळाली नाही तर मागू नये. भिक्षूने एकदा भिक्षेचा उच्चार करून गप्प असावे. एका गायीच्या धारेस जेवढा वेळ लागतो तेवढा वेळ त्याने स्वस्थ उभे राहावे. भिक्षा मिळाल्यावर हातपाय धुऊन विधिपूर्वक आचमन करून मौनभावाने भोजन करावे. प्रथम अन्न सूर्यास दाखवावे. पूर्वाभिमुख होऊन 'प्राणाय स्वाहा, अपानाय स्वाहा, समानाय स्वाहा, व्यानाय स्वाहा, उदानाय

स्वाहा, करून पाच घास मुखात घालून एकाग्रचित्ताने आठ ग्रास भोजन करावे. भोजनाच्या नंतर भगवान ब्रह्मदेव व परमेश्वर यांचे ध्यान करावे. रात्रीच्या पहिल्या प्रहरी, मध्यरात्री व रात्रीच्या उत्तर-भागात विश्वाच्या उत्पत्तीच्या कारणास, ईश्वरास आपल्या हृदयकमलात स्थापन करून ध्यानसंबंधी विशेष मंत्रांच्या द्वारे त्याचे चिंतन करावें. परमेश्वर सर्व भूतांचा आत्मा, अज्ञानमय अंधकाराच्या पलीकडे विराज-मान असलेला, सर्वांचा आधार, अव्यक्तस्वरूप, आनंदमय, ज्योतिर्मय, अनिवाशी, प्रकृती व पुरुष त्यांच्या पलीकडील, आकाशाप्रमाणे निर्लेप, परम कल्याणमय, सर्व भावांची चरमसीमा, सर्वांचा शासक असा परमात्मा ब्रह्मरूप आहे असे चिंतन असावे.

प्रणवजपाच्या नंतर आत्म्यास आकाशस्वरूप परमात्म्यात लीन करून त्याचे या प्रकारे ध्यान करावे. परमात्मादेव सर्वांचा ईश्वर, हृदयआकाशात विराजमान झालेला, सर्व भावांच्या उत्पत्तीचे कारण, आनंदाचा एकमात्र आधार, तथा पुराणपुरुष श्रीविष्णू आहेत. या प्रकारचे ध्यान करणारा पुरुष भवबंधापासून मुक्त होतो. संन्यासी जर कामनापूर्वक स्त्रीपाशी गेला तर त्याने एकाग्र चित्ताने प्रायश्चित्त करावे. त्याने पवित्र होऊन सांतपन नावाचे व्रत करावे. सांतपनानंतर एकाग्र-चित्ताने त्याने शौचसंतोषादी नियमांचे पालन करून कृच्छ्रव्रताचे अनुष्ठान करावे. त्यानंतर आश्रमात येऊन आलस्यरहित भिक्षुरूपाने राहावे. असत्याचा प्रयोग कधीच करू नये. असत्याचा प्रसंग फार भयंकर असतो, धर्माची अभिलाषा ठेवणारा संन्यासी असत्य बोलला तर त्याने प्रायश्चित्त म्हणून एक रात्र उपवास व शंभर प्राणायाम करावेत.

मोठी आपत्ती आली तरी संन्याशानें दुसऱ्याच्या घरी चोरी करू नये. चोरी एवढा मोठा अधर्म नाही असा स्मृतींचा नियम आहे. हिंसा, तृष्णा, याचना यांनी आत्मज्ञानाचा नाश होतो. धन हा मनुष्याचा प्राण आहे. ते हरण करणे म्हणजे त्याचा प्राण घेण्यासारखेच आहे. असे केल्याने पुरुष आचारभ्रष्ट होऊन व्रतापासून ढळतो. संन्याशाकडून कधी अकस्मात जीवाची हिंसा झाली तर कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण-

व्रतांचे त्याने अनुष्ठान करावे. आपल्या इंद्रियांच्या कमकुवतपणामुळे कोण्या स्त्रीस पाहून भिक्षूचा वीर्यपात झाला तर त्याने सोळा प्राणयाम करावेत. दिवसा वीर्यपात झाला असेल तर त्याने तीन रात्रींचे व्रत व शंभर प्राणायाम करावेत. त्याने जर एकाच स्थानाचे अन्न, मधू, नवीन श्राद्धाचे अन्न, मीठ इत्यादी पदार्थ खाल्ले तर शुद्धीसाठी त्याने प्राजापत्य-व्रत करावे.

सतत ध्यानमग्न असणाऱ्या पुरुषाची सारी पापे नष्ट होतात. म्हणून महेश्वराचे चिंतन करून सदा त्याच्याच ध्यानात संलग्न असावे. परमज्योतिःस्वरूप ब्रह्म, सर्वांचा आश्रय, अक्षर, अव्यय, अंतरात्मा, परब्रह्म जे आहे तोच भगवान महेश्वर समजावा. तोच महादेव परम शिवरूप आहे. तेच अक्षर, अद्वैत, सनातन ब्रह्म आहे. तो देव स्वप्रकाश-स्वरूप आहे. ज्ञान त्याची संज्ञा आहे. तोच आत्मयोगरूप तत्त्व आहे. त्याच्या-तच सर्वांची प्रतिष्ठा आहे. म्हणून तर त्याला महादेव ही संज्ञा आहे. केवळ या महादेवाला जो जाणतो तोच परमपदाला जातो. जो स्वतःला त्या परमेश्वराहून भिन्न मानतो त्यास त्या महादेवजींचे दर्शन होत नाही. त्याचे परिश्रम व्यर्थ असतात. एकमात्र परब्रह्मच जाणण्यास योग्य असे अविनाशी तत्त्व आहे. तेच देवाधिदेव महादेव आहेत. म्हणून संन्यासी माणसाने मनात भाव धरून शांततेने महादेवास शरण जाऊन ज्ञानयोगात तत्पर असावे.

## भगवद्भक्ती व हरिभजन यांची प्रशंसा

भगवान नव्यासांनी पूर्वकाळी आश्रमधर्माचे सविस्तर वर्णन केल्या-नंतर सत्यवतीनंदन जेथून आले होते तेथे ते निघून गेले. वर्णाश्रमधर्माच्या नियमांचे पालन करून भगवान मनुष्य विष्णूंना पूज्य होतो. पण सूताने ब्राह्मणांना सांगितले की, वर्ण व आश्रम यांचे हे नियम हरि-भक्तीच्या एका कलेच्या अंशाच्या अंशाबरोबरही नाहीत. कलियुगात मनुष्यांसाठी मर्त्यलोकात एकमात्र हरिभक्तीच साध्य आहे. कलियुगात जो भगवान नारायणांचे पूजन करील तो धर्माच्या फलाचा भागीदार होईल. अनेक नामांनी ज्याला पुकारले जाते जो इंद्रियांचा नियंता

आहे, त्या परम शांत, सनातन भगवान दामोदरास हृदयात स्थापित करून मनुष्य तीनही लोकांवर विजय मिळवितो. तो द्विज हरिभक्ति-रूपी अमृताचे पान करून नेहमी कलिकालरूपी सापाने डसल्यामुळे फैलावणाऱ्या भयंकर विषापासून आत्मरक्षण करण्यास योग्य होतो. मनुष्याने श्रीहरींच्या नामाचा आश्रय घेतला की त्याला इतर मंत्रांची आवश्यकताच काय ?

कलौ नारायणं देवं यजते यः स धर्मभाक् ।
दामोदरं हृषीकेशं पुरुहूतं सनातनम् ॥
हृदि कृत्वा परं शान्तं जितमेव जगत्त्रयम् ॥
कलिकालोरगादंशात् किल्बिषात् कालकूटतः ॥
हरिभक्तिसुधां पीत्वा उल्लंघ्यो भवति द्विजः ।
किं जपैः श्रीहरिर्नाम गृहीतं यदि मानुषैः ॥

जो आपल्या मस्तकावर श्रीविष्णूंचे चरणोदक धारण करतो, त्याला स्नानाची काय जरूरी ? ज्याने आपल्या हृदयात श्रीहरीच्या चरणकमलांची स्थापना केली आहे त्याला यज्ञाचे प्रयोजन काय ? ज्याने सभेत भगवानांच्या लीलांचे वर्णन केले आहे त्याला दानाची आवश्यकता काय आहे ? श्रीहरींच्या गुणांचे वर्णन करून वारंवार हर्षित होतो त्याला योगी पुरुषास जे समाधिसुख मिळते तेच मिळते. पाखंडी व पापासक्त पुरुष या आनंदात सदा विघ्न आणतात. नारी व त्यांचा अधिक संग करणारे पुरुष या हरिभक्तीत बाधा आणतात. स्त्रिया नेत्रांनी, कटाक्षांनी जो संकेत करतात त्याचे उल्लंघन करणे देवांनाही भारी कठीण जाते. ज्याने यावर विजय मिळविला आहे तोच या जगात भगवानांचा भक्त असतो. मुनीही या लोकात नारीच्या चरित्रावर भुलून मोहवश होतात. जे लोक नारीच्या भक्तीचा आश्रय घेतात त्यांना भगवंताची प्राप्ती होणार तरी कशी ?

नारीणां नयनादेशः सुराणामपि दुर्जयः
स येन विजितो लोके हरिभक्तः स उच्यते ॥
माद्यन्ति मुनयोऽप्यत्र नारीचरितलोलुपाः ।
हरिभक्तिः कुतः पुंसां नारीभक्तिजुषां द्विजाः ॥

जोपर्यंत कोण्या सुंदर स्त्रीचे चंचल नेत्रांचे कटाक्ष, जे सर्व धर्मांचा लोप करतात ते मनुष्यावर पडत नाहीत तोपर्यंतच त्याची विद्या काही करण्यास समर्थ होते. तोपर्यंतच त्याला ज्ञान प्राप्त होऊ शकते. तोपर्यंतच सर्व शास्त्रांना धारण करणारी त्याची मेधाशक्ती निर्मळ राहते. तोपर्यंतच जप तप व तीर्थसेवा घडते. तोपर्यंतच गुरुसेवा संभवते. तोपर्यंतच या संसारसागरापासून पार होण्याच्या साधनात मनुष्याचे मन लागते. इतकेच नव्हे तर बोध, विवेक, सत्संगाची रुची, पौराणिक गोष्टी ऐकण्याची लालसा इत्यादी बावी तोपर्यंतच शक्य होतात. जो भगवानांच्या चरणारविंदांच्या मकरंदाचा लेशमात्र पिऊन आनंदमग्न होतो त्यावर नारींच्या चंचल कटाक्षांचा प्रभाव विलकुल पडत नाही. ज्याने प्रत्येक जन्मात भगवान हृषिकेशाचे सेवन केले आहे, ब्राह्मणांना दान दिले आहे, अग्नीत हवन केले आहे त्यासच त्या त्या विषयांचे वैराग्य उत्पन्न होते.

स्त्रियांत सौंदर्य नावाची वस्तू आहेच कोठे? पू, मूत्र, विष्ठा, रक्त, त्वचा, मेद, हाडे, मज्जा यांचे एक पोतडे म्हणजे तिचे शरीर! आता यात सौंदर्य कोठून आले? या वस्तूंना पृथक् पृथक् करून शिवले तर स्नान करूनच मनुष्य शुद्ध होतो. या सर्व वस्तूंना युक्त असे जे अपवित्र शरीर तेच लोकांना सुंदर दिसते! अहो, ही मनुष्याची अत्यंत दुर्दशा आहे. पुरुष उभारलेल्या कुचांनी युक्त अशा शरीरात स्त्रीबुद्धी धारणं करून प्रवेश करतो, पण ही स्त्री आहे तरी कोण? पुरुष तरी आहे कोण? विचार करून काहीच उत्तर मिळत नाही. म्हणून साधु-पुरुषाने सर्व प्रकारांनी स्त्रीसंगाचा त्याग केला पाहिजे. स्त्रीचा आश्रय घेऊन कोण्या पुरुषाने या पृथ्वीवर सिद्धी प्राप्त केली आहे? कामिनी व तिचा संग करणारा पुरुष यांचा संग टाकून द्यावा. त्यांच्या संगाने रौरव नरकाची प्राप्ती होते. या गोष्टीचा साक्षात प्रत्यय येतो.

**कामिनीकामिनीसंगिसंगमित्यपि संत्यजेत् ।**
**तत्संगाद् रौरवमिति साक्षादेव प्रतीयते ।।**

जे लोक अज्ञानवश होऊन स्त्रियांशी लोभ ठेवतात, त्यांना दैवाने फसविले आहे. नारीची योनी साक्षात नरकाचे कुंड आहे. कामी पुरुषास त्यात शिजावे लागते. कारण की, ज्या भूमीतून त्याचा जन्म झाला तेथेच

तो परत रममाण होतो. अहो, जेथून मलजनित मूत्र व रज वाहते तेथे मनुष्य रमतो ! याखेरीज आणखी अपवित्र काय असणार ? तेथे अत्यंत कष्ट असूनही मनुष्य तेथेच प्रवृत्त होतो. हे दैवाचे कसे विडंबन आहे ! त्या अपवित्र योनीत वारंवार रमणे ही मनुष्याची केवढी निर्लज्जता आहे ! म्हणून बुद्धिमान पुरुषाने स्त्रीसंगाने होणाऱ्या दोषांचा विचार करावा. या मैथुनापासून काय होते ?

मैथुनाद् बलहानिः स्यान्निद्रातितरुणायते ।
निद्रयापहृतज्ञानो ह्यल्पायुर्जायते नरः ।।
तस्मात् प्रयत्नतो धीमान्नारीं मृत्युमिवात्मनः
पश्येद्गोविन्दपादाब्जे मनो वै रमयेद् बुधः ।।
इहामुत्र सुखं तद्धि गोविन्दपदसेवनम् ।
विहाय को महामूढो नारीपादं हि सेवते ।।
जनार्दनाङ्घ्रिसेवा हि ह्यपुनर्भवदायिनी ।।
नारीणां योनिसेवा हि योनिसंकटकारिणी ।।

मैथुनाने बलहानी होते. त्यामुळे अत्यंत निद्रा येऊन आळस वाढतो. पुन्हा निद्रेत बेसावध राहणाऱ्या माणसाचे आयुष्य कमी होत जाते. म्हणून बुद्धिमान पुरुषानें नारीस आपल्या मृत्यूच्या समान मानावे. मनास प्रयत्नपूर्वक भगवान गोविंदांच्या चरणकमलांत गुंतवावे. गोविंदांची चरणसेवा इहलोकी व परलोकी सुख देणारी आहे. तिला सोडून कोण महामूर्ख स्त्रीच्या चरणांची सेवा करील ? भगवान जनार्दनांची चरणसेवा मोक्ष देणारी आहे. पण स्त्रियांच्या योनीचे सेवन योनीच्या संकटात टाकणारे आहे. योनिसेवी पुरुषास वारंवार योनीतच पडावे लागते. त्याला यातना भोगाव्या लागूनही पुन्हा तो योनीचीच अभिलाषा धरतो. ही पुरुषाची विटंबना कशी आहे ? मी भुजा उठवून सांगतो आहे, माझे सांगणे नीट ऐका. श्रीगोविंदात मन लावा. यातना देणाऱ्या योनीत नको.

ऊर्ध्वबाहुरहं वच्मि श्रुणु मे परमं वचः ।
गोविन्दे धेहि हृदयं न योनौ यातनाजुषि ।।

स्त्रीची आसक्ती सोडून जो मनुष्य वागतो त्याला पदोपदी अश्व-

मेधाचे फल प्राप्त होते. दैवयोगानें उत्तम कुलात उत्पन्न झालेल्या सती साध्वीशी त्याचा विवाह झाला तर पुत्र झाल्यानंतर पुन्हा तिच्याशी समागम करू नये. अशा पुरुषावर भगवान जनार्दन संतुष्ट होतात. यात थोडाही संशय नाही. धर्मज्ञ पुरुष स्त्रीसंगास असत्संग म्हणतात. तो असला की श्रीहरीची दृढभक्ती होत नाही. म्हणून सर्व प्रकारचा स्त्रीसंग सोडून भगवानांची भक्ती करावी.

खऱ्या विचाराने या जगात श्रीहरीची भक्ती दुर्लभ आहे. ज्याची भगवानांवर भक्ती आहे तो मनुष्य निःसंदेह कृतार्थ होतो. भगवान प्रसन्न होतील तेच अनुष्ठान करावे. भगवान संतुष्ट झाले की संपूर्ण जग तृप्त होते. श्रीहरीच्या भक्तीशिवाय मनुष्याचे जिणे व्यर्थ आहे. ज्याच्या प्रसन्नतेसाठी ब्रह्मा आदी देवही यजन करतात त्या आदिअंतरहित भगवान नारायणांचे भजन कोण नाही करणार? जो आपल्या हृदयात श्रीजनार्दनांचे चरणयुगलांची स्थापना करतो त्याची माता परम सौभाग्यशालिनी व पिता महापुण्यात्मा आहे. 'जगद्‌वंद्य जनार्दन! शरणागतवत्सल!' असे म्हणून जो मनुष्य भगवानांना हाक मारतो त्याला नरकात पडावे लागत नाही.

तस्य माता महाभागा पिता तस्य महाकृती ।
जनार्दनपदद्वन्द्वं हृदये येन धार्यते ।।
जनार्दन जगद्‌वंद्य शरणागतवत्सल ।
इतीरयन्ति ये मर्त्या न तेषां निरये गतिः ।।

ब्राह्मण हा भगवानांचे स्वरूप असल्याने लोक त्याचे यथायोग्य पूजन करतात. त्यांच्यावर भगवान प्रसन्न होतात. भगवान विष्णूच ब्राह्मणांच्या रूपात या पृथ्वीवर फिरतात. ब्राह्मणाशिवाय कोणतेच कर्म सिद्ध होत नाही. ज्यांनी भक्तिपूर्वक ब्राह्मणांच्या चरणांचे उदक प्राशन केले आहे, मस्तकावर सोडले आहे, त्याने आपल्या पितरांना तृप्त केले आहे. त्याने स्वतःच्या आत्म्याचा उद्धारही करून घेतला आहे. ज्याने ब्राह्मणांच्या मुखांत सन्मानपूर्वक मधुर अन्न अर्पण केले आहे, त्याने ते अन्न साक्षात श्रीकृष्णाच्या मुखातच घातले आहे. साक्षात श्रीहरीच त्या अन्नाचा भोग घेतो यात संदेह नाही. ब्राह्मण आहेत म्हणून ही पृथ्वी

धन्य झाली आहे. त्यांच्या हातांत जे दिले जाते ते भगवानांच्या हातांतच सर्मपित होते. त्यांना नमस्कार करून पापांचा नाश होतो. म्हणून ब्राह्मणाची विष्णुबुद्धीने आराधना करावी. भुकेलेल्या ब्राह्मणाच्या मुखात जर अन्न दिले तर दाता मृत्यूनंतर परलोकात अमृताच्या धारांनी अभिषिक्त होतो. ब्राह्मणास तुपासह भोजन देऊन मनुष्य कल्पपर्यंत आनंदाचा अनुभव प्राप्त करतो.

ब्राह्मणाने सांगितलेली पुराणकथा प्रतिदिन ऐकावी. मोठमोठ्या पापांचा नाश करणारी ही पुराणे म्हणजे पापांचे वन भक्षण करणारा दावानलच होय. पुराण हेच सर्व तीर्थांत श्रेष्ठ तीर्थ आहे. अंतःकरणात ज्ञानाचा प्रकाश उदित व्हावा म्हणून श्रीहरी पुराणांचेरूप धारण करून या जगात फिरत असतात. पुराण परम पावन शास्त्र आहे. श्रीहरीच्या प्राप्तीसाठी म्हणून मनुष्याने निरंतर श्रीकृष्ण रूपी परमात्म्याचे पुराण ऐकले पाहिजे. विष्णुभक्त पुरुषाने शांत भावाने पुराण ऐकावे. पुराणकथा मोठी निर्मल असून ती अंतःकरणास निर्मल बनविते. व्यासरूपधारी श्रीहरींनी वेदार्थांचा संग्रह करण्यासाठी पुराणांची रचना केली आहे. म्हणून ती तत्परतेने ऐकली पाहिजेत. पुराणांत धर्माचा निश्चय असून धर्म साक्षात केशवाचे रूप आहे. म्हणून विद्वान पुरुष पुराण ऐकून विष्णुरूप बनतात. एक तर ब्राह्मण साक्षात श्रीहरीचे रूप आहे. पुराणही असेच आहे. म्हणून मनुष्याने दोघांचा संग करून विष्णुमय व्हावे.

गंगाजलाच्या स्नानाने मनुष्य अनेक पापांपासून मुक्त होतो. भगवान केशवच या जलाच्या रूपाने या भूमंडळावर येऊन पापापासून उद्धार करतात. वैष्णवाने विष्णूच्या भजनाची अभिलाषा धारण केली असेल तर त्याने प्रथम गंगेच्या निर्मल जलाने स्नान करावे. अंतःकरण शुद्ध करण्याचे हेच एक उत्तम साधन आहे. या पृथ्वीवर भगवती गंगा विष्णुभक्ती प्रदान करणारी आहे. लोकांचा उद्धार करणारी गंगा वास्तवात श्रीविष्णूंचेच स्वरूप आहे. विष्णूची भक्ती केल्याशिवाय मनुष्याचा जन्म निष्फल होतो. कलिकाल हाच ज्याची जलराशी आहे, जो पापरूपी ग्रहांनी भरलेला आहे, विषयासक्तीचे भोवरे ज्याच्यात

आहेत, दुर्बोध हा ज्याच्यात फेस आहे, महादुष्ट सर्पांनी जो भयानक बनला आहे, त्या दुस्तर भवसागरात हरिभक्तीची ही नौका मनुष्यास पार करणारी आहे. लोकांना वाईट गोष्टी ऐकण्याची आवड तरी कशी आहे ? ते अद्‌भुत अशा श्रीहरीच्या लीला कथांत आसक्त का होत नाहीत ? जर निर्वाणात मन रमायचे असेल तर भगवत्कथाच ऐकायला हव्यात.

भक्तवत्सल भगवान जरी निष्क्रिय असले तरी त्यांनी भक्तांच्या हितासाठी अनेक लीला केल्या आहेत. शेकडो वाजपेययज्ञ, दहा हजार राजसूययज्ञ करूनही भगवान सुगम रीतीने प्राप्त होत नाहीत, पण भक्तीने ते लौकर मिळतात. ते हृदयाने सेवन करण्यास योग्य आहेत. संतांनी वारंवार त्यांची सेवा केली आहे. भवसागर पार होण्यासाठी श्रीहरींच्या चरणांचा आश्रय घेणे हेच सारतत्त्व आहे. अनायास जर दुःखे पार करून गोविंदांच्या चरणांपर्यंत पोचायचे असेल तर त्याच चरणांचे सेवन करावे. भगवान श्रीकृष्णांचे चरणयुगल मोक्षहेतू असल्याने त्यांचेच भजन करावे. मनुष्य आला कोठून ? त्याला जायचे आहे कोठे ? या प्रश्नांचा विचार करून बुद्धिमान पुरुषाने धर्माचा संग्रह करावा.

गोविंदांचे भक्तिपूर्वक भजन महान पुण्याची वृद्धी करणारे आहे. आळस सोडून मनुष्याने भगवानांच्या समोर नृत्य करावे. गीत गावे. मनुष्यापाशी जे असेल ते भगवंतांस समर्पण करावे. नेत्रांनी श्रीहरीची मूर्ती पाहावी, कानांनी त्यांचे गुण ऐकावेत, त्यांच्या नामाचे श्रवण करावे. आपल्या जिव्हेने श्रीहरीच्या चरणोदकाचा आस्वाद घ्यावा. नाकाने गोविंदांच्या चरणांवरील तुलसीदलांना हुंगावे. त्वचेने हरि-भक्तास स्पर्श करावा. मनात भगवानांचे ध्यान करून कृतार्थ व्हावे. असे करण्यानेच मनुष्य प्रत्यक्ष भगवंतांना जाऊन मिळतो. यासाठी त्यांच्याच चरणयुगलांना प्रणाम करावा. त्यांच्यांतच मन रमवावे. त्यांच्यावरच अनुराग राखावा, त्यांच्याशीच एकरूप व्हावे.

## श्रीहरींचे पुराणमय स्वरूप

सूताने ब्राह्मणांना पुराणमहिमा समजावून सांगितला. नानारूपधारी परमेश्वरांचा पुराण हा एक अवतारच आहे. पुराणांत पद्मपुराणाचे महत्त्व विशेष आहे. श्रीहरींच्या देहात पुराणांचे वास्तव्य कसे आहे ?

| | |
|---|---|
| १) ब्रह्मपुराण श्रीहरीचे मस्तक | २) पद्मपुराण हृदय. |
| ३) विष्णुपुराण उजवा हात | ४) शिवपुराण डावा हात |
| ५) भागवतपुराण ऊरुयुगल | ६) नारदपुराण नाभी |
| ७) मार्कंडेयपुराण उजवा पाय | ८) अग्निपुराण डावा पाय |
| ९) भविष्यपुराण उजवा गुडघा | १०) ब्रह्मवैवर्तपुराण डावा गुडघा. |
| ११) लिंगपुराण उजवा घोटा | १२) वराहपुराण डावा घोटा |
| १३) स्कंदपुराण केस | १४) वामनपुराण त्वचा |
| १५) कूर्मपुराण पाठ | १६) मत्स्यपुराण मेद |
| १७) गरुडपुराण मज्जा | १८) ब्रह्मांडपुराण अस्थी |

या प्रमाणे पुराणांच्या रूपात प्रत्यक्ष श्रीहरीचा अवतार झाला आहे. त्यांच्या हृदयस्थानावर पद्मपुराण आहे. हे पुराण ऐकून मनुष्यास अमृतपदाची म्हणजे मोक्षसुखाची प्राप्ती होते. पद्मपुराण साक्षात भगवान श्रीहरींचे रूप आहे. याच्या एका अध्यायाचा पाठही मनुष्याची सर्व पापे दूर करतो.

## विविध प्रकारची पूजा

एकदा भगवान श्रीकृष्ण द्वारकेहून मथुरेस आले होते. तेथून यमुना नदी पार करून ते नंदाच्या व्रजभूमीत आले. त्यांनी पिता नंद व माता यशोदा यांना प्रणाम करून त्यांचे मनापासून सांत्वन केले. मातापित्यांना श्रीकृष्णांना पाहून आनंद झाला. वृद्ध गोपांनाही ते भेटले. त्यांनी सर्वांना वस्त्रे, भूषणे भेट देऊन त्यांचे अभिनंदन केले. त्यानंतर पावन यमुनेच्या तीरावर गोपांगनांसह श्रीकृष्णांनी तीन रात्रपर्यंत सुखाने विहार केला. नंदगोपी, आपल्या स्त्रिया, आपले पुत्र यांच्यासह मोठ्या

आनंदाने आले होते. पशु, पक्षी, मृग इत्यादी प्राण्यांनाही फार आनंद झाला.

त्यानंतर भगवान श्रीकृष्ण परत द्वारकेस आले. वसुदेव, उग्रसेन, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध, अक्रूर आदी यादव प्रतिदिन श्रीकृष्णांची पूजा करीत असत. श्रीकृष्णांनी सर्व दैत्यांचा संहार करून सुखाने राज्य केले. व्रज व द्वारका येथील लोकांना भगवान श्रीकृष्णांनी ध्येयभूत अशा परमधामाचा मार्ग दाखविला. त्यांच्या वैष्णवधर्माचे विवेचन पार्वतीजवळ महादेवांनी केले.

दोन पाय, दोन हात, दोन कान, दोन डोळे, दोन नासिकापुटे, एक मस्तक व एक अंतःकरण या बारा अंगांच्या शुद्धीस द्वादशशुद्धी म्हणतात. भगवानांच्या मंदिरास भेट देणे, ते सारवणे, भगवानांच्या मागे मागे जाणे, भक्तिपूर्वक त्यांना प्रदक्षिणा घालणे या तीन कर्मांनी चरणांची शुद्धी होते. भगवानांच्या पूजेसाठी भक्तिभावाने पत्र व पुष्पे यांचा संग्रह करणे, ही हातांची शुद्धी आहे. भक्तिपूर्वक भगवान श्रीकृष्णांचे नाम, त्यांच्या गुणांचे संकीर्तन, त्यांच्या पराक्रमांचे वर्णन करणे ही वाणीची शुद्धी आहे. त्यांची कथा श्रवण करणे, त्यांच्या उत्सवाचे दर्शन घेणे, ही कानांची व नेत्रांची शुद्धी आहे. मस्तकावर भगवानांचे चरणोदक घेणे, निर्माल्य व माला धारण करणे, ही शीर्षाची शुद्धी होय. भगवानांच्या निर्माल्याचा वास घेण्याने नाकाची वा अंतःशुद्धी होते. श्रीकृष्णांच्या चरणयुगलांवरील पत्र-पुष्पांनी सर्व अंगाची शुद्धी होते.

भगवानांची पूजा पाच प्रकारची असते. अभिगमन, उपादान, योग, स्वाध्याय, इज्या हे पूजेचे पाच प्रकार आहेत. देवाचे स्थान झाडून पुसून स्वच्छ करणे, त्याला लिंपणे, सारवणे, पहिले निर्माल्य दूर करणे, ही 'अभिगमन' पूजा होय. पूजेसाठी चंदन व पुष्पे यांचा संग्रह ही 'उपादान' पूजा होय. आपल्या इष्टदेवाची आत्मभावना धारण करणे, माझा इष्टदेव माझ्यापासून भिन्न नाही, तोच माझा आत्मा आहे, या तऱ्हेची भावना मनात दृढ करणे ही 'योग' पूजा आहे. इष्टदेवाच्या मंत्राचा अर्थानुसंधानपूर्वक जप करणे हा 'स्वाध्याय' आहे. सूक्त, स्तोत्र, भगवत्तत्त्व यांचा अभ्यासही 'स्वाध्याय' आहे. आपल्या आराध्य-

देवाची यथार्थविधीने पूजा करणे ही 'इज्या' झाली. या पाच पूजा क्रमश: सार्ष्टी, सामीप्य, सालोक्य, सायुज्य, सारूप्य या प्रकारच्या मुक्ती देतात.

शालग्रामच्या पूजेसंबंधीही सांगता येते. चार भुजाधारी भगवान विष्णूंच्या उजव्या व वरच्या हातापासून क्रमाने अस्त्रविशेष ग्रहण करून केशव आदी नामे होतात. उजव्या बाजूचा वरचा हात, याच बाजूचा खालचा हात, डाव्या बाजूचा वरचा हात, डाव्या बाजूचा खालचा हात, या क्रमाने चारही हातांत शंख, चक्र आदी आयुधांचा क्रम धारण करून भगवानांच्या भिन्न भिन्न संज्ञा तयार होतात. उपर्युक्त क्रमाने चारही हातांत शंख, चक्र, गदा, पद्म धारण करणाऱ्या विष्णूंचे नाव 'केशव' असे आहे. पद्म, गदा, चक्र, शंख या क्रमाने धारण करणाऱ्या विष्णूंना 'नारायण' असे नाव आहे. चक्र, शंख, पद्म व गदा धारण करणारे 'माधव' असतात. गदा, पद्म, शंख, चक्र, या क्रमाने आयुधे धारण करणारे भगवान 'गोविंद' असतात. पद्म, शंख, चक्र, गदाधारी विष्णुरूप भगवानांना नमस्कार असो. शंख, पद्म, गदा, चक्र धारण करणाऱ्या मधुसूदनास नमस्कार असो. गदा, चक्र, शंख, पद्म धारण करणाऱ्या त्रिविक्रमास व चक्र, गदा, पद्म व शंखधारी वामनमूर्तीस प्रणाम असो.

चक्र, पद्म, शंख व गदा धारण करणाऱ्या श्रीधरास नमस्कार असो. चक्र, गदा, शंख, पद्मधारी हृषिकेशास नमस्कार असो. पद्म, शंख, गदा, चक्र धारण करणाऱ्या पद्मनाभास नमस्कार असो. शंख, गदा, चक्र, पद्मधारी दामोदरास नमस्कार असो. शंख, पद्म, चक्र, गदा धारण करणाऱ्या संकर्षणास नमस्कार असो. चक्र, शंख, गदा, पद्म धारण करणाऱ्या भगवान वासुदेवास नमस्कार असो. शंख, चक्र, गदा, पद्म आदी धारण करणाऱ्या प्रद्युम्नमूर्तीस नमस्कार असो. गदा, शंख, कमल, चक्रधारी अनिरुद्धास प्रणाम असो. पद्म, शंख, गदा, चक्रचिन्हित पुरुषोत्तमास नमस्कार असो. गदा, शंख, चक्र, पद्म ग्रहण करणाऱ्या अधोक्षजास नमस्कार असो. पद्म, गदा, शंख, चक्र धारण करणाऱ्या नृसिंहभगवानांना नमस्कार असो. पद्म, चक्र, शंख, गदा धारण करणाऱ्या अच्युतास नमस्कार असो. गदा, पद्म, चक्र, शंखधारी

श्रीकृष्णास नमस्कार असो.

गंडकी, नारायण या नद्यांतील शालग्रामशिलांचे माहात्म्य असेच वर्णन केले आहे. भगवानांना टिळे कसे लावावेत ? ललाटात केशव, कंठात श्रीपुरुषोत्तम, नाभीत नारायण, हृदयात वैकुंठ, डाव्या वरगडीत दामोदर, उजव्यात त्रिविक्रम, मस्तकावर हृषिकेश, पाठीत पद्मनाभ, कानांत गंगायमुना, दोन भुजांत कृष्ण व श्रीहरी यांचा निवास असतो. या स्थानांना तिलक लावून या बारा देवांना संतुष्ट करावे. तिलक लावताना त्या त्या देवाचा उच्चार करावा. भगवानांच्या मंदिरात कसे जावे, कसे वागावे, त्यांना भोग कसा द्यावा, इत्यादीसंबंधीही यथायोग्य मार्गदर्शन आहे. भगवानांना साष्टांग नमस्कार घालून म्हणावे,

अपराधसहस्राणि क्रियन्तेऽहर्निशं मया ।
तवाहमिति मां मत्वा क्षमस्व मधुसूदन ।।

'मधुसूदना, माझ्याकडून प्रतिदिन हजारो अपराध होतात. पण मी आपला सेवक आहे. असं समजून आपण मला त्यांची क्षमा करावी.'

जो मनुष्य तुलसीचे पान, पुष्प धारण करतो त्यालाही विष्णूच समजावे. आवळयाचा वृक्ष लावून मनुष्य विष्णूसारखाच होतो. आवळयाच्या भोवती साडेतीनशे हातांची भूमी कुरुक्षेत्रासारखी मानावी. तुलशीच्या लाकडाचे मणी बनवून त्यांची माळ तयार करावी व गळयात घालून विष्णूंची पूजा करावी. भगवानांना अर्पण केलेल्या चंदनाने आपल्या अंगावर त्यांची नावे लिहावीत. भगवानांना तुलशीची माला अर्पण करून ती पुन्हा प्रसादरूपाने भक्तिपूर्वक धारण करावी. त्यामुळे पातके नष्ट होतील.

## नामकीर्तन, प्रत्येक मासात भगवानांची आराधना

एकदा पार्वतीने महादेवांना विचारले,

'कृपानिधे, विषयरूपी ग्रहांनी भरलेल्या या भयानक कलियुगात जगातील सर्व माणसं चिंतेनं व्याकुळ झाली आहेत. अशा अवस्थेत त्यांचा उद्धार कसा व्हावा ?' पार्वतीस या उद्धाराचा मार्ग भगवान शिवांनी समजावून दिला.

या कलियुगात केवळ हरिनामच संसारसागर तारून नेणारे आहे. जे लोक या जगात 'हरे राम हरे कृष्ण' म्हणतात त्यांना या कलियुगाची बाधा कधीच होत नाही. दिन, रात्र, संध्या या तीनही काली भगवंतांच्या नामांचे स्मरण करावे. निरंतर भगवंतांच्या नामाच्या स्मरणाने भवबंधनातून सुटका होते. भगवानांचे नाम नाना प्रकारच्या अपराधांपासून सुटका करते. या कलियुगात यज्ञ, व्रत, तप, दान, ही कर्मे धडपणे पूर्ण होत नाहीत. म्हणून गंगास्नान व हरिनामाचे कीर्तन हे दोनच उपाय उरतात. मनुष्य पवित्र असो, अपवित्र असो, त्याने श्रीहरीचे नामस्मरण मनापासून करावे.

प्रत्येक मासास भगवंताला पूजून संतुष्ट राहावे. ज्येष्ठ महिन्याच्या पौर्णिमेस स्नान आदींनी पवित्र होऊन यत्नपूर्वक श्रीहरिचा स्नानोत्सव साजरा करावा. कोटिकोटी पातकांचा यामुळे नाश होईल. स्नानाच्या वेळी कलशात जल घेऊन भगवानांच्या मस्तकावर ते हळूहळू सोडावे, पुरुषसूक्ताचा मंत्र, पावमानी ऋचा यांचा पाठ करावा. नारळाचे, तालफलाचे, रत्नमिश्रित, चंदनमिश्रित, पुष्पयुक्त, अशा पाच जलांनी स्नान घालून भगवानांची आराधना करावी. त्यानंतर 'घं घंटायै नमः' म्हणून घंटा वाजवावी व म्हणावे, 'आपल्या उंच आवाजानं पातकांचा नाश करणाऱ्या घंटे, घोर संसारात पडलेल्या माझ्यासारख्या पाप्याचं रक्षण कर.' आषाढ शुद्ध द्वितीयेस भगवानांच्या स्वारीची रथयात्रा काढून मोठा उत्सवसमारंभ करावा. आषाढ शुद्ध एकादशीस भगवानांचा शयनोत्सव साजरा करावा. श्रावणात विधिपूर्वक श्रावणी करावी. भाद्रपदात श्रीकृष्णांच्या जन्माष्टमीचा उत्सव करावा. आश्विनात झोपलेल्या भगवानांचा कूस बदलल्याचा उत्सव करावा. याच आश्विन शुक्लपक्षात भगवती महामायेचाही उत्सव करावा. विष्णुरूपा भगवतीची सोनें वा चांदी यांची प्रतिमा बनवावी. कार्तिकात उत्सव करून भगवान दामोदरांसाठी उंच स्थानावरून प्रतिदिन दीपदान करावे. महिन्याच्या प्रारंभीच म्हणजे, आश्विनाच्या अमावास्येचा दीपावलीचा सुंदर उत्सव करावा. मार्गशीर्षात शुक्लपक्षातील षष्ठीस सफेद वस्त्रांच्या द्वारा भगवान जगदीश व ब्रह्मदेव यांची पूजा करावी.

पौष मासात भगवानांना पुष्पमिश्रित जलाने अभिषेक करावा. मकरसंक्रातीस अधिवासित तंडुलाचा नैवेद्य भगवानांना दाखवावा. 'ॐ विष्णवे नमः' अशा मंत्राचा उच्चार करावा. भगवानांसमोर बसवून एका भगवद्भक्त ब्राह्मणाची पूजा करून त्यास भोजन द्यावे. माघाच्या शुक्लपक्षात वसंतपंचमीस भगवानांना न्हाऊ घालून आम्र-पल्लवांनी त्यांची पूजा करावी. 'जय कृष्ण' म्हणून उपवनात जाऊन मोठ्या उल्हासाने दोल्लोत्सव साजरा करावा. उपवन दिव्यांनी सुशोभित करावे. फुलांनी फुललेले वृक्ष, पुष्पनिर्मित चांदवे, माळा, जलाने भरलेले घट, छोटचा छोटचा आंब्याच्या पानांच्या माळा, छत्री, चवरी, इत्यादी वस्तूंनी वनाची शोभा वाढवावी. कलियुगात या दोलोत्सवाचे महत्त्व विशेष आहे.

फाल्गुनातील चतुर्दशीस, पूर्णिमेच्या दिवशी भगवानांची विधिवत पूजा करावी. श्वेत, लाल, गौर, पीत रंगांची चूर्णे घेऊन ती कर्पुरादी सुगंधी पदार्थांत मिसळावीत. हळदीच्या रंगामुळे हे रसायन मोठे रमणीय व सुंदर दिसेल. याशिवाय इतर रंगांच्या चूर्णांनीही श्रीहरींना प्रसन्न करावे. एकादशीपासून पंचमीपर्यंत हा उत्सव करून पाच दिवस दोलोत्सव करावा. झुलत्या दोल्यावर बसून मनुष्याने दक्षिणाभिमुख श्रीकृष्णांचे दर्शन घेतले तर त्याची सारी पापे धुतली जातात. वैशाखात जलाने भरलेली सोने, चांदी, तांबे वा माती यांची पात्रे घेऊन त्यात भगवान वा शालग्राम यांचे पूजन करावे. या वेळी दवण्याचे फूल भगवंतांना अर्पण करावे. वैशाख, श्रावण व भाद्रपद या महिन्यांत असे दमनार्पण महत्त्वाचे आहे. वैशाखी तृतीयेस जलात, मंडलात, मंडपात, मोठ्या वनात ही आराधना व्हावी. या महिन्यात भगवानांच्या अंगास चंदन लावावे. भगवानांचे शरीर यामुळे पुष्टिकारक होईल. चंदन, अगरू, कालागुरू, कुंकुम, रोचना, जटामासी, मुरा इत्यादी गंध श्रीविष्णूंना अतिशय प्रिय आहेत. या सुगंधित पदार्थांचा लेप त्यांच्या अंगावर चढवावा. तुळशीच्या काडीस चंदनाप्रमाणे घासून त्यात कर्पूर, अगरू मिसळून, केशर मिसळून 'हरिचंदन' तयार करावे. सुगंधमिश्रित जलाने भगवानांना जो स्नान

घालतो त्याला पुन: जन्म घ्यावा लागत नाही. वैशाखात भगवानांना फुलातच ठेवावे. वृंदावनात जाऊन तऱ्हेतऱ्हेची फुले आणावीत, भगवानांना अर्पण करावीत. नारळ, बोर, ही फळे भगवंतांना अर्पण करावीत. जे जे आपणांस प्रिय ते ते सर्व भगवंतांना अर्पण करावे. नैवेद्य व वस्त्र अर्पण करून त्यांना नमस्कार करावा. भगवानांचे प्रेम, भाव, रस, भक्ती, विलास, नाम इत्यादींची प्राप्ती करून घ्यावी. श्रीकृष्णावर, क्रीडानिकेतन वृंदावनावर, व्रजभूमीवर, यमुनाजलावर मन प्रेमाने लावावे.

## मंत्रचिंतामणीचा उपदेश

एका समयाची हकीगत. देवाधिदेव जगद्गुरू भगवान सदाशिव यमुनेच्या तटावर बसले होते. त्यावेळी नारद तेथे आले व त्यांनी त्यांना भक्तिपूर्वक प्रणाम करून विचारले, ‘देवाधिदेव महादेव, आपण सर्वज्ञ आहात. जगदीश्वर आहात. भगवद्धर्माचं तत्त्व आपण जाणता. श्रीकृष्णमंत्राचं ज्ञान यथार्थरीतीनं आपणांस आहे. देवेश्वरा, मी जर अधिकारी असेन तर कृपा करून मला तो मंत्र सांगाल ? जो फक्त एकदाच उच्चारल्यानं उत्तम फलाची प्राप्ती होते, असा तो मंत्र मला सांगावा.’

‘महाभागा, तू हा फार चांगला प्रश्न विचारला आहेस. तुम्ही या जगावर हित करणारे ठरणार आहात. मी तुम्हांला मंत्रचिंतामणीचा उपदेश करतो. हा मंत्र अतिशय गोपनीय असला तरी तुमच्यासाठी मी त्याचे वर्णन करतो. श्रीकृष्णाचे दोन मंत्र अत्यंत महत्त्वाचे आहेत. मंत्रचिंतामणी, युगल, द्वय, पंचपदी ही या दोन मंत्रांची पर्यायवाची नामे आहेत. यांपैकी पहिल्या मंत्राचे पहिले पद आहे ‘गोपीजन’, द्वितीय पद आहे ‘वल्लभ’, तृतीय पद आहे ‘चरणान्’, चतुर्थ पद आहे, ‘शरणम्’ व पाचवे पद आहे ‘प्रपद्ये’. अशा रीतीने हा संपूर्ण मंत्र ‘गोपीजनवल्लभचरणान् शरणं प्रपद्ये’ असा होतो. हा मंत्र पाच पदांचा असल्याने याचे नाव आहे मंत्रचिंतामणी. या मंत्रात एकूण सोळा अक्षरे आहेत. दुसऱ्या मंत्राचे असे स्वरूप आहे, ‘नमो गोपीजन’ इतकेच म्हणून पुन:

'वल्लभाभ्याम्' असे उच्चारण करावे. तात्पर्य असे की 'नमो गोपीजनवल्लभाभ्याम्'च्या रूपात हा दोन पदांचा मंत्र आहे. हा दहा अक्षरांचा आहे. जो मनुष्य श्रद्धा वा अश्रद्धा असली तरी एकदाच या पंचपदीचा जप करतो त्याला निश्चितच श्रीकृष्णांचे सान्निध्य प्राप्त होते. यात थोडाही संदेह नाही.

हा मंत्र सिद्ध करण्यासाठी पुरश्चरणाची अपेक्षा नाही, की न्यासविधानाची जरूरी नाही. देशकालाचेही कसलेच विधान नाही. अरिमित्राच्या शोधाची जरूरी नाही. ब्राह्मणापासून चांडालापर्यंत कोणीही या मंत्राचा अधिकारी असतो. स्त्रिया, शूद्र, जड, मूक, अंध, पंगू, हूण, किरात, पुलिंद, पुल्कस, आभीर, यवन, कंक, खश, दंभी, अहंकारी, पापी, चुगलखोर, गोघातकी, ब्रह्महत्यारी, महापातकी, उपपातकी, ज्ञानवैराग्यहीन, निकृष्ट श्रेणीचे लोक या सर्वांना या मंत्राचा अधिकार आहे. भगवानांवर भक्ती न करणारे कृतघ्न, मानी, श्रद्धाहीन, नास्तिक यांना मात्र हा मंत्र सांगता कामा नये. ज्याला हा मंत्र ऐकायचा नाही, ज्याच्या मनात गुरूविषयी सेवाभाव नाही, त्याला हा मंत्र सांगू नये. जो श्रीकृष्णाचा अनन्य भक्त आहे, ज्याला दंभ व लोभ नाही, जो काम व क्रोध यांनी मुक्त आहे, त्याला हा मंत्र सांगावा. महादेव या मंत्राचा ऋषी आहे. वल्लवीवल्लभ श्रीकृष्ण याची देवता आहे. भगवान गोविंदाचा दास्यभाव मिळावा म्हणून याचा उपयोग होण्यासारखा आहे.

या मंत्राचे ध्यान कसे आहे? वृंदावनात कल्पवृक्षाच्या मूलभागा-वर एक रत्नमय सिंहासन आहे. त्यावर भगवान श्रीकृष्ण आपली प्रिया राधा हिच्यासह विराजमान आहेत. श्रीराधा त्यांच्या डाव्या भागास बसली आहे. भगवानांची मूर्ती मेघाप्रमाणे श्यामल आहे. त्यांना पीतांबर शोभतो आहे, त्यांना दोन भुजा आहेत. गळ्यात वनमाला आहे. मस्तकावर मोरपंखाचा मुकुट आहे. मुखमंडलावर कोटी चंद्रांची कांती झळकत आहे. त्यांचे चंचल नेत्र इकडे तिकडे फिरत आहेत. त्यांच्या कानांत कण्हेर पुष्पांची आभूषणे आहेत. ललाटावर दोनही बाजूंना चंदन व मध्ये कुंकुमबिंदू असा तिलक लावला आहे. दोनही कुंडलांची

प्रभा प्रातःकालीन सूर्याप्रमाणे चमकत आहे. त्यांचे कपोल दर्पणाप्रमाणे स्वच्छ आहेत. घामाच्या छोटचा छोटचा बिंदूंनी त्यांची शोभा वाढलेली आहे. त्यांचे नेत्र प्रियेच्या मुखाकडे लागले आहेत. त्यांनी आपली भुवई सहज लीलेने वर उचलली आहे, उंच व सरळ नाकाच्या अग्रभागी मोत्याचा बुलाक चमकत आहे. पिकलेल्या कुंदरूच्या समान लाल ओठ दातांच्या प्रकाशामुळे अधिकच शोभत आहेत. केयूर, अंगद, चांगली चांगली रत्ने, विविध प्रकारच्या अंगठचा यांनी हात व बोटे यांची शोभा वाढली आहे. त्यांनी डाव्या हातात मुरली व उजव्या हातात कमल धारण केले आहे. कटिबंधनाच्या प्रकाशाने शरीराचा मध्यभाग चमकत आहे. नूपुरांनी चरण सुशोभित झाले आहेत. भगवान क्रीडा-रसाच्या आवेशानें चंचल बनले आहेत. त्यांचे नेत्रही चंचल दिसताहेत. ते आपल्या प्रियेस वारंवार हसवितात व नंतर स्वतःही हसतात. या प्रमाणे राधेच्या सह श्रीकृष्णांचे चिंतन केले पाहिजे. त्यांचे वय व त्यांचे गुण श्रीराधेच्या बरोबरच आहेत.

श्रीकृष्णांची प्रिया राधा आपल्या चैतन्य आदी अंतरंग विभूतींनी या प्रपंचाचे गोपन, संरक्षण करते म्हणून ती गोपी आहे. ती श्रीकृष्णांच्या आराधनेत तन्मय असल्यामुळे 'राधिका' बनली आहे. श्रीकृष्णमयी झाल्यामुळे ती परादेवता झाली आहे. ती पूर्णतः लक्ष्मीस्वरूपा आहे. श्रीकृष्णांच्या आल्हादाचो ती मूर्तिमान रूपवती असल्यामुळे तिला 'ल्हादिनी शक्ती' असेही म्हणतात. श्रीराधा साक्षात महालक्ष्मी आहे. भगवान श्रीकृष्ण साक्षात नारायण आहेत. श्रीराधा दुर्गा आहे तर श्रीकृष्ण रुद्र आहेत, ती सावित्री तर श्रीकृष्ण ब्रह्मदेव आहेत. या दोहोंच्या शिवाय या जगात कोणाची सत्ताच असू शकत नाही. जड, चेतनमय सर्व जग श्रीराधा व कृष्णरूपच आहे. मी जर नामे घेऊ लागलो तर शंभर कोटी वर्षांतही त्यांच्या विभूतींचे वर्णन करू शकणार नाही.

तीन लोकांत पृथ्वी सर्वांत श्रेष्ठ मानली गेली आहे. त्यातही जंबुद्वीप सर्व द्वीपांत श्रेष्ठ, जंबुद्वीपात भारतवर्ष श्रेष्ठ व भारत-वर्षात मथुरापुरी श्रेष्ठ आहे. मथुरेत वृंदावन, वृंदावनात गोपींचा समुदाय, त्या समुदायात राधेचा सखीवर्ग व त्यात प्रमुख

श्रीराधा आहे. श्रीकृष्णाशी अत्यंत निकट असल्यामुळे श्रीराधेचे महत्त्व सर्वांपेक्षा अधिक आहे. या राधेमुळेच पृथ्वीस एवढे महत्त्व आले आहे. हीच राधिका ' गोपी ' आहे, तिच्या सख्या ' गोपीजन ' झाल्या आहेत! या सख्यांच्या समुदायात श्रीराधा व श्रीकृष्ण या दोघानांच महत्त्व आहे. या दोघांच्या चरणांनाच शरण जावे. या जगात माझी अशी जी कोणतीही वस्तू असेल ती श्रीराधा व श्रीकृष्ण यांना समर्पित असो. ' गोपीजनवल्लभचरणान् शरणं प्रपद्ये ' या मंत्राचे महत्त्व विशेष आहे. युगलार्थ, न्यास, प्रपत्ती, शरणागती, आत्मसमर्पण या पाच पर्यायांनी त्यांना आपलेसे करावे.

## दीक्षाविधी, युगलमंत्राचे विधान

शिवमहादेवांनी नारदांना दीक्षेचे व युगलमंत्राचे विधान सविस्तर समजावून दिले. या विधीचे अनुष्ठान न केले तरी नुसत्या श्रवणानेही मनुष्य भवबंधनातून मुक्त होतो. या जगातील जेवढी सुखे आहेत तेवढी नाश होणारी, अनित्य असल्यामुळे त्यांना दुःखरूपच मानावे लागेल. म्हणून विरक्त होऊन, संसारबंधनातून सुटून जाण्यासाठी विचार करणे अगत्याचे आहे. सर्वोत्तम सुखाचे साधन कोणते याचाही विचार व्हायला हवा. नाना प्रकारच्या कर्मांचे ठाकठीक संपादन फार कठीण होते. अशा परिस्थितीत मनुष्याने श्रीगुरूंना शरण जावे. जो शांत आहे, ज्याच्यातील मात्सर्य संपून गेले आहे, श्रीकृष्णांचा जो अनन्य भक्त आहे, ज्याने काम, क्रोध, लोभ यांना जिंकले आहे, ज्याने कृष्णमंत्राचा आश्रय घेतला आहे, जो सदा पवित्र राहतो, जो प्रतिदिन सद्धर्माचा उपदेश लोकांना देतो, सदाचाराचा जो प्रसार करतो, तोच कृपाळू महात्मा गुरू होय.

याच गुणांनी युक्त असा शिष्य असावा. तो गुरुचरणांशी जाण्यासाठी उत्सुक असावा. गुरूचा नितान्त भक्त असावा. मुमुक्षू असावा. ज्याची अशी योग्यता तोच शिष्य समजावा. प्रेमपूर्ण हृदयाने भगवान श्रीकृष्णांच्या साक्षात सेवेचा जो अवसर मिळतो त्यालाच वेदवेदांगांचे ज्ञानी मोक्ष म्हणतात. शिष्याने गुरुचरणांच्या आश्रयास

जावे. आपला वृतान्त निवेदन करावा. गुरूने अत्यंत प्रसन्न होऊन, वारंवार समजावून शिष्याच्या संदेहांचे निराकरण करावे. त्यानंतर त्याला मंत्राचा उपदेश करावा. चंदन वा माती घेऊन शिष्याच्या डाव्या व उजव्या भुजांच्या मूलभागांवर क्रमशः शंख व चक्र यांची चिन्हे काढावीत. ललाटावर विधिपूर्वक ऊर्ध्वपुण्ड्र लावावे. त्यानंतर शिष्याच्या उजव्या कानात गुरूने मंत्राचा उपदेश करून त्याचा अर्थही त्याला समजावून द्यावा. त्यानंतर त्याचे दुसरे नाव ठेवावे. त्या नामाच्या अंती 'दास' हा शब्द असावा. त्यानंतर शिष्याने वैष्णवांना भोजन द्यावे. अत्यंत भक्तीने वस्त्र, भूषण आदींच्या साह्याने शिष्याने गुरूचे पूजन करावे. आपल्या शरीरासच श्रीगुरूच्या सेवेत समर्पण करावे.

या शरणागत शिष्याचा धर्म कसा असावा ? आचार कसा असावा ? गुरूपासून मंत्र मिळाला की, शिष्याने प्रतिदिन गुरूची सेवा करावी. त्याने वैष्णवांना इष्टदेव समजून त्यांचा मान राखावा. शरणागत शिष्याने कधीच इहलोकाची वा परलोकाची चिंता करू नये. कारण या लोकांचे भोग पूर्वजन्माच्या कर्मांनुसार मिळतात, तर परलोकी भगवान कृष्ण सुखाची निर्मिती करतात. आपणांस केवळ श्रीकृष्णांचा सेवक समजावे. निरंतर त्यांचीच आराधना करावी. त्यांच्याच गुणांचे चिंतन, संकीर्तन, स्मरण, श्रवण करीत असावे. दुसऱ्या कोठल्याही फलाची अपेक्षा धरू नये. अनन्यभावाने भगवंतांच्या सेवेत असावे. त्यांच्या शिवाय इतरांचा आश्रय घेऊ नये, की इतर कोणाची साधना करू नये. भगवंतांच्या शिवाय इतरांचे प्रयोजन मनात ठेवूच नये. कोणाची निंदा करू नये की दुसऱ्या कोणाचा प्रसाद भक्षण करू नये.

शरणागत भक्ताने मृत्यूपर्यंत चातकवृत्तीचा आश्रय घेऊन युगलमंत्राचा अर्थ मनात साठवावा. श्रीराधा व श्रीकृष्ण यांच्यावर निष्ठा ठेवावी. विनीत भावाने त्यांची प्रार्थना करावी, ' नाथ, आपण पुत्र, मित्र, घरसंसार यांच्या ममतेपासून माझं रक्षण करावं. आपणच शरणागताचं भय दूर करता. मी जसा कसा असेन तसा आपलाच आहे. आपल्या चरणांवर मी सर्वस्व अर्पण केलं आहे. मी अपराधांचं घर

आहे. मी सर्व साधनं सोडून दिली आहेत. आता मला कुणी दुसरा आसरा देणारा नाही. आपण दोघेच माझे रक्षणकर्ते आहात. राधिकाकान्त, मी मन, वाणी, कर्म यांनी आपलाच आहे. कृष्णप्रिया राधे, मी आपलाच आहे. आपणच दोनही मला गती आहात. मी आपणांस नम्रभावानं शरण आलो आहे. आपण दोघे करुणेचं भांडार आहात. दयेचे सागर आहात. आपण माझ्यावर कृपा करावी. मी दुष्ट आहे, अपराधी आहे. तरी कृपा करून मला आपण आपला दास्यभाव द्यावा.'

अंतरंगाच्या भक्ताने यत्नपूर्वक श्रीकृष्णप्रिया राधेच्या सखीभावाचा आश्रय घेऊन निरंतर त्या दोघांची सेवा करावी. एकदाच 'मी आपलाच आहे' असे म्हणून त्यांची याचना करावी. या बाबतीत भगवान शिवांनी नारदांना एक अद्‌भुत रहस्याची गोष्ट सांगितली. साक्षात श्रीकृष्णांनीच ही शिवांना सांगितली होती. पूर्वी एकदा कैलास पर्वताच्या शिखरावर एका घनघोर वनात महादेव राहात होते. भगवान नारायणांचे ध्यान करून त्यांचा श्रेष्ठ मंत्र ते जपत होते. याने संतुष्ट होऊन भगवान महादेवांसमोर प्रकट झाले, 'वर माग' असे म्हणाले. महादेवांनी डोळे उघडून पाहिले. भगवान आपली प्रिया श्रीलक्ष्मीस घेऊन गरुडावर विराजमान होऊन प्रकट झाले होते. महादेवांनी वारंवार प्रणाम करून लक्ष्मीपतीस म्हटले,

'कृपासिंधो, आपलं रूप परम आनंददायक आहे. आनंदाचं निधान, नित्य, मनोहर मूर्तिधारी, सर्वश्रेष्ठ, निर्गुण, निष्क्रिय, शांत, असं आपलं अतिशय रमणीय रूप मी माझ्या डोळ्यांनी पाहू इच्छितो.'

'महादेवा, तुमच्या मनात ज्या रूपास पाहाण्याची इच्छा आहे त्याचं आता हे दर्शन घ्यावं. यमुनेच्या पश्चिमतटावर माझं लीलाधाम वृंदावन आहे तिथं जावं.'

इतके म्हणून जगदीश्वर प्रियेबरोबर अंतर्धान पावले. महादेव यमुनेच्या तटावर गेले. त्यांना किशोरावस्थेतील श्रीकृष्णांचे सुंदर दर्शन झाले. त्यांचा गोपवेष कमनीय होता. त्यांनी आपला डावा हात प्रियेच्या खांद्यावर ठेवला होता. त्यांचे ते रूप मोठे मनोहर दिसत होते. चारही बाजूंस गोपींचा समुदाय होता. मध्ये भगवान खडे उभे होते. राधेला

हसवून स्वतःही हसत होते. त्यांचे रूप सजल मेघाप्रमाणे श्यामवर्णाचे होते. ते कल्याणमय गुणांचे धाम होते. श्रीकृष्ण महादेवांकडे पाहात अमृतमय वाणीने म्हणाले,

'रुद्र, तुमचा मनोभाव जाणून आज मी तुम्हांस दर्शन दिलं आहे. या वेळी तुम्ही माझं हे जे अलौकिक रूप पाहात आहात ते एक निर्मल प्रेमरूप आहे. त्यातच सत्, चित् व आनंद मूर्तिमान आहेत. उपनिषदे याच रूपास निराकार, निर्गुण, व्यापक, निष्क्रिय व परात्पर म्हणतात. माझ्या दिव्य गुणांना अंत नाही. त्या गुणांना सिद्धही करता येत नाही. म्हणून वेदान्तशास्त्री मला ईश्वराला निर्गुण म्हणतात. महेश्वरा, माझं हे रूप चर्मचक्षूंनी नाही दिसत. म्हणून सर्व वेद मला अरूप, निराकार म्हणतात. मी आपल्या चैतन्यअंशानं सर्वव्यापक आहे. म्हणून लोक मला ब्रह्म या नावानं ओळखतात. मी या प्रपंचाचा कर्ता नाही म्हणून लोक मला निष्क्रिय म्हणतात. शिवा, माझा अंश मायामय गुणांनी सृष्टी निर्माण करण्याचं कार्य करतो. मी स्वतः काहीच करीत नाही, महादेवा, मी तर या गोपींच्या प्रेमानं विव्हल होऊन दुसरी कोणतीच क्रिया करण्याचं जाणीत नाही. मला स्वतःचंही भान नसतं. ही माझी प्रिया राधिका आहे. हिला तुम्ही परादेवता समजावं. मी हिच्या प्रेमास वश होऊन सदा हिच्याच बरोबर विहार करतो. हिच्या आगे मागे ज्या लाखो सख्या आहेत त्या सर्व नित्य आहेत. जसा माझा अवतार नित्य, तशा त्याही नित्यच आहेत. माझे सखे, पिता, गोप, गायी, वृंदावन हे सर्व नित्य आहेत. माझ्या या वृंदावनाचं नाव आनंदकंद आहे. यात प्रवेश केला की, पुनः मनुष्यास जन्मास यावं लागत नाही. मी वृंदावन सोडून कुठंच जात नाही. इथं मी माझ्या प्रियेसह निवास करतो. रुद्रा, तुम्हांस जे जाणून घ्यायचं होतं ते सर्व मी जाणलं आहे. सांगा, या वेळी तुम्ही आणखी काय ऐकू इच्छिता ?'

'प्रभो, आपल्या या स्वरूपाची प्राप्ती कशी होते ? याचा उपाय सांगा ना.'

'रुद्रा, तुम्ही फार चांगलं विचारलंत. पण हा विषय अत्यंत रहस्यमय आहे. यत्नपूर्वक याला गुप्त समजावं. जो गोपीभावानं मला शरण

येतो, दुसऱ्या उपायांना सोडून जो अनन्यत्वानं मला भजतो, एकट्या या माझ्या प्रियेची अनन्यभावानं जो पूजा करतो, तो मलाच येऊन मिळतो. जो एकदाच शरण येऊन 'मी आपलाच आहे' असे म्हणतो, तो साधनं न करताही मलाच येऊन मिळतो. यात संशय नाही.

सकृदेव प्रपन्नो यस्तवास्मीति वदेदपि ।
साधनेन विनाप्येव मामाप्नोति न संशयः ।।

'यासाठी शिवा, माझ्या प्रियाचं ध्यान करून तिला शरण जावं. माझ्या प्रियाची आराधना करून तुम्ही मलाच वश करून घेता. ही मोठी रहस्याची खूण मी आज तुम्हांस सांगितली आहे. तुम्ही ती यत्नपूर्वक गोपनीय ठेवावी. तुम्ही माझ्या राधेस शरण जावं. माझ्या युगलमंत्राचा जप करून सदा माझ्या धामात निवास करावा.'

इतके म्हणून भगवान कृष्णांनी महादेवांच्या उजव्या कानात युगलमंत्राचा उपदेश दिला. त्यानंतर पाहाता पाहाता श्रीकृष्ण अंतर्धान पावले. त्यावेळेपासून शिव वृंदावनातच राहतात. या युगलमंत्राचा रात्रंदिवस जप करावा. थोड्याच दिवसांत दास्यभाव निर्माण होईल. स्वर्ग व मोक्ष यांची प्राप्ती यामुळे होईल.

## अंबरीष–नारदसंवादातून भगवंताचे रूप

श्रीकृष्णांचे चरित्र, त्यांचा महिमा, त्यांच्या कथा कितीही ऐकल्या तरी ऋषिमुनींचे समाधान झाले नाही. सूताने त्यांना त्या पुनः पुन्हा सांगितल्या. श्रीकृष्णांच्या भक्तांचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. त्यांची पावनकथा साधुपुरुषांना अत्यंत हर्ष देणारी आहे.या विषयी एक आख्यान ऐकण्यासारखे आहे. एका समयाची ही हकीगत आहे. भगवानांचे प्रिय भक्त नारदमुनी सर्व लोकांत घुमून मथुरेस आले. तेथे त्यांची व राजा अंबरीष यांची भेट झाली. अंबरीषाचे चित्त श्रीकृष्णांच्या आराधनेत जडलेले होते. राजा अंबरीषाने मुनिश्रेष्ठ नारदांचे चांगले स्वागत केले. त्यांनी प्रसन्न चित्ताने विचारले,

'मुनिश्रेष्ठा, वेदांचे वक्ते विद्वान पुरुष ज्याला ब्रह्म म्हणतात तेच स्वतः भगवान कमलनयन नारायण आहेत. त्यांची आराधना कशी

करावी ? स्त्रियांनी त्यांची उपासना कशी करावी ? भगवान भक्तीचे प्रेमी आहेत. सर्व लोक त्यांची आराधना कशी करतात ? नारदा, आपण वैष्णव आहात. परम भक्त आहात. परमार्थतत्त्वाचे ज्ञाते आहात. म्हणून मी हे आपणांस विचारीत आहे. भगवान, मला वैष्णवधर्माचा उपदेश आपण करावा ना.'

'राजन्,तुम्ही फार चांगला प्रश्न उपस्थित केलात. तुम्ही भगवान विष्णूंचे भक्त आहात. लक्ष्मीपतींचं सेवन हाच एक परमधर्म आहे. भगवान नारायणच सेवनयोग्य आहेत. हे भगवान ऋषी व देव यांचे पण आराध्यदेव आहेत. भगवान उत्तम धर्मस्वरूपाचे आहेत. ते विश्व-द्रोहियांनाही पावन करतात. ते योगी आहेत. जगातील जीव हे त्यांचेच रूप आहे. हे भगवान भावानं, हृदयातील प्रगाढ प्रेमानं प्राप्त होतात. अच्युत भगवान भक्तिपूर्वक पूजा केल्यानं प्राप्त होतात. त्यांच्या प्राप्तीसाठी काही व्रतनियमही आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, निष्कपटभाव ही भगवानांची प्राप्ती होण्यासाठी मानसिक व्रते आहेत. दिवसा एकदा भोजन करणं, रात्री उपवास करणं, न मागता जे अन्न मिळेल त्यावर निर्वाह करणं, हे कायिक व्रत आहे. वेदांचा स्वाध्याय, श्रीविष्णूंच्या लीलांचं कीर्तन, सत्यभाषण, ही वाणीनं संपन्न होणारी व्रतं आहेत. चक्रधारी भगवान विष्णूंच्या नामांचं सदा व सर्वत्र कीर्तनं करावं. हा मार्ग भगवानांना संतुष्ट करणारा आहे. स्त्रिया मन, वाणी, शरीर यांच्या द्वारे व्रतं व हितकारी आचरण यांनी आपल्या पतिरूपी वासुदेवांची उपासना करतात. स्त्री व शूद्र यांनी केवळ नामकीर्तनाच्या द्वारेच भगवानांची आराधना करावी. भगवान लक्ष्मीपती केवळ पूजन, भजन, व्रत यांनीच संतुष्ट होत नाहीत. त्यांना भक्ती हवी असते. ते भक्तिप्रिय आहेत.

'अहिंसा, इंद्रियसंयम, जीवांवर दया, क्षमा, शम, दम, ध्यान, सत्य या पुष्पांनी भगवान श्रीकृष्ण संतुष्ट होतात. अन्य पुष्पं पूजेची वाह्यांगं आहेत. या रीतीनं पूजन करून आपल्या दोनही कुळांचा उद्धार करून घ्यावा, त्या परमात्म्याचं ध्यान करावं. ध्यान हे सगुण व निर्गुण असतं. योगी लोक निर्गुणाचं ध्यान करतात. सगुण ध्यान बहुतेक

लोकांना प्रिय वाटतं. त्यांचा अवतार हा वर्षाऋतूच्या मेघाप्रमाणे सजल श्याम आहे. त्यांची प्रभा सूर्यालाही लज्जित करते. त्यांच्या उजव्या हातात बहुमुल्य मण्यांनी विभूषित असा शंख आहे. दुसऱ्या हातात कौमोदाची गदा आहे, त्यांच्या उजव्या हातात पद्म व चक्र शोभतात.

'शाङ्‌र्ग' नावाचे धनुष्य धारण करणाऱ्या या भगवानांना शाङ्‌र्गीही म्हणतात. ते लक्ष्मीचे स्वामी आहेत. त्यांचं रूप मोठं सुंदर असतं. शंखाप्रमाणं मनोहर ग्रीवा, सुंदर गोलाकार मुखमंडल, पद्मपत्रांप्रमाणं आकर्षक असे मोठे नेत्र, कुंदाप्रमाणे चमकणारे दात, या सर्व विशेषांनी भगवान अतिशय शोभून दिसतात. त्यांच्या नाभीतून कमल प्रकट झालं आहे म्हणून ते पद्मनाभ या नावानंही शोभतात. त्यांचा अत्यंत तेजस्वी किरीट शोभून दिसतो. श्रीवत्साचं चिन्ह त्यांनी हृदयावर धारण केलं आहे. त्यांचं वक्षःस्थळ कौस्तुभमण्यानं अलंकृत झालं आहे. केयूर, हार, कडे, कटिसूत्र, करधनी, अंगठी यांनी त्यांच्या अंगाची शोभा वाढते. तापलेल्या सुवर्णाप्रमाणे त्यांचा पीतांबर शोभतो. ते गरुडाच्या पाठीवर विराजमान झालेले असतात. भक्तांची पापराशी ते दूर करतात.'

## वैशाख महिमा व माधवपूजनविधी

वैशाखाचा महिमा भगवान लक्ष्मीपतीस फार प्रिय असतो. या महिन्याच्या शुक्ल सप्तमीस गंगेच्या स्नानाचे महत्त्व विशेष आहे. पूर्वी राजा जान्हूने वैशाख शुद्ध सप्तमीस क्रोधात येऊन या गंगा नदीस पिऊन टाकले होते आणि उजव्या कानाने सोडून दिले होते. म्हणून ती जान्हवी झाली. या सप्तमीस विधिपूर्वक देव व पितर यांना तर्पण करावे. वैशाखाशिवाय दुसरा पवित्र मास नाही. गंगेशिवाय पवित्र नदी नाही. या दोहोंचा संगम दुर्लभच आहे. वैशाख शुद्ध सप्तमीस गंगेचे दर्शन घ्यावे. या माधवमासात भक्तिपूर्वक दान, जप, हवन, स्नान इत्यादी शुभकर्मे करावीत. सर्व स्त्रियांत पार्वती, तापणाऱ्यांत सूर्य, लाभांत आरोग्यलाभ, मनुष्यांत ब्राह्मण, पुण्यांत परोपकार, विद्यांत वेद, मंत्रांत प्रणव, ध्यानांत आत्मचिंतन, तपस्यांत सत्य व स्वधर्मपालन, शुद्धींत आत्मशुद्धी, दानांत

अभयदान, गुणांत लोभत्याग, सर्वांत प्रधान मानला गेला आहे. त्याचप्रमाणे वैशाख हा मासांत प्रमुख मास आहे. वैशाखात प्रातःस्नान केल्यानें पापांचा अंत होतो. वैशाखात सकाळी स्नान, यज्ञ, दान, उपवास, हविष्यभक्षण, ब्रह्मचर्य ही सर्व पापनाश करणारी व्रते आहेत. वैशाख-स्नानाचे महत्त्व अश्वमेधयज्ञाच्या बरोबरीने आहे.

या वैशाखाचे महत्त्व नारदांनी अंबरीषासाठी सविस्तर निवेदन केले आहे. प्रथम जीवास भारतात जन्म येणे दुर्लभ. मनुष्ययोनीत जन्म त्याहून दुर्लभ. मनुष्य होऊन धर्मात बुद्धी असणे आणखी दुर्लभ. वासुदेवांत भक्ती असणे आणखी दुर्लभ आहे. माधवमासात स्नानाचा योग आला तर आणखीन महत्त्वाचे मानले गेले आहे. माधव म्हणजे वैशाख मासात स्नान, दान, जप आदी अनुष्ठान केल्याने मनुष्य कृतकृत्य होतो. त्याच्या दर्शनानेच पापी माणसाचे पाप दूर होते. वैशाख महिन्याचे एकादशीपासून पूर्णिमेपर्यंतचे पाच दिवस सबंध महिन्याच्या बरोबरीचे असतात. या वैशाख महिन्यात ज्यांनी मधुदैत्यास मारणाऱ्या माधवाचे पूजन केले असेल त्यांना सर्व प्रकारची उत्तम फले मिळतात. वैशाखात स्नान केल्याने अनेक जन्मांची पापे नाहीशी होतात. या महिन्यात गंगातीर्थ, नर्मदातीर्थ, यमुनातीर्थ, सरस्वतीतीर्थ आदी तीर्थांत सूर्योदयापूर्वी स्नान करून भगवान मुकुंदांची पूजा करावी. अक्षय स्वर्गाची प्राप्ती होईल. रोगव्याधिरहित अशा अवस्थेत नारायणांची प्राप्ती होईल.

नारदांनी अंबरीष राजाला वैशाखस्नानाने पाच प्रेतांचा उद्धार कसा झाला हे सांगून 'पापप्रशमन' नावाच्या स्तोत्राचे महत्त्वही विशद केले. वैशाख मासात पाण्यात बुडी मारल्यावरोबर सर्व पापे नष्ट होतात. फार पूर्वीची एक हकीगत आहे. काही निमित्ताने एक मुनी तीर्थयात्रा करीत करीत हिंडत होता. त्याचे नाव मुनिशर्मा होते. तो मोठा धर्मात्मा, सत्यवादी, पवित्र, शांतिधर्माने युक्त होता. प्रतिदिन तो पितरांचे श्राद्ध करायचा. वेद व स्मृती यांचे त्याला सम्यक ज्ञान होते. वैशाख महिन्यात मुनी स्नान करण्यासाठी नर्मदेच्या किनाऱ्याकडे निघाले. त्यावेळी त्याने आपल्यासमोर पाच पुरुष दुर्गतीत फसलेले पाहिले. त्यांच्या शरीराचा रंग काळा होता. वडाच्या झाडाखाली बसून

ते पापामुळे उद्विग्न बनले होते. त्यांना पाहून मुनिशर्म्यास विस्मय वाटला. मुनीस पाहून ते पाच पुरुष म्हणाले,

'विप्रवर, आपण कल्याणमय पुरुष दिसता. आम्ही दुःखी जीव आहोत. द्विजराज, मी पंचाल देशाचा क्षत्रिय. माझं नाव नरवाहन. मी मार्गात मोहवश होऊन एका ब्राह्मणाची हत्या केली. मला ब्रह्महत्येचं पाप लागलं. पापानं मी जळतो आहे. माझं चित्त शोकानं व्याकुल बनलं आहे. हा समोरचा चंद्रशर्मा, या जातीच्या ब्राह्मणानं मोहवश होऊन गुरूचा वध केला. हा मगध देशाचा निवासी. याचा स्वजनांनी त्याग केला आहे. हा आहे देवशर्मा. हा ब्राह्मण वेश्येच्या संगतीनं शराबी बनला. हा जातीचा वैश्य विधुर नावाचा आहे. यानं गुरुपत्नीशी व्यभिचारकर्म केलं. याची माता मिथिलेत वेश्या होती. हा पाचवा पुरुष वैश्यच असून त्याचं नाव नंद आहे. यानं चोरी केली. आम्ही पाचही असे दुःखी, कष्टी आहोत. स्वामी, आपण या पापातून मुक्त होण्याचा उपाय सांगावा.'

'तुम्ही अज्ञानवश होऊन पाप केलं आहे. तुम्हांस अनुताप झालेला दिसतोय. संतोष देणारं एकमेव वैशाखस्नान आहे. त्यानं महान पातकांचा नाश होतो. वैशाख महिना मधुसूदनास अत्यंत प्रिय आहे. यावेळी गंगा, यमुना, नर्मदा, यांपैकी एका नदीत स्नान करावं. नर्मदेचं शुद्ध जल तुमची सर्व पापं दूर करील.' मुनीचे ऐकून त्या पाचांनी मुनीसह नर्मदातीरावर येऊन स्नान केले. स्नान करताच त्यांच्या शरीराचा रंग बदलला. सुवर्णासारखी कांती त्यांना चढली. मुनिशर्म्याने त्यांना पापप्रशमन नावाचे एक स्तोत्र ऐकविले. या स्तोत्राचा पहिला श्लोक असा आहे;

विष्णवे विष्णवे नित्यं विष्णवे विष्णवे नमः ।
नमामि विष्णुं चित्तस्थमहंकारगतं हरिम् ।।
चित्तस्थमीशमव्यक्तमनन्तमपराजितम् ।
विष्णुमीड्यमशेषाणामनादिनिधनं हरिम् ।।

सर्व विश्वात व्यापक भगवान श्रीविष्णूस सर्वदा नमस्कार असो. विष्णूस वारंवार नमस्कार असो. मी आपल्या चित्तात विराजमान

झालेल्यास नमस्कार करतो. आपल्या अहंकारात व्याप्त असलेल्या श्रीहरीस मी मस्तक झुकवितो. विष्णू हा चित्तात विराजमान झालेला ईश्वर आहे. तो अव्यक्त, अनंत, अपराजित, सर्वांकडून स्तवनास योग्य व आदिअंतरहित असा असून मी त्या श्रीहरीस नित्य निरंतर प्रणाम करतो.

असे हे ' पापप्रशमन ' नावाचे स्तोत्र जो मनुष्य वाचतो, ऐकतो तो शरीर, मन, वाणीद्वारे केलेल्या पापांपासून मुक्त होतो. तो परम विष्णुपदास जातो.

अंबरीष राजाला नारदांनी वैशाख महिन्याचे व्रतविधानही समजावून दिले. वैशाख महिन्यात जेव्हा सूर्य मेषराशीवर येईल तेव्हा नदी, सरोवर, झरा, कुंड, जलाशय इत्यादी ठिकाणी श्रीविष्णूंचे स्मरण करून स्नान करावे. स्नानाआधी

**यथा ते माधवो मासो वल्लभो मधुसूदन ।**
**प्रातःस्नानेन मे तस्मिन् फलदः पापहा भव ॥**

' मधुसूदना, हा माधव-वैशाख-महिना आपणांस विशेष प्रिय आहे. यासाठी इथं प्रातःस्नान करून आपण मला शास्त्रोक्त फल देणारे व्हावे. व माझ्या पापांचा नाश करावा. ' असा एक मंत्र जपावा. मौनभावाने स्नान करावे. त्यानंतर गंगाजीस आवाहन करून तिचा मंत्र म्हणावा. गंगेच्या नामांचा जप करावा. अंगास पवित्र मृत्तिका अभिमंत्रून लावावी. आचमन करून बाहेर आल्यावर शुद्ध श्वेत वस्त्र ल्यावे ब्रह्मा, विष्णू, रुद्र, प्रजापती यांना तर्पण करावे. त्यानंतर देव, यक्ष, नाग, गंधर्व, अप्सरा, असुरगण, क्रूर सर्प, गरुड, वृक्ष, जीवजंतू, पक्षी, विद्याधर, मेघ, आकाशचारी जीव, निराधार जीव, पापी जीव, धर्मपरायण जीव यांना तृप्त करण्यासाठी जल द्यावे. त्यानंतर यज्ञोपवीत गळ्यात माळेसारखे करून मनुष्य, ऋषी, सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार, कपिल, आसुरी, बोढू, पंचशिख मरीची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतू, प्रचेता, वसिष्ठ, नारद इत्यादी देवर्षींना व ब्रह्मर्षींना अक्षतासह जल द्यावे. त्यानंतर जानवे उजव्या खांद्यावर घेऊन पितामह, मातामह इत्यादींना तर्पण करावे.

त्यानंतर विधिपूर्वक आचमन करून आपल्यापुढे कमलाची आकृती बनवावी. सूर्यदेवाच्या नामांचे उच्चारण करून तिला अक्षत, फूल, लाल चंदन, जल इत्यादींनी अर्घ्य द्यावेत. अर्घ्यदानाचा मंत्र असा आहे;

**नमस्ते विश्वरूपाय नमस्ते ब्रह्मरूपिणे ।**
**सहस्त्ररश्मये नित्यं नमस्ते सर्वतेजसे ।।**
**नमस्ते रुद्रवपुषे नमस्ते भक्तवत्सल ।**
**पद्मनाभ नमस्तेऽस्तु कुण्डलाङ्गदभूषित ।।**
**नमस्ते सर्वलोकानां सुप्तानामुपबोधन ।**
**सुकृतं दुष्कृतं चैव सर्वं पश्यसि सर्वदा ।।**
**सत्यदेव नमस्तेऽस्तु प्रसीद मम भास्कर ।**
**दिवाकर नमस्तेऽस्तु प्रभाकर नमोऽस्तु ते ।।**

'भगवान सूर्या, आपण विश्वरूप व ब्रह्मरूप आहात. या दोनही स्वरूपांना नमस्कार असो. आपण सहस्त्रकिरणांनी सुशोभित व तेजरूप आहात. आपणांस नमस्कार असो. भक्तवत्सला, रुद्रस्वरूपधारी आपणांस वारंवार नमस्कार असो. कुंडल, अंगद आदी भूषणांनी विभूषित पद्मनाभा, आपणांस नमस्कार असो. भगवन्, आपण निद्रित असणाऱ्या सर्व जगास जागे करणारे आहात. आपणांस प्रणाम असो. आपण पापपुण्य सर्व काही पाहता. सत्यदेवा, आपणांस नमस्कार असो. भास्करा, आपण प्रसन्न व्हावं. दिवाकरा, आपणांस नमस्कार असो. प्रभाकरा, आपणांस नमस्कार असो.'

याप्रकारे सूर्याला नमस्कार करून त्याला सात वेळा प्रदक्षिणा करावी. द्विज, गाय, सुवर्ण यांना स्पर्श करून आपल्या घरी यावे. अतिथींची व भगवानांच्या मूर्तीची पूजा करावी. वैशाख महिन्यात जेव्हा सूर्य मेषराशीत असतो तेव्हा केशवांना प्रसन्न करून घेण्यासाठी त्यांच्या व्रतांचा संचय करावा. नारदांनी या व्रतविधीचे, माधवांच्या पूजेचे सविस्तर वर्णन केले. वैदिक, तांत्रिक, मिश्र या तीन प्रकारांनी श्रीहरींच्या पूजेची पद्धत त्यांनी समजावून दिली. शिलामयी, धातुमयी, लोहमयी, मृण्मयी, चित्रमयी, सिकतामयी, मनोमयी, मणिमयी अशा

आठ प्रतिमांचे त्यांनी वर्णन केले. गंध, धूप, पुष्प, दीप, अन्नादींचा नैवेद्य यांनी पूजा संपन्न करावी. पूजा झाल्यावर भगवान श्रीकृष्णांना साष्टांग नमस्कार घालावा. नारदांनी सांगितलेल्या या माधवव्रताचे अनुष्ठान पत्नीसह पुण्यबुद्धीने केले.

## राजा महीरथ व वैशाखमहत्त्व

एक ब्राह्मण व महात्मा धर्मराज यम यांच्या संवादातून नरक व स्वर्ग यांत प्रवेश करणाऱ्या कर्मांचे वर्णन, तुलसीदल व अश्वत्थ यांचा महिमा, वैशाखमाहात्म्याच्या संदर्भात तीन प्रेतांच्या उद्धाराची कथा, राजा महीरथाची कथा व यमब्राह्मणसंवादाचा मथितार्थ पद्मपुराणाने विस्ताराने वर्णन केला आहे. महीरथ नावाचा एक विख्यात राजा होता. त्याला प्रचुर ऐश्वर्य व संपत्ती यांची प्राप्ती पूर्वपुण्याईने झालेली होती. त्याने सर्व राज्यकारभार मंत्रिगणावर सोपवून स्वतः तो विषयांच्या भोगात आसक्त बनला. त्याला चिंता प्रजेची नव्हती की धनाची नव्हती. त्याची वाणी, त्याची संपत्ती, त्याचे मन सर्व काही कामिनींसह क्रीडा करण्यात सार्थ होई.

राजाच्या पुरोहिताचे नाव कश्यप होते. त्याने एकदा राजाला म्हटले, ' राजन्, मी आपला गुरू आहे म्हणून धर्म व अर्थ यांसंबंधी आपण माझी वचनं ऐकावीत. आपण दानानं ब्राह्मणांना तृप्त केलं नाही, भगवानांची आराधना केली नाही. कोणतंही व्रत आपण केलं नाही, की तीर्थयात्रा केली नाही. कामात गुंतून आपण श्रीहरीचं नामही घेतलं नाही. तुम्ही आता आळस सोडून धर्ममूलक सदाचाराचं सेवन करावं. धर्मरहित अर्थकामांचा त्याग करावा. विषयांत प्रवृत्त झालेलं चित्त आपण आता आवरावं. महाराज, या वैशाखमासात आपण विधियुक्त स्नान करून मधुसूदनाची पूजा करावी. '

राजास पुरोहिताचा उपदेश पटला. त्याने कश्यपासह वैशाख महिन्यात स्नान, दान व पूजन केले. सर्व प्रकारे मनोभावे राजाने माधवांची पूजा केली. त्यानंतर राजावर कालाची दृष्टी पडली. रात्रं-दिवस रतिसेवनाने त्याला क्षयाची बाधा झाली. त्याचे शरीर अत्यंत

दुर्बल झाले. त्याचा मृत्यू झाल्यावर यमाचे दूत त्याला न्यायला आले. पण विष्णुदूतांनी 'हा राजा धर्मात्मा आहे' असे स्पष्टपणे यमदूतांना म्हणून ते राजास विष्णुलोकात घेऊन गेले. वैशाखमासात स्नान केल्याने राजाचे पातक नष्ट झाले होते. विष्णुधामास जाताना महीरथ नरकाच्या मार्गाजवळून जात होता. त्याच्या कानांवर नरकात पडलेल्यांची करुण वाणी आली. राजाने चौकशी केली. विष्णुदूतांनी त्याला नरकलोकाचे, तेथील पापी लोकांचे दुःख वर्णन करून सांगितले. विष्णुदूतांचे बोलणे ऐकून राजाचे चित्त करुणेने द्रवले. त्याने आपल्या पुण्याचे दान या पापी लोकांसाठी केले. वैशाखस्नानाच्या एक दिवसाचे पुण्य मिळताच ते सर्व पापी जीव यमयातनेतून मुक्त झाले. राजाची प्रशंसा करून ते स्वर्गास गेले, या दानाने राजाची विशेष ख्याती झाली. राजाही परमधामास गेला. असे हे वैशाखमासव्रत धन, यश, आयू, परम कल्याण देणारे आहे. माधवमासाचे हे माहात्म्य माधवास अत्यंत प्रिय आहे.

## धरापाल राजा व गोपीचंदनमहिमा

भगवान महादेवांनी नारदांना त्रिरात्र तुलसीव्रताचे महत्त्व विधीसह समजावून दिले. प्रार्थना, आवाहन, स्नान, विलेपन, वस्त्र, यज्ञोपवीत, पुष्प, नैवेद्य, तांबूल, अर्घ्य आदी सर्व विधी महादेवांनी समजावून दिले. अन्नदान, जलदान, तडागनिर्माण, वृक्षारोपण, सत्यभाषण इत्यादींचा महिमा महादेवांनी सविस्तर सांगितला. मंदिरात कथा करणे, ऐकणे, दान करणे इत्यादींचा महिमा त्यांनी समजावून दिला. गोपीचंदनतिलकाचा महिमा, संवत्सरदीपव्रताचा विधी व महिमा, जयंतीनामक जन्माष्टमीचे व्रत, विविध प्रकारची दाने, शनीला संतुष्ट करण्याचे व्रत, त्रिस्पृशाव्रत, पक्षवर्धिनी एकादशीच्या जागरणाचे महत्त्व, एकादशीचे जया इत्यादी भेद, नक्तव्रताचे स्वरूप, एकादशीव्रतकथा आदी विविध व्रतांची व उपासनापद्धतींची माहिती नारदांना महादेवांनी त्या त्या कथेस अनुसरून दिली.

एके दिवशी सनत्कुमार धर्मराजास भेटण्यासाठी गेले. धर्मराजाने

त्यांची स्तुती करून मनापासून त्यांचा सत्कार केला. त्यांना सुखासनावर बसविले. त्यावेळी सनत्कुमारांनी एक आश्चर्य पाहिले. एक पुरुष सुवर्णाच्या सिंहासनावर बसून आला. धर्मराजाने त्याचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. त्याचा आदरसत्कार करून धर्मराज म्हणाला,

'महापुरुषा, आपलं स्वागत असो. आपल्या दर्शनानं प्रसन्नता वाटली. इथं माझ्या जवळ बसावं व मला काही ज्ञानाच्या गोष्टी सांगाव्यात.'

इतक्यात दुसरा एक पुरुष विमानातून तेथे आला. त्याचेही धर्मराजाने मनापासून स्वागत केले. त्याचे पूजन केले. हे सर्व पाहून सनत्कुमारांना आश्चर्य वाटले. ते धर्मराजास म्हणाले,

'यांनी असं कोणतं धर्मकार्य केलं आहे ? या दोघांचं पुण्यकर्म कोणतं ?'

'पृथ्वीवर वैदिश नावाचं एक नगर आहे. तिथं धरापाल नावाचा एक प्रसिद्ध राजा होता. त्यानं भगवान विष्णूंचं एक मंदिर बनवून त्यात त्यांची स्थापना केली. नगरीतील सर्व लोक त्या भगवानांची पूजा करीत. दर्शन घेत. त्या राजानं सर्वसामान्य श्रोत्यांना पुराणकथा ऐकविण्यासाठी एका ब्राह्मणाची नियुक्ती केली. राजाच्या आदेशानुसार तिथं पुण्यमय कथावार्ता सुरू झाली. थोड्याच दिवसांत आयुष्य क्षीण होऊन राजाचा मृत्यू झाला. त्याला द्युलोकातून विमान आलं. हा जो दुसरा ब्राह्मण इथं आला आहे त्यानं सत्संग करून उत्तम धर्माचं श्रवण केलं आहे. त्याच्या अंतःकरणात भक्तीचा उदय झाला आहे.'

महादेवांनी ही सर्व कथा नारदांना ऐकवून गोपीचंदनाचे महत्त्व वर्णन केले. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांनी विष्णूंचे भक्त व्हावे. भजनात तत्पर होऊन अंगास गोपीचंदन लावावे. त्यामुळे सारी पापे दूर होतात, ललाटावर दंडाच्या आकाराचा, वक्षःस्थलावर कमळाच्या आकाराचा, अन्यत्र दीपकाच्या सारखे चंदन लावावे. गोपीचंदन अंगास लावल्याने ब्राह्मणापासून चांडालाची शुद्धी होते. तुलशीचे पान, त्याची मणिमाला धारण करूनही मुक्ती मिळते. ज्याच्या ललाटावर मृत्युसमयी गोपीचंदनाचा टिळा आहे त्याला विष्णूचे परमपद प्राप्त होते.

कलियुगात गोपीचंदन लावणाऱ्यास कधी दुर्गती प्राप्त होत नाही.

## जयंती जन्माष्टमीव्रत

पूर्वी हरिश्चन्द्र नावाचा एक चक्रवर्ती राजा झाला. त्यावर संतुष्ट होऊन ब्रह्मदेवांनी त्याला एक सर्व कामना पूर्ण करणारी एक पुरी प्रदान केली. त्या पुरीत राहून राजा हरिश्चंद्राने सात द्वीपांसह वसुंधरेचे राज्य धर्मपूर्वक केले. तो प्रजेस आपल्या पुत्रांप्रमाणे मानी. राजापाशी धनधान्य पुष्कळ होते. राजा हरिश्चंद्र एकदा उत्तम विमानावर आरूढ होऊन आकाशमार्गाने जात असता त्याने मेरुपर्वतावर दृष्टी दिली. त्या पर्वतावर ज्ञानयोगपरायण महर्षी सनत्कुमार विराजमान झाले होते. त्याने मुनीं-पाशी जाऊन त्यांच्या चरणांवर आपले मस्तक झुकविले. ब्रह्मर्षींनीही राजाचे अभिवादन स्वीकारले. राजाने मुनिश्रेष्ठ सनत्कुमारास विचारले,

'भगवन्, मला ही जी संपत्ती मिळाली आहे, राज्य मिळालं आहे, हा योग मानवास दुर्लभ आहे. अशी ही संपत्ती कोणत्या कर्मानं प्राप्त होते ? मी पूर्वजन्मी कोण होतो ? आपण मला सारं सांगता ?'

'राजन्, तू पूर्वजन्मी सत्यवादी, पवित्र व उत्तम वैश्य होतास. तू आपलं स्वतःचं कामधाम सोडलं होतंस म्हणून तुझ्या बंधुबांधवांनी तुला सोडलं. तुझ्याजवळ उपजीविकेचं साधनही उरलं नव्हतं. स्वजन तुला सोडून गेले होते. तुझ्या स्त्रीनं तुला सोडून दिलं नाही. एकदा तुम्ही दोघेजण घनघोर जंगलात गेलात. तिथं एका तलावात एक कमल फुललं होतं. ते पाहून तुमच्या मनात विचार आला की, हे कमल आपल्या हातात घ्यावे. ते कमल घेऊन तुम्ही एक एक पाऊल टाकून शुभ व पुण्यमयी वाराणशीपुरात येऊन पोचलात. तिथं तुम्ही कमल विकण्याचं ठरविलं. पण ते कुणीच विकत घेईना. तिथं उभे असताना तुमच्या कानांवर वाद्यांचे आवाज आले. त्या दिशेनं तुम्ही गेलात. तिथं काशीचा राजा इन्द्रद्युम्नाची कन्या चंद्रावतीने जयन्ती नामक जन्माष्टमीचं व्रत केलं होतं. त्या स्थानी तुम्ही मोठ्या हर्षानं गेलात. तुमचं चित्त प्रसन्न झालं. तुम्ही भगवानांचा पूजाविधी पाहिला. कलशावर श्रीहरींची स्थापना करून विशेष थाटानं पूजा होत होती.

विविध पुष्पांनी शृंगार केला होता. भक्तीनं वश होऊन तुम्ही उभय-तांनी त्या कमलपुष्पानं भगवानांची पूजा केली. त्यामुळं त्या कन्येला मोठा हर्ष झाला. राजकुमारीनं तुम्हांस भोजनासाठी निमंत्रित केलं. पण तुम्ही भोजन केलं नाही की त्यांचं धन घेतलं नाही. तुझ्या पूर्वजन्माचं हेच मोठं पुण्य. कर्मास अनुसरून तुझा मृत्यू झाला. या पूर्वजन्मीच्या कर्मामुळं तुला या जन्मी हे फल मिळालं आहे.'

'मुनिवरा, मला या व्रताची थोडी माहिती देता ? कोणत्या महिन्यात, कोणत्या तिथीस हे व्रत करावं ?'

'राजन्, मी या व्रतासंबंधी सर्व सांगतो. *श्रावण महिन्यात कृष्ण-पक्षात अष्टमीस जर रोहिणी नक्षत्राचा योग असेल तर त्या जन्मा-ष्टमीस ' जयंती ' असे नाव आहे. त्या दिवशी उपवासाचं व्रत घ्यावं. काळ्या तिलमिश्रित जलानं स्नान करावं. नवीन कलशाची स्थापना करावी. त्यात हिरा, मोती, वैदूर्य, पुष्पराग, इंद्रनील ही पंचरत्नं टाका-वीत. कलशाच्यावर सोन्याचा पत्रा ठेवून सोन्याची नंदराणी यशोदा तिथं स्थापन करावी. यशोदा आपल्या पुत्रास, कृष्णास स्तनपान करवीत असून तिच्या मुखावर कौतुकाचं हास्य आहे असा भाव असावा. श्रीकृष्ण मातेकडे प्रेमानं पाहात आहेत. आपल्या शक्तीनुसार अशा भावाची सुवर्णमय प्रतिमा भगवान श्रीकृष्णांची बालस्वरूपातील करावी. याशिवाय सोन्याची रोहिणी, चांदीचा चंद्रमा बनवावा. भगवानांच्या कानांत कुंडलं, गळ्यात कंठहार असावा. मातेबरोबर याप्रमाणं पुत्राची स्थापना करून त्यांना दूध आदींनी स्नान घालावं. चंदनाचा लेप करावा. श्वेत वस्त्रांनी भगवानांना आच्छादित करावं, फुलांच्या माळेनं शृंगारावं. निरनिराळ्या दिव्य पदार्थांचा नैवेद्य दाखवावा. नाना प्रकारची फलं अर्पण करावीत. दिवा लावावा. भक्तिपूर्वक नृत्य, गीत, वाद्य यांचा थाट करावा. गुरूची पूजा करून त्यांना संतुष्ट करावं.'

### शनीला संतुष्ट करण्याचे व्रत

नारदांना महादेवांनी महाराजा दशरथाने शनीस संतुष्ट कसे

---

* जेथे कृष्णपक्षाने महिन्यास आरंभ होतो तेथे श्रावणमासाच्या कृष्णपक्षास भाद्रपदमासाचा कृष्णपक्ष समजावा. हा विवेक पुढे अनेक ठिकाणी ध्यानात ठेवावा.

केले हे विस्तृत निवेदन केले. हा शनैश्चर देवांत प्रसिद्ध असा कालरूपी महान ग्रह आहे, त्याच्या मस्तकावर जटा आहेत. शरीरावर खूप केस आहेत. फार पूर्वीची हकीगत आहे. रघुवंशात दशरथ नावाचा एक प्रसिद्ध राजा झाला. तो चक्रवर्ती सम्राट, महान वीर, सात द्वीपांचा स्वामी होता. एके दिवशी शनैश्चर कृत्तिकेच्या शेवटी जाऊन पोचला हे जाणून ज्योतिषी राजाला म्हणाले,

'महाराज, या समयास शनी रोहिणीस भेटून पुढं जात आहे. हा अत्यंत उग्र असा शाकटभेद नावाचा योग आहे. देव व असुर यांना हा अतिशय भयंकर आहे. यामुळं बारा वर्षांपर्यंत या जगात भयानक दुर्भिक्ष्य पसरेल.'

राजाने सर्व ब्राह्मणांना बोलावून वसिष्ठादिकांना विचारले,

'द्विजांनो, या संकटास टाळण्यासाठी काय करावं ?'

'राजन्, रोहिणी प्रजापती ब्रह्मदेवांचं नक्षत्र आहे. त्याचा भेद होताच प्रजा कशी टिकेल ? ब्रह्मदेव, इंद्र इत्यादींनाही हा योग असाध्य आहे.'

राजा दशरथाने या बाबीचा विचार करून दिव्य अस्त्रांसह धनुष्य घेऊन तो रथावर आरूढ झाला व वेगाने नक्षत्रमंडलाकडे गेला. रोहिणी-पृष्ठ सूर्यापासून सव्वा लाख योजने वर आहे. राजा दशरथ तेथपर्यंत गेला, राजाने धनुष्य कानापर्यंत ओढले. त्यावर संहारास्त्राचे संधान केले. हे अस्त्र देव व असुर यांना फार भयंकर होते. या अस्त्रास भिऊन शनी हसत म्हणाला,

'राजेन्द्रा, तुझा महान पुरुषार्थ शत्रूला भय पोचविणारा आहे. माझ्या दृष्टीत येणारे देव, असुर, मनुष्य, सिद्ध, विद्याधर, नाग हे सर्व भस्म होतात. पण तूच तेवढा वाचला आहेस. महाराज, तुझं तेज व पौरुष पाहून मी संतुष्ट झालो आहे. एक वर माग. मनात येईल ते सांग. मी अवश्य देईन.'

'शनिदेवा, जोपर्यंत नद्या आहेत, समुद्र आहे, सूर्य आहे, चंद्रमा आहे, तोपर्यंत आपण रोहिणीचं भेदन करून पुढं जाऊ नये. बारा वर्षां-पर्यंत कधीच दुर्भिक्ष्य करू नये.'

'तथास्तु.'

हे दोन वर प्राप्त करून राजा मोठा प्रसन्न झाला. त्याच्या शरीरावर रोमांच आले. त्याने रथावर धनुष्यबाण ठेवून शनीची स्तुती केली व तो म्हणाला,

'ज्याच्या शरीराचा वर्ण कृष्ण, नील, भगवान शंकराप्रमाणं आहे त्या शनिदेवास नमस्कार असो. हा देव जगास कालाग्नी व कृतान्ता-सारखा असून त्याला वारंवार नमस्कार असो. ज्याचं शरीर कंकाल आहे, ज्याच्या दाढीजटा वाढल्या आहेत, त्या शनिदेवास नमस्कार असो. ज्याचे नेत्र मोठे आहेत, पोट पाठीस लागले आहे, ज्याचा आकार भयानक आहे त्या शनिदेवास नमस्कार असो. ज्याचं शरीर अवाढव्य आहे, ज्याचे केस मोठे आहेत, ज्याचं शरीर सुकून गेलं आहे, ज्याच्या दाढा कालरूप आहेत, त्या शनिदेवास वारंवार नमस्कार असो. ज्याचे डोळे गहरे आहेत, ज्याच्याकडं पाहणं कठीण आहे. जो घोर, रुद्र, भीषण व विकराल आहे त्याला नमस्कार असो. बलीमुखा, सर्व भक्षण करणारे आपणच आहात. आपणांस नमस्कार असो. सूर्यनंदना, भास्करपुत्रा, अभयदात्या, आपणांस नमस्कार असो. संवर्तका, मंदगतीनं चालणाऱ्या शनैश्चरा, तलवारीप्रमाणं प्रतीक धारण करणाऱ्या देवा, आपणांस नमस्कार असो. तपस्येनं आपण आपला देह भस्म करून घेतला आहे. आपण सदा योगाभ्यासात तत्पर आहात. भुकेनं आतुर आहात. अतृप्त आहात. आपणांस सदा नमस्कार असो. ज्ञाननेत्रा, आपणांस नमस्कार असो. कश्यपनंदन सूर्याच्या पुत्रा शनिदेवा, आपणांस नमस्कार असो. आपण संतुष्ट झालात तर राज्य देता, रुष्ट झालात तर राज्य हरण करता. देव, असुर, मनुष्य, सिद्ध, विद्याधर, नाग हे सर्व आपली दृष्टी पडताच नष्ट होतात. देवा, आपण माझ्यावर प्रसन्न व्हावं. मी वर मिळविण्यास योग्य आहे. मी शरण आलो आहे.

नमः कृष्णाय नीलाय शितिकण्ठनिभाय च ।
नमः कालाग्निरूपाय कृतान्ताय च वै नमः ।।
नमो निर्मांसदेहाय दीर्घश्मश्रुजटाय च ।
नमो विशालनेत्राय शुष्कोदरभयाकृते ।।

नमः पुष्कलगात्राय स्थूलरोम्णे च वै पुनः ।
नमो दीर्घाय शुष्काय कालद्रंष्ट्र नमोऽस्तुते ॥
नमस्ते कोटराक्षय दुर्निरीक्ष्याय वै नमः ।
नमो घोराय रौद्राय भीषणाय करालिने ॥
नमस्ते सर्वभक्षाय बलीमुख नमोऽस्तु ते ।
सूर्यपुत्र नमस्तेऽस्तु भास्करेऽभयदाय च ॥
अधोदृष्टे नमस्तेऽस्तु संवर्तक नमोऽस्तुते ।
नमो मंदगते तुभ्यं निस्त्रिंशाय नमोऽस्तु ते ॥
तपसा दग्धदेहाय नित्यं योगरताय च ।
नमो नित्यं क्षुधार्ताय अतृप्ताय च वै नमः ॥
ज्ञानचक्षुर्नमस्तेऽस्तु कश्यपात्मजसूनवे ।
तुष्टो ददासि वै राज्यं रूष्टो हरसि तत्क्षणात् ॥
देवासुरमनुष्याश्च सिद्धविद्याधरोरगाः ।
त्वया विलोकिताः सर्वे नाशं यान्ति समूलतः ॥
प्रसादं कुरु मे देव वरार्होऽहमुपागतः ॥

राजा दशरथाच्या या स्तुतीने शनिदेव संतुष्ट झाला. तो म्हणाला,

‘ राजेन्द्रा, इच्छेनुसार एक वर माग. ’

‘ सूर्यनंदना, आजपासून आपण देव, असुर, मनुष्य, पशू, पक्षी, नाग यांना पीडा देऊ नये. ’

‘ राजन्, देव, असुर, मनुष्य, सिद्ध, विद्याधर, राक्षस यांच्या कुणाच्याही मृत्युस्थानी, जन्मस्थानी, चतुर्थस्थानी मी जर असेन तर त्यांना मृत्यूचे कष्ट देईन. पण जो श्रद्धेनं पवित्र व एकचित्त घेऊन माझी लोहमयी सुंदर प्रतिमा करून शमीपत्रांनी तिचं पूजन करून तिळमिश्रित उडीदभात, लोखंड, काळी गाय या वस्तू ब्राह्मणास दान देईल, या स्तोत्राचा जप करील, तर मी त्यांना कधीच पीडा देणार नाही. ’

असे वरदान मिळवून राजा दशरथ कृतार्थ झाला. शनैश्चरास

नमस्कार करून तो रथावर वसून परत राजधानीस आला. शनिवारी सकाळी उठून जो या व्रताचा पाठ करतो, ऐकतो तो पापमुक्त होऊन स्वर्गलोकात प्रतिष्ठित होतो.

## त्रिस्पृशाव्रताचा विधी

नारदांना महादेवांनी त्रिस्पृशाव्रताचा विधी समजावून दिला. पूर्वी हे व्रत सनत्कुमारांनी व्यासांना सांगितले होते. हे व्रत सर्व पापांचा नाश करणारे, महान दुःखांना दूर करणारे आहेच. सर्व कामनांची पूर्तता करणारे आहे. जो प्रतिदिन 'त्रिस्पृशा'चे नामोचारण करतो त्याची सर्व पापे नष्ट होतात. देवाधिदेव भगवानांनी मोक्षप्राप्तीसाठी या व्रताची निर्मिती केली आहे. म्हणून याला 'वैष्णवी तिथी' म्हणतात. इंद्रियांचा निग्रह केला नाही तर मन स्थिर होत नाही. जो ध्यानधारणानें वर्जित आहे, विषयपरायण आहे, कामभोगात आसक्त आहे, त्याला त्रिस्पृशाव्रत मोक्षदायिनी आहे.

कार्तिक महिन्यात शुक्लपक्षात सोमवारी वा बुधवारी त्रिस्पृशा एकादशी असेल तर ती कोटी पापांचा नाश करणारी असते. ब्रह्महत्यादी पापेही नष्ट होतात. पूर्वी भगवान माधवाने स्वतः प्राची सरस्वतीच्या तटावर गंगेस हे व्रत सांगितले होते. गंगेने एकदा विचारले,

'हृषिकेशा, ब्रह्महत्यादी कोटयवधी पापं करणारी मनुष्ये माझ्यात स्नान करतात. त्यामुळं माझं शरीर दूषित झालं आहे. गरुडध्वजा, हे पातक मी दूर कसं करू ?'

'शुभे, तू त्रिस्पृशा व्रताचं आचरण कर. शंभर कोटी तीर्थांपेक्षाही हे व्रत महत्त्वपूर्ण आहे. कोटी यज्ञ, व्रत, दान, जप, होम, सांख्ययोग यांच्यापेक्षाही या व्रताचा महिमा मोठा आहे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार पुरुषार्थांना देणारं हे व्रत आहे. गंगे, त्रिस्पृशाव्रत ज्या कोणत्या महिन्यात येईल त्याचं अनुष्ठान करावं. तू पापमुक्त होशील. जर एकाच दिवशी एकादशी, द्वादशी व रात्री अंतिम प्रहरात त्रयोदशी असेल तर तो 'त्रिस्पृशा' योग समजावा. यात दशमीचा योग नसतो. देवी गंगे, या व्रताचा विधी थोडक्यात मी सांगतो. आपल्या वैभवास

अनुसरून एका वा अर्ध्या पलाच्या सोन्याची प्राचीमाधवाची प्रतिमा तयार करावी. एका तांब्याच्या पात्रात तीळ भरावेत. जलानं भरलेल्या कलशाची स्थापना करावी. भगवान दामोदरांची स्थापना करावी. त्यांना स्नान घालावं. चंदन लावावं. वस्त्र द्यावं. सुंदर पुष्प व तुलसी-दल वाहावं. छत्र व उपानह् द्यावीत. सुंदर फलांचा नैवेद्य दाखवावा. यज्ञोपवीत, नूतन वस्त्र समर्पण करावं. सुंदर उंची बांबूची छडी समर्पण करावी. 'दामोदराय नमः' म्हणून चरणांची, 'माधवाय नमः' म्हणून दोनही गुडघ्यांची, 'कामप्रदाय नमः' म्हणून गुह्यभागाची, 'वामन-मूर्तये नमः' म्हणून कटीची पूजा करावी. 'पद्मनाभाय नमः' म्हणून नाभीची, 'विश्वमूर्तये नमः' म्हणून पोटाची, 'ज्ञानगम्याय नमः' म्हणून हृदयाची, 'वैकुंठगामिने नमः' म्हणून कंठाची, 'सहस्रबाहवे नमः' म्हणून बाहूंची, 'योगरूपिणे नमः' म्हणून नेत्रांची, 'सहस्रशीर्ष्णे नमः' म्हणून शिराची, 'माधवाय नमः' म्हणून सर्व अंगाची पूजा करावी.

विधिवत पूजा करून अर्घ्य द्यावा. जलयुक्त शंखाच्या वर सुंदर नारळ ठेवून त्याला रक्षासूत्राने लपेटावे. दोन हातांत तो शंख आदी घेऊन म्हणावे,

स्मृतो हरसि पापानि यदि नित्यं जनार्दन ।
दुःस्वप्नं दुर्निमित्तानि मनसा दुर्विचिन्तितम् ।।
नारकं तु भयं देव भयं दुर्गतिसंभवम् ।
यन्मम स्यान्महादेव ऐहिकं पारलौकिकम् ।।
तेन देवेश मां रक्ष गृहाणार्घ्यं नमोऽस्तु ते ।
सदा भक्तिर्ममैवास्तु दामोदर तवोपरि ।।

'जनार्दना, आपण स्मरण करताच मनुष्याची पापं हरण करता. देवा, माझी दुःस्वप्नं, अपशकुन, मानसिक दुश्चिन्ता, नारकीय भय, दुर्गतिजन्य त्रास यांना संपवावं. महादेव, देवेश्वर, माझं या लोकी वा परलोकी जे भय असेल त्यापासून माझं रक्षण तुम्ही करावं. माझा हा अर्घ्य ग्रहण करावा. आपणांस नमस्कार असो. दामोदरा, सदा आपणांतच माझी भक्ती जडावी.'

त्यानंतर धूप, दीप, नैवेद्य अर्पण करून भगवानांची आरती

करावी. त्यानंतर त्यांच्या मस्तकावर शंख फिरवावा. त्यानंतर सद्गुरूंचे पूजन करावे. त्यांना सुंदर वस्त्र, पगडी, अंगरखा द्यावा. पादत्राण, छत्री, अंगठी, कमंडलू, भोजन, पान, सप्तधान्य, दक्षिणा इत्यादी देऊन संतुष्ट करावे. श्रीहरीच्या समीप जागरण करावे. गीत, नृत्य आदी उपचारांनी भगवानांना संतुष्ट करावे. हे त्रिस्पृशाव्रत ऐकल्याने गंगा-तीर्थात स्नान करण्याचे पुण्य मिळते. त्रिस्पृशाच्या उपवासानें हजार अश्वमेध व शंभर वाजपेययज्ञांचे फळ मिळते. व्रत करणारा पुरुष पितृकुल, मातृकुल, पत्नीकुलासहित विष्णुलोकात प्रतिष्ठित होतो. कोटी तीर्थांचे फल मिळते. द्वादशाक्षर मंत्र जपून हे व्रत केल्यास सर्व कामना पूर्ण होतील. पूर्वी स्वतः ब्रह्मदेवांनी, अनेक ऋषिमुनींनी हे व्रत केले होते. हे त्रिस्पृशाव्रत मोक्ष देणारे आहे.

## पक्षवर्धिनी एकादशी व नक्तव्रत

महादेवांनी नारदांना पक्षवर्धिनी, जया, विजया, जयंती, पापनाशिनी, श्रीकृष्णांनी युधिष्ठिरास मोक्षा, सफला, पुत्रदा, षट्तिला, आमलकी, पापमोचनी, कामदा, वरूथिनी, मोहिनी, अपरा, निर्जला, योगिनी, शयनी, कालिका, अजा, पद्मा, इंदिरा, पापांकुशा, रमा, बोधिनी, कमला इत्यादी एकादश्यांचे महत्त्व विशद करून सांगितले. अमावास्या वा पूर्णिमा साठ दंडांची होऊन दिनरात अविकल रूपात राहिले व दुसऱ्या दिवशी प्रतिपदेतही थोडा अंश राहिला तर ती पक्षवर्धिनी मानली जाते. त्या पक्षातील एकादशीस हे नाव आहे. दहा हजार अश्वमेधांचे फल देणारी ही एकादशी आहे. जलाने भरलेला एक कलश घ्यावा, त्यात पंचरत्ने टाकावीत. कलशास फुलांच्या मालांनी सुशोभित करावे. त्यावर एक तांब्याचे पात्र ठेवावे. पात्रात गहू भरून त्यात भगवानांची सुवर्णमूर्ती ठेवावी.

पक्षवर्धिनी तिथीस या भगवानांना पंचामृताने स्नान घालावे. कुंकुम, अरगजा, चंदन यांचा अनुलेप करावा. कलशस्थ श्रीहरींची पूजा करावी. 'पद्मनाभाय नमः' म्हणून दोनही चरणांची, 'विश्वमूर्तये नमः' म्हणून दोनही गुडघ्यांची, 'ज्ञानगम्याय नमः' म्हणून दोनही

मांड्यांची, 'ज्ञानप्रदाय नमः' म्हणून कटिभागाची, 'विश्वनाथाय नमः' म्हणून उदराची, 'श्रीधरायनमः' म्हणून हृदयाची 'कौस्तुभकंठाय नमः' म्हणून कंठाची, 'क्षत्रान्तकारिणे नमः' म्हणून दोन बाहूंची, 'व्योम-मूर्ध्ने नमः' म्हणून ललाटाची, 'सर्वरूपिणे नमः' म्हणून डोक्याची पूजा करावी. 'दिव्यरूपिणे नमः' म्हणून सर्व अंगाची पूजा करावी. सुंदर नारळाच्या द्वारे श्रीहरीस अर्घ्यदान करावे. अर्घ्यदानाचा मंत्र असा आहे–

**संसारार्णवमग्नं भो मामुद्धर जगत्पते ।**
**त्वमीशः सर्वलोकानां त्वं साक्षाच्च जगत्पतिः ॥**
**गृहाणार्घ्यं मया दत्तं पद्मनाभ नमोऽस्तुते ।**

'जगदीश्वरा, या संसारसागरात मी बुडून गेलो आहे. आपण माझा उद्धार करावा. आपण सर्व लोकांचे ईश्वर व साक्षात जगत्पती परमेश्वर आहात. पद्मनाभा, आपणांस नमस्कार असो. मी दिलेला हा अर्घ्य आपण स्वीकारावा.'

त्यानंतर भगवंतांना नैवेद्य समर्पण करावा. त्यांना कर्पूरयुक्त तांबूल द्यावा. तुपाचा व तेलाचा दिवा लावावा. गुरूंचे पूजन करून त्यांना दक्षिणा वगैरे देऊन त्यांचा सत्कार करावा. त्यानंतर गीत, नृत्य, पुराणपाठ करून मोठ्या हर्षाने रात्री जागरण करावे. शास्त्रचर्या, सात्त्विक नृत्य, संगीत, वाद्य, ताल, तैलयुक्त दीपक, कीर्तन, भक्ति-भावना, प्रसन्नता, संतोषजनकता, सामुदायिक उपस्थिती यांनी संपन्न झालेले हे जागरण भगवंतांना फार आवडते. येथे सर्व तीर्थांचा निवास असतो. सर्व पवित्र नद्या, सर्व समुद्र एकादशीस जागरणस्थानास येतात. द्वादशीस सदा पवित्र व मोक्षदायिनी समजावे. त्या दिवशी प्रातःकाळी श्रीहरीची पूजा करून खालील मंत्र म्हणावा.

**अज्ञानतिमिरान्धस्य व्रतेनानेन केशव ।**
**प्रसीद सुमुखो भूत्वा ज्ञानदृष्टिप्रदो भव ॥**

'केशवा, मी अज्ञानरूपी तिमिरानं आंधळा झालो आहे. आपण या व्रतानं प्रसन्न व्हावं व मला ज्ञानदृष्टी द्यावी.' यानंतर पारणे करून व्रताची समाप्ती व्हावी.

शुक्लपक्षातील पुनर्वसू नक्षत्रास एकादशी आली तर ती जया होते. शुक्लपक्षातील द्वादशीस श्रवण नक्षत्र असेल तर ती तिथी विजया नावाने ओळखली जाते. रोहिणी नक्षत्र असेल तर जयंती, पुष्य नक्षत्र असेल तर पापनाशिनी, अशी नावे या तिथींना आहेत. युधिष्ठिराच्या प्रश्नावरून श्रीकृष्णांनी त्याला नक्त व्रतासंबंधी माहिती दिली. हेमंत ऋतूत मार्गशीर्ष महिन्यात कृष्णपक्षातील द्वादशीस उपवास करावा. या व्रताचे दृढतापूर्वक पालन करण्यासाठी पुरुषाने दशमीस सदा एकभुक्त राहावे. शौचसंतोषादी नियम पाळावेत. एक वेळ भोजन करावे. दिवसाच्या आठव्या भागात जेव्हा सूर्याचे तेज मंद होईल तेव्हा त्याला 'नक्त ' म्हणावे. रात्री भोजन करणे हे नक्त नाही. दशमीची रात्र संपल्यावर एकादशीस मनुष्याने व्रतस्थ असावे. कामक्रोधांचा त्याग करावा, भगवान केशवांची पूजा करून त्यांना नैवेद्याचा भोग द्यावा. घरात भक्तिपूर्वक दीप लावावा. निद्रा व मैथुनाचा त्याग करावा. ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. रात्री जागरण करावे.

प्राचीन काळी मुर नावाचा एक दानव होता. तो मोठा अद्‌भुत, रौद्र, भयंकर होता. त्याने इंद्राला भयभीत केले. त्याने सर्व देवांचा पराभव करून स्वर्गातून हाकलून दिले. इंद्राने सर्व वृत्तान्त महादेवांना सांगितला. महादेवांनी त्याला भगवान गरुडध्वजाकडे पाठविले. भगवान गदाधर क्षीरसागरात झोपलेले होते. इंद्राने त्यांची मनापासून प्रार्थना केली, ' देवेश्वरा, आपणांस नमस्कार असो. मधुसूदना, आमचं दैत्यांपासून रक्षण करावं. देवेश्वरा, तालजंघ नावाच्या एका मोठ्या असुराचा पुत्र मुर अत्यंत उत्कट, पराक्रमी व भयंकर आहे. तो चंद्रावती नावाच्या नगरीत राहातो, त्यानं सर्व देवांचा पराभव करून त्यांना स्वर्गातून हाकून दिलं आहे. त्यानं एक दुसराच इंद्र सिंहासनावर बसविला आहे.'

इंद्राचे बोलणे ऐकून भगवानांना क्रोध आला. त्यांनी त्या दैत्यावर हल्ला केला व पुष्कळसे दानव मारले. मधुसूदन बदरिकाश्रमास गेले. तेथे ते सिंहावती नावाच्या गुहेत झोपले. दानव मुर त्यांना तेथे मारण्यासाठी आला. तेव्हा भगवानांच्या शरीरातून एक कन्या प्रकट झाली. ही रूपवती कन्या शस्त्रांनी व अस्त्रांनी सज्ज होती. तिचे बल मोठे

होते. तिनेच त्या दानवाचा वध केला. भगवान जागे झाले. त्यांनी विचारले,

‘या माझ्या उग्र शत्रूचा वध कुणी केला ?’

‘मी आपल्याच प्रसादानं या महादैत्यास मारलं.’

‘कल्याणी, तुझ्या या कृत्यामुळं देव हर्षित झाले आहेत. एखादा वर माग.’

ही कन्या साक्षात एकादशी होती. ती म्हणाली, ‘प्रभो, मी सर्व प्रकारच्या सिद्धी देणारी होईन असं करा. माधवा, जे लोक उपवास करतील, नक्त अथवा एकभुक्त राहातील त्यांना मोक्ष प्राप्त होईल.’

‘कल्याणी, तुझ्या इच्छेप्रमाणं सर्व होईल.’

## मोक्षा, सफला, प्रमदा, षट्‌तिला, जया, विजया, आमलकी एकादशी

मार्गशीर्ष शुक्लपक्षात ‘मोक्षा’ एकादशी येते. या दिवशी तुलसी-मंजिरी व धूपदीप यांनी भगवान दामोदरांचे पूजन करावे. फार पूर्वीची हकीगत. वैष्णवांनी विभूषित असलेल्या चंपक नगरात वैखानस नावाचा राजा होता. तो आपल्या प्रजेचे पालन पुत्राप्रमाणे करी. एकदा त्याने रात्री स्वप्नात आपले पितर नीच योनीत पडलेले पाहिले. राजा लगेच निकटच्या पर्वतमुनीपाशी गेला. पर्वतमुनींनी क्षणभर विचार करून सांगितले ‘मार्गशीर्ष शुक्लपक्षातील मोक्षा एकादशीचं व्रत करावंस. त्या पुण्यानं पितर तरतील.’ राजाने या प्रमाणे या एकादशीचे व्रत केल्यावर त्याच्या पितरांचा उद्धार झाला.

पौष मासातील कृष्णपक्षातील एकादशी ‘सफला’या नावाने प्रसिद्ध आहे. चंपावती नावाची एक विख्यात नगरी होती. तेथील राजा माहिष्मती होता. त्याला पाच पुत्र होते. ज्येष्ठ पुत्र पापकर्मी, परस्त्रीगामी व वेश्यासक्त होता. त्याने ब्राह्मणांची निंदा करून पित्याचे धन खर्च केले. आपल्या या पापाचारी पुत्राचे नाव राजाने लुंभक असे ठेविले होते. या लुंभकास पिता व बंधू यांनी वनात हाकलून दिले. पाप-

बुद्धी लुंभक एका पिंपळाच्या वृक्षाच्या आश्रयाने राही. पौष मासात कृष्णपक्षात त्याच्या हातून नकळत सफला एकादशीचे अनुष्ठान घडले. त्याला या व्रतामुळे राज्य व वैभव प्राप्त झाले. कृष्णांच्या कृपेने त्याला मनोज्ञ नावाचा एक पुत्रही झाला.

पौष मासातील शुक्लपक्षातील एकादशी 'पुत्रदा' या नावाने प्रसिद्ध आहे. सर्व पापे हरण करणारी ही तिथी आहे. पूर्वी भद्रावतीपुरीत सुकेतुमान नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या राणीचे नाव चंपा. पुत्र नसल्यानें दोघेही कष्टी होते. राजा एकदा वनात गेला. तेथे काही मुनी व्रताचरण करताना त्याला दिसले. त्यांनी त्या राजाला पुत्रदा एकादशीचे महत्त्व सांगितले. राजानेही त्या व्रताचे पालन केले. त्या राजास एक तेजस्वी पुत्र झाला.

माघमासातील कृष्णपक्षात जी एकादशी येते तिला 'षट्तिला' असे नाव आहे. या दिवशी शुद्धभावाने श्रीविष्णूंचे पूजन करावे. चंदन, अरगजा, कापूर, नैवेद्य आदींनी त्यांना संतुष्ट करावे. अर्घ्यदान करताना म्हणावे,

कृष्ण कृष्ण कृपालुस्त्वमगतीनां गतिर्भव ।
संसारार्णवमग्नानां प्रसीद पुरुषोत्तम ।।
नमस्ते पुण्डरीकाक्ष नमस्ते विश्वभावन ।
सुब्रह्मण्य नमस्तेऽस्तु महापुरुष पूर्वज ।।
गृहाणार्घ्यं मया दत्तं लक्ष्म्या सह जगत्पते ।

'सच्चिदानंदा श्रीकृष्णा, आपण मोठे दयाळू आहात. आम्ही आश्रयहीन असल्यानं आपण आश्रयदाता व्हावं. पुरुषोत्तमा, आम्ही या संसारसमुद्रात बुडत आहोत. आपण आमच्यावर प्रसन्न व्हावं. कमल-नयना, आपणांस नमस्कार असो. विश्वभावना, आपणांस नमस्कार असो. सुब्रह्मण्य, महापुरुष, सर्वांचे पूर्वज, आपणांस नमस्कार असो. जगत्पते, आपण मी दिलेल्या अर्घ्यास लक्ष्मीसहित स्वीकारावं.'

यानंतर ब्राह्मणाची पूजा करावी. जलाचा घडा त्याला दान द्यावा. ब्राह्मणास काळी गाय दान द्यावी. तिळांनी भरलेल्या पात्राचेही दान करावे. तिळाने स्नान करावे, तिळाचे उटणे लावावे, तिळांनी होम

करावा, तिलमिश्रित जल प्यावे, तिलाचे दान करावे, तिलाचे भोजन करावे. या सहा प्रकारांनी तिळाचा उपयोग होत असल्याने या तिथीस 'षट्तिला' एकादशी असे म्हणतात. ही सर्व पापांचा नाश करणारी आहे. माघमासातील शुक्लपक्षातील एकादशीस 'जया' असे नाव आहे. ही सर्व पापांना दूर करणारी व मोक्ष देणारी आहे. स्वर्गात देवराज इंद्र राज्य करीत होता. देवगण पारिजात वृक्षांनी भरलेल्या नंदनवनात अप्सरांसह विहार करीत होते. गंधर्व गायन करीत होते. चित्रसेन गंधर्वाच्या स्त्रीचे नाव मालिनी होते. हिच्या कन्येचे नाव पुष्पवंती. पुष्पदंत गंधर्वाच्या पुत्राचे नाव माल्यवान होते. हा माल्यवान पुष्पवंतीच्या रूपावर मोहित होता. हे दोघं गाननृत्य करीत असताना भानावर नव्हते. कधी ताल भंगायचा. कधी गायन थांबायचे. इंद्र रागावला व त्याने त्यांना पति-पत्नींच्या रूपात पिशाच व्हाल अशी आज्ञा केली.

दोघेजण पिशाचरूपात भटकू लागले. त्यांनाही दैवयोगाने माघातील जया नावाच्या एकादशीचे पुण्य घडले. भगवान विष्णूंच्या प्रभावाने त्यांची पिशाचयोनी संपली. ते दोघे रूपवान बनून स्वर्गास गेले.

फाल्गुन वद्यातील एकादशी 'विजया' नावाने प्रसिद्ध आहे. रामचंद्र सीतेच्या शोधासाठी सागरतीरावर आले. या समुद्राला पार कसे करावे ? हा प्रश्न रामाने मुनी वकदाल्भ्यांना विचारला. बकदाल्भ्यांनी फाल्गुन कृष्णपक्षातील 'विजया' एकादशीचे व्रत करायला सांगितले. या व्रताचा विधीही सांगितला. रामचंद्रांनी विजया एकादशीचे व्रत करून शत्रूवर विजय मिळविला.

फाल्गुन शुद्धातील एकादशी 'आमलकी' या नावाने ओळखली जाते. आवळ्याचा वृक्ष पृथ्वीवर महान फल देणारा व पापांचा नाश करणारा आहे. भगवान विष्णूंच्या मुखातून एक बिंदू प्रकट होऊन पृथ्वीवर पडला. त्यापासून आवळ्याचा महान वृक्ष निर्माण झाला. आमलकी एकादशीस आवळ्याच्या वृक्षाखाली जाऊन जागरण करावे. परशुरामाची सुवर्णाची प्रतिमा तयार करावी. 'विशोकाय नमः' म्हणून चरणांची, 'विश्वरूपिणे नमः' म्हणून दोन गुढघ्यांची, 'उग्राय नमः' म्हणून मांड्यांची, 'दामोदराय नमः' म्हणून कटिभागाची,

'पद्मनाभाय नमः' म्हणून उदराची, 'श्रीवत्सधारिणे नमः' म्हणून वक्षःस्थलाची, 'चक्रिणे नमः' म्हणून डाव्या हाताची, 'गदिने नमः' म्हणून उजव्या हाताची, 'वैकुंठाय नमः' म्हणून कंठाची, 'यज्ञमुखाय नमः' म्हणून मुखाची, 'विशोकनिधये नमः' म्हणून नासिकेची, 'वासुदेवाय नमः' म्हणून नेत्रांची, 'वामनाय नमः' म्हणून ललाटाची, 'सर्वात्मने नमः' म्हणून सर्व अंगाची व मस्तकाची पूजा करावी. खालील मंत्राने अर्घ्य द्यावा;

नमस्ते देवदेवेश जामदग्न्य नमोऽस्तुते ।
गृहाणार्घ्यमिमं दत्तमामलक्या युतं हरे ।।

देवेश्वरा, जमदग्निनंदना, विष्णुस्वरूप परशुरामा, आपणांस नमस्कार असो. नमस्कार असो. आवळ्यांच्या फलांसह हा माझा अर्घ्य आपण स्वीकारावा.'

## पापमोचनी, कामदा, वरूथिनी, मोहिनी एकादशी इत्यादी

चैत्र कृष्णपक्षात जी एकादशी येते ती 'पापमोचनी' या नावाने प्रसिद्ध आहे. अप्सरांनी सेवित अशा चैत्ररथ वनात गंधर्वकन्या विहार करीत होत्या. याच वनात मुनिवर मेधावी तपस्या करीत होते. मंजुघोषा नावाची एक अप्सरा सुंदर वीणा वाजवून मुनींचे चित्त विचलित करू लागली. मुनींचे मन विचलित झाले. मंजुघोषा त्यांच्या जवळ आली व ती त्यांना आलिंगन देऊ लागली. मेधावी मुनीही तिच्या सहवासात रमले. कामवश अवस्थेत बरीच वर्षे गेली. सत्तावन वर्षे गेली तेव्हा मुनींना आपली तपश्चर्या भंग पावली याचा खेद झाला. मेधावीमुनींनी त्या अप्सरेस शाप दिला; 'तू पिशाचिनी हो.' अप्सरेने विनंती केली, 'विप्रवर, आपल्यासारख्या सत्पुरुषांचा सहवास लाभला. माझ्यावर कृपा करावी.' त्यावर मुनी म्हणाले, 'मी तरी काय करू ? तू माझी तपस्या भंग केलीस. चैत्र वद्यात जी एकादशी येते ती 'पापमोचनी' असते. तू ते व्रत कर. म्हणजे पिशाचतेच्या वेषापासून मुक्त होशील.' मेधावींचे पिताजी च्यवनमुनी यांनीही मेधावींना हेच व्रत करण्याचा उपदेश केला. पापमोचनी एकादशीचे व्रत करून मुनींचे पातक संपले.

अप्सरा दिव्यरूपधारिणी झाली.

चैत्रातील शुक्ल एकादशी 'कामदा' या नावाने प्रसिद्ध आहे. प्राचीन काळी नागपूर नावाचे एक नगर होते. त्या नगरात पुंडरीक नावाचा एक भयंकर नाग निवास करीत होता. गंधर्व, किन्नर, अप्सरा त्याची सेवा करीत. ललित नावाचा एक गंधर्व व ललिता नावाची एक अप्सरा दोघेही एकमेकास जीव लावणारे होते. एके दिवशी नागराज पुंडरीकाच्या राजसभेत ललितचे गाणे सुरू होते. त्याच्याजवळ त्याची प्रिया ललिता नव्हती. गाता गाता ललितला ललिताचे स्मरण झाले. त्याच्या गायनात विक्षेप आला. नागराजाने रागावून ललितला शाप दिला, 'दुर्बुद्धे, माझ्या समोर गाताना तू पत्नीचं स्मरण केलंस ? तू राक्षस होशील.'

गंधर्व राक्षस झाला. त्याचे मुख भयंकर झाले. डोळे विकराल झाले. तो आपल्या कर्माचे फळ भोगीत राहिला. ललिताही दुःखीकष्टी होऊन वनात त्याच्या मागे हिंडायची. वनात तिची व एका मुनीची गाठ पडली. ती त्यांना प्रणाम करून म्हणाली, 'महामुने, वीरधन्वा नावाच्या एका गंधर्वाची मी कन्या. माझं नाव ललिता. माझा स्वामी राक्षस बनला आहे. त्याचा तो भाव सुटावा म्हणून मी काय करावं ?'

'भद्रे, या चैत्रात शुक्लपक्षात एकादशी येत आहे. तिला 'कामदा' म्हणतात. तू ते व्रत करून पुण्य पतीला दे. त्याचा दोष दूर होईल.' ललिताने एकादशीचे व्रत केले. ललितचा दोष दूर झाला. त्याचा राक्षसभाव नष्ट झाला. दोघे पतिपत्नी मोठ्या आनंदाने राहू लागले.

भगवान श्रीकृष्णांनी युधिष्ठिरास 'वरूथिनी' व 'मोहिनी' या दोन एकादशीव्रतांचा महिमाही सांगितला. वैशाख कृष्ण पक्षातील एकादशी 'वरूथिनी' या नावाने प्रसिद्ध आहे. या व्रताच्या आचरणानें मांधाता, धुंधुमार इत्यादी राजांना स्वर्गाची प्राप्ती झाली. वैशाख मासातील शुक्लपक्षातील एकादशीस 'मोहिनी' म्हणतात. सरस्वती नदीच्या तटावर भद्रावती नावाचे एक नगर आहे. तेथील राजाचे नाव धृतिमान. तेथेच धनपाल नावाचा एक श्रीमंत धनिक राहात होता. तो

शांत व पुण्यकर्मात व्यग्र होता. सुमना, द्युतिमान, मेधावी, सुकृत, धृष्टबुद्धी हे त्याचे पाच पुत्र होत. पाचवा धृष्टबुद्धी पापांत गढला होता. नाना नादांत तो पित्याचे धन नष्ट करीत राही. पित्यानें एकदा त्याला घरातून बाहेर काढले. तो भटकत भटकत कौंडिण्यमुनींच्या आश्रमात आला. मुनींनी त्याला या मोहिनी एकादशीचे व्रत सांगितले. या व्रताचे आचरण करून तो वैश्यपुत्र निष्पाप झाला. विष्णुधामासही गेला.

अशीच एकादशीमाहात्म्ये पद्मपुराणानें आणखीही सांगितली आहेत. ज्येष्ठ मासातील 'अपरा' व 'निर्जला', आषाढ मासातील 'योगिनी व 'शयनी,' श्रावण मासातील 'कामिका' व 'पुत्रदा', भाद्रपदातील 'अजा' व 'पद्मा', आश्विन मासातील 'इंदिरा' व 'पापांकुशा', कार्तिकातील 'रमा' व 'बोधिनी', पुरुषोत्तम मासातील 'कमला' व 'कामदा'; अशा एकादशींचे माहात्म्य त्या त्या कथेसह आले आहे. चातुर्मास्यव्रताचा विधी, गोपीचंदनाचे माहात्म्य, वैष्णवांचा महिमा, श्रावण द्वादशीव्रतविधी, नामसंकीर्तनाचा महिमा व श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्र; इत्यादी विषय पद्मपुराणात आले आहेत. श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्र पूर्णपणानें शेवटी दिलेले आहे.

## भक्तप्रवर पुंडरीकाचे आख्यान

गंडकी नदीचे माहात्म्य, और्ध्वदेहिकस्तोत्र, ऋषिपंचमीव्रतकथा, अपामार्जन नावाचे स्तोत्र, इत्यादी महत्त्वाच्या विषयांनंतर पद्मपुराणाच्या उत्तरखंडात श्रीविष्णूचा महिमा सांगणारी भक्तप्रवर पुंडरीकाची कथा आली आहे. श्रीविष्णूंचा महिमा प्रभावाने प्रकट व्हावा म्हणूनच ही कथा आलेली आहे. भीष्मांनी हे आख्यान युधिष्ठिरास सांगितले आहे.

पुंडरीक नावाचा एक बुद्धिमान व वेदविद्यासंपन्न ब्राह्मण होता. तो जितेंद्रिय, क्रोधजयी, संध्योपासनात तत्पर, शास्त्र जाणणारा होता. भगवान विष्णूंच्या ध्यानात रमून जायचा. तो मातापित्यांना पूज्य मानायचा. सर्वांनाच तो ममत्वाने वागवायचा. त्याला एकदा वाटले, रूप, यौवन, आयुष्य, धनसंग्रह, हे सर्व अनित्य आहे. त्याने या विचाराने

पृथ्वीवर भ्रमण करायला सुरुवात केली. तो फिरत फिरत शालग्राम-तीर्थावर आला. त्याने तेथील देवहृद नावाच्या तीर्थात स्नान केले. ध्यानयोगात गोडी लागल्याने त्याने तेथेच आपला आश्रम बनविला. शाक, मूल, फल खाऊन त्याने भगवंतांची आराधना केली.

एकदा देवर्षी नारद पुंडरीकास भेटण्यासाठी आले. त्याने अभ्यागताचे स्वागत करून विचारले, 'आपण कोण आहात? कोठून या आश्रमात आलात?' त्यावर नारद म्हणाले, 'मी नारद. तुम्हांस पाहण्याच्या जिज्ञासेनं आलो.' पुंडरीक म्हणाला, 'देवर्षे, आपल्या दर्शनानं मी धन्य झालो आहे. नारदा, मी आपला भक्त आहे. मजवर कृपा करावी. मला उपदेश करावा.'

नारदांनी त्याला ज्ञानाचा उपदेश केला. त्यांनी नाना प्रकारचे संदर्भ देऊन पुंडरीकास म्हटले, 'तुम्ही श्रीनारायणांची आराधना करावी. तोच पुरुषोत्तम आपली माता आहे. आपला पिता आहे. 'ॐ नमो नारायणाय' हा मंत्रही त्यांनी पुंडरीकास दिला. क्षत्रबंधू राजा, अंबरीष, अनेक ऋषी, महर्षी इत्यादींनी याच नारायणांची आराधना केली होती म्हणून त्यांनी सांगितले. नारद अंतर्धान पावल्यावर पुंडरीकाने 'ॐ नमो नारायणाय' या अष्टाक्षरमंत्राचा जप केला. त्या शालग्रामतीर्थात तो एकटाच हृदयस्थ नारायणांचे ध्यान करीत होता. एकदा स्वतः भगवान जगन्नाथ त्याच्या पुढे प्रकट झाले. हातांत शंख, चक्र, गदा, पद्म शोभत होते. तेजोमय आकृती, कमलाप्रमाणे मोठे डोळे, चंद्रम्याप्रमाणे कांतिमान मुख, कानांत कुंडले, गळ्यात हार, बाहूंवर भुजबंद, वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह, शरीरावर पीतांबर, हे नारायणांचे देखणे रूप पाहून पुंडरीकही संतुष्ट झाला. त्याने त्यांची मनोभावे स्तुती केली. पुंडरीकाच्या आराधनेने तृप्त झालेले भगवान म्हणाले,

'बेटा पुंडरीक, तुझं कल्याण असो. मी तुझ्यावर प्रसन्न आहे. कोणताही एक वर माग. मी तुझ्या मनाप्रमाणं अवश्य देईन.'

'प्रभो, ज्यात माझं हित आहे असंच मला द्यावं.'

एवढ्यात आकाशात दुंदुभी वाजू लागल्या. फुलांची वृष्टी झाली.

सिद्ध, गंधर्व, किन्नर यांचे गायन सुरू झाले. देवदेव जगदीश्वराने पुंडरीकास आपल्याबरोबर आपल्या धामास नेले.

## मासमाहात्म्यांतून विविध व्रते

विविध मास, त्यांतील उत्सव, सण, व्रते, पूजाविधी इत्यादीसंबंधी सविस्तर माहिती पद्मपुराण आचारासंबंधी नियम घालून देताना देते. चैत्र, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ या तीन महिन्यांतील उत्सवविधी, श्रीहरींच्या पूजेचे विधान इत्यादी माहिती अनेक कथांच्या माध्यमातून आली आहे. चैत्रातील एकादशीस भगवानांना झूल्यावर म्हणजे झोपाळ्यावर बसवून दोलोत्सव करावा असे सांगितले आहे. 'ॐ दोलारूढाय विद्महे माधवाय च धीमहि । तन्नो देव: प्रचोदयात्'– झोपाळ्यावर बसलेले भगवान आम्ही ज्ञानासाठी समजावून घेऊ. त्या भगवान विष्णूंनी आम्हांस तशी बुद्धी द्यावी– 'माधवाय नम:' 'गोविंदाय नम:' 'श्रीकंठाय नम:' या मंत्रांनी माधवांची पूजा करावी. जेथे दोलोत्सव होतो तेथे देव, गंधर्व, किन्नर, ऋषी इत्यादी उपस्थित असतात. 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' या मंत्राने भगवानांची षोडशोपचारांनी विधिवत पूजा करावी. नारळ, केळी यांनी, जलाने भगवानांना अर्घ्य देत म्हणावे,

**देवदेव जगन्नाथ शंखचक्रगदाधर ।**
**अर्घ्यं गृहाण मे देव कृपां कुरु ममोपरि ।।**

'देवांच्या देवा, जगाच्या स्वामी, शंख चक्र, गदा धारण करणाऱ्या दिव्यस्वरूप नारायणा, हा माझा अर्घ्य स्वीकारून माझ्यावर कृपा करावी.'

वैशाख पौर्णिमेस भगवानांची पूजा जलात करावी. त्यांची लीलाकथा गावी, ऐकावी. 'देवेश्वरा, आपण या जलात शयन करावं' अशी प्रार्थना करावी. ज्येष्ठ व आषाढ महिन्यांत भगवानांचे पूजन तुलसीदलांनी करावे. याही मासात जलस्थित भगवानांची पूजा करावी. 'ॐ ऱ्हां ऱ्हीं रामाय नम:' 'ॐ क्लीं कृष्णाय गोविंदाय गोपीजनवल्लभाय नम:' इत्यादी मंत्रांनी जलास अभिमंत्रित करून खालील

मंत्राने अर्घ्य द्यावा.

देवदेव महाभाग श्रीवत्सकृतलाञ्छन ।
महादेव नमस्तेऽस्तु नमस्ते विश्वभावन ।।
अर्घ्यं गृहाण भो देव मुक्ति मे देहि सर्वदा ।

'देवदेवा, महाभागा, श्रीवत्सचिन्हानं युक्त असलेल्या देवा, विश्वास उत्पन्न करणाऱ्या भगवान नारायणा, माझा अर्घ्य ग्रहण करावा. मला मोक्ष सदा द्यावा.'

श्रावण मासात विविध फुलांनी परमेश्वराची पूजा कशी करावी हे विस्ताराने आले आहे. कलशातील जलाने भगवानांना 'क्लीं कृष्णाय' या मंत्रांनी पवित्र करण्यासाठी प्रोक्षण करावे. गंध, धूप, दीप, नैवेद्य, तांबूल, आदींनी त्यांची पूजा करावी. भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य हे चार प्रकारचे नैवेद्य दाखवावेत. गुरूची पूजा भक्तिपूर्वक करावी. अग्नीला पूर्णाहुती देऊन म्हणावे,

मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं तु केशव
यत्पूजितं मया सम्यक् सम्पूर्णं यातु मे ध्रुवम् ।।

'केशवा, मी मंत्र, क्रिया, भक्ती यांच्या शिवाय केलेलं हे पूजन निश्चयानं पूर्ण होईल.' पार्वतीने विचारल्यावरून महादेवांनी कोणत्या मासात कोणत्या फुलांनी भगवानांची पूजा करावी हेही विस्ताराने सांगितले आहे. चैत्रात चंपा, चमेली, दवण, वरुण वृक्षाचे फूल, कमल यांनी श्रीहरींची पूजा करावी. वैशाखात केतकी, ज्येष्ठात अनेक प्रकारची फुले, आषाढात कण्हेर, कमल, तुलसी, अशोक यांनी विष्णूंची नित्य पूजा करावी. श्रावणात अलसी, दूर्वादल यांनी भगवानांची पूजा करावी. भाद्रपदात चंपा, श्वेत पुष्प, रक्तसिंदूरक, कल्हार पुष्पांनी पूजन करावे. आश्विनात जुई, चमेली, कमल व कार्तिकात विविध पुष्पे वाहून माधवांची पूजा करावी. तिल व तिलाची फुले यांनी पूजा केल्यास अक्षय फल मिळते. मार्गशीर्षात दिव्य फुले, पौषात तुलसीदल, माघात विविध प्रकारची पुष्पे, फाल्गुनात नवीन सर्व प्रकारची फुले घेऊन भगवंतांची पूजा करावी.

कार्तिकातील गुणवतीचे व्रत, शंखासुराचा वध करून भगवानांनी

केलेला वेदांचा उद्धार, तीर्थराजाचा उत्कर्ष, कार्तिकमासातील स्नानविधी व पूजापद्धती, कार्तिकातील व्रते, त्यांचे नियम, त्यांचे उद्यापनविधी; इत्यादींचेही सविस्तर वर्णन आले आहे. याच संदर्भात धर्मदत्त ब्राह्मणाची कथा, राजा चोल व विष्णुदासकथा, धनेश्वर ब्राह्मणाची कथा, आपत्तिकालात कोणकोणत्या व्रतांचा निर्वाह कार्तिकात करावा, या महिन्यात कोणते नियम करावेत, त्यांचे पालन कसे करावे, इत्यादींची सविस्तर निवेदनकथा पद्मपुराणात आली आहे. माघस्नानाचा महिमा, शूकरक्षेत्राचे माहात्म्य, मासोपवासव्रतविधान, शालग्रामशिलापूजनमाहात्म्य, भगवत्पूजन,दीपदान, यमतर्पण, दीपावली, गोवर्धनपूजा, यमद्वितीया; इत्यादी सर्व उत्सव, सण व व्रतादींचे वर्णन कार्तिकाच्या संदर्भात आले आहे. गोवर्धनाची पूजा करून प्रार्थना करावी,

गोवर्धन धराधार गोकुलत्राणकारक ।
विष्णुबाहुकृतोच्छ्राय गवां कोटिप्रदोभव ।।
या लक्ष्मीर्लोकपालानां धेनुरूपेण संस्थिता ।
घृतं वहति यज्ञार्थे मम पापं व्यपोहतु ।
अग्रतः सन्तु मे गावो गावो मे सन्तु पृष्ठतः ।
गावो मे हृदये सन्तु गवां मध्ये वसाम्यहम् ।।

'पृथ्वीला धारण करणाऱ्या गोवर्धन पर्वता, आपण गोकुळाचं रक्षण केलं आहे. भगवान श्रीकृष्णांनी आपणांस आपल्या हातावर उचलून धरलं होतं. आपण मला कोटी कोटी गायी प्रदान कराव्यात. लोकपालांची जी लक्ष्मी धेनुरूपात स्थित आहे, जी यज्ञासाठी तूप देते, ती माझं पाप दूर करो. माझ्या पुढं गायी आहेत. माझ्या मागं गायी आहेत. माझ्या हृदयात गायींचा निवास आहे. मीही गायींच्या मध्येच निवास करीन.'

प्रबोधिनी एकादशी, त्या दिवशी करायचे व्रत, रात्रीचे जागरण, भीष्मपंचकव्रत, भक्तितत्त्वाची मीमांसा, इत्यादी विषयांचे महत्त्व पद्मपुराणाने विशेष रीतीने सांगितले आहे.

आचारधर्माची सर्वोत्कृष्ट उदाहरणे म्हणून निवेदनाच्या ओघात पद्मपुराणात अनेक कथा, अनेक आख्यानें, अनेक माहात्म्ये यांचे निवेदन

आले आहे. शरभास देवल मुनींनी राजा दिलीपाची कथा ऐकविली आहे. नंदिनीच्या सेवेपासून राजास पुत्राची प्राप्ती कशी झाली याची कथा विस्ताराने आलेली आहे. शरभ वैश्यास देवीच्या आराधनेने पुत्र कसा झाला, माघस्नानविधीने विद्याधराची कुरूपता कशी दूर झाली, मृगशृंग मुनींना भगवानांपासून करप्राप्ती कशी झाली, त्यांनी माघस्नानाच्या पुण्याने एका हत्तीचा उद्धार कसा केला, मेलेल्या कन्यांना जीवदान कसे मिळाले, त्यांनी वर्णन केलेले यमलोकाचे अद्भुत वर्णन, मृगशृंगाचा विवाह, त्याचा गृहस्थधर्म, दिलीपासाठी वसिष्ठांनी केलेले पतिव्रता स्त्रियांच्या लक्षणांचे व सदाचाराचे वर्णन, मृगशृंगमुनीच्या पुत्राची, मृकंडूची काशीयात्रा, काशीचे माहात्म्य, मार्कंडेयांची शिवाची आराधना, त्यांना अमरत्वाची प्राप्ती, मृत्युंजयस्तोत्र, माघस्नानाचे नियम, प्रमुख तीर्थे, माघस्नानाने सुव्रतास झालेली दिव्य लोकाची प्राप्ती, भगवान विष्णूंचा महिमा, त्यांच्या भक्तीचे भेद, सनातन मोक्षधर्म, मंत्रदीक्षा, एकादशीमाहात्म्य, श्रीविष्णूंच्या पूजनाचा विधी, वैष्णवांचा आचार, श्रीरामाच्या एकशेआठ नामांचे माहात्म्य, तीन देवांत श्रीविष्णूंची श्रेष्ठता; इत्यादी शेकडो विषयांनी व कथांनी पद्मपुराण समृद्ध बनले आहे.

भगवान शिव व पार्वती यांच्या संवादांतून श्रीरामांच्या एकशेआठ नामांचा महत्त्वाचा भाग शेवटी शेवटी आला आहे. पार्वती विष्णुसहस्रनामांचा पाठ करीत होती. महादेव तिला म्हणाले, ‘ राम राम जप करताना मी रामात रममाण होतो. रामनाम संपूर्ण सहस्रनामाप्रमाणे आहे. ’ असे सांगून महादेवांनी तिला श्रीरामांची एकशेआठ नावे सांगितली. त्यांतील काही प्रमुख अशी आहेत.

**श्रीराम, रामचंद्र, रामभद्र, शाश्वत, राजीवलोचन, जानकीवल्लभ, जनार्दन, सत्यवाक्, कौसलेय, खरध्वंसी, कोदंडखंडन, वेदान्तपार, त्रिमूर्ती, त्रिविक्रम, त्रिलोकात्मा, अहल्यापावन, जगद्गुरू, महाभाग,**

अशी गोपनीयांतील गोपनीय एकशेआठ रामनामे पार्वतीस शंकरांनी निवेदन केली. भक्तिभावाने या नामांचा पाठ केल्याने जल

स्थल बनते, शत्रू मित्र होतो. राजा दास होतो. जळती आग शांत होते. सर्व प्राणी अनुकूल होतात. चंचल लक्ष्मी स्थिर होते. ग्रह अनुग्रह करतात. सर्व उपद्रव शांत होतात. तीनही लोकांतील प्राणी वश होतात. या नामोच्चाराने दूर्वादलसमान श्यामसुंदर, पीतांवरधारी भगवान श्रीरामचंद्र यांची अलोट कृपा होते.

**रामाय रामभद्राय रामचंद्राय वेधसे ।**
**रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ।**

अशा मंत्राने राम, रामभद्र, रामचंद्र, वेधा, रघुनाथ, नाथ, सीतापतीस वारंवार नमस्कार करावा. या मंत्राचा जप केल्यास श्रीविष्णूंचे सायुज्य प्राप्त होते.

## श्रीप्रभूंची वाङमयी मूर्ती - गीता

पद्मपुराणाचा आणखी एक विशेष असा की, उत्तरखंडात भगवद्‌गीतेच्या अठराही अध्यायांचे माहात्म्य महादेवांनी पार्वतीला विविध कथांच्या संदर्भात ऐकविले आहे. स्वतः भगवानांनी लक्ष्मीस सांगितले, 'देवी, गीतेत मी कसा आहे ? क्रमशः पाच अध्याय म्हणजे माझी मुखं जाणावीस. दहा अध्यायांना दहा भुजा समज. एका अध्यायास उदर, दोन अध्यायांना दोनही चरण समजावेस.' अशी ही अठरा अध्यायांची गीता ही श्रीकृष्णांची वाङ्मयी मूर्तीच होय.

**श्रुणु सुश्रोणि वक्ष्यामि गीतासु स्थितिमात्मनः ।**
**वक्त्राणि पञ्च जानीहि पञ्चाध्यायाननुक्रमात् ।।**
**दशाध्यायान्भुजांश्चैकमुदरं द्वौ पदाम्बुजे ।**
**एवमष्टादशाध्यायी वाङमयी मूर्तिरैश्वरी ।**

गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या संदर्भात महादेवांनी पार्वतीला एकेक कथा निवेदन केली आहे. सुशर्मा, देवशर्मा, जड ब्राह्मण व त्याचा पुत्र, भरत नावाचा एक योगनिष्ठ महात्मा, पिंगल ब्राह्मण व त्याची स्त्री अरुणा, प्रतिष्ठानपुराचा राजा जानश्रुती व महात्मा रैक्व, शंकुकर्ण ब्राह्मण व त्याचे पुत्र, माधव ब्राह्मण, चंद्रशर्मा राजा, मेघंकर नगरीचा ब्राह्मण सुनंद, कोल्हापूरच्या महालक्ष्मीची आराधना करणारा राजकुमार,

हरिदीक्षित नावाचा श्रोत्रिय ब्राह्मण व त्याची दुराचारी स्त्री, गौड-देशाचा कृपाणनरसिंह नावाचा राजा, खड्गबाहूच्या पुत्राचा नोकर दुःशासन; इत्यादी अनेकांच्या कथा मोठ्या रोचक असून प्रत्येकास गीतेचा तो तो पाठ वाचून शांती मिळाली आहे. परमपदाची प्राप्ती झाली आहे.

गीतेच्या अठराव्या अध्यायाचे पाच श्लोक तरी वाचावेत, या अध्यायाचा पाठ करावा, असे पद्मपुराण सांगते. गोदावरीच्या तटावर जाऊन इंद्राने एका वेदपारंगताकडून अठराव्या अध्यायाचे श्रवण केले. हा अध्याय म्हणजे परमतत्त्वच आहे. संपूर्ण गीताच पापनाशक. असल्या या तत्त्वपूर्ण ग्रंथांचे वाचन, मनन महत्त्वाचे आहे. जो पुरुष श्रद्धापूर्वक या ग्रंथाचे वाचन, श्रवण करतो, त्याला सर्व यज्ञांचे फल मिळते. शेवटी तो विष्णुलोकात जाऊन सायुज्यसुखाचा अनुभव घेतो. काही अध्यायांच्या कथा येथे देता येण्यासारख्या आहेत.

## देवशर्म्यास परमपदप्राप्ती

दक्षिण दिशेस वेदवेत्ते ब्राह्मणांच्या पुरंदरपुर नावाच्या नगरात देवशर्मा नावाचा एक विद्वान ब्राह्मण राहात होता. तो अतिथींचा सत्कार करी. तो स्वाध्यायशील, वेदशास्त्रज्ञ, यज्ञांचे अनुष्ठान जाणणारा ब्राह्मणप्रेमी होता त्याने तपस्व्यांची सेवा केली होती. असे बरेच आयुष्य गेल्यावर एकदा त्याच्यापुढे एक त्यागी महात्मा प्रकट झाला. तो पूर्ण अनुभवी, आकांक्षारहित, शांतचित्त होता. निरंतर परमात्म्यास चित्तामध्ये आठवून तो आनंदात मग्न असे. देवशर्म्याने त्याचे मनापासून स्वागत केले. त्याला त्याने विचारले,

'महात्मन्, मला शांतमयी स्थिती कशी प्राप्त होईल ?'

तेव्हा त्या आत्मानुभवी संतपुरुषाने सौपुर गावाचा निवासी मित्रवान याचा परिचय करून दिला. हा मित्रवान बकऱ्या चारीत असे. हा उपदेश देईल, असे समजल्यावरून देवशर्मा महात्म्याच्या चरणांना वंदन करून समृद्धशाली सौपुरनगरात पोचला. त्याच्या उत्तरेस एक विशाल वन होते. त्या वनात एका नदीच्या किनाऱ्यावरील एका शिला-

खंडावर मित्रवान बसला होता. त्याचे नेत्र आनंदाच्या अतिरेकाने निश्चल असून तो अपलक दृष्टीने पाहात होता. त्याच्या भोवतीच्या वनातील प्राणी व जीवजंतू आपसांतील वैर विसरून मित्रभावाने एकत्र नांदत होते. त्या उद्यानात मंदमंद वायू वाहात होता. मृगांचा कळप शांतवृत्तीने वसला होता. मित्रवान शांतवृत्तीने बसून आपल्या दयापूर्ण दृष्टीतून सर्व पृथ्वीवर जणू अमृताचा वर्षाव करीत होता. त्याला या रूपात पाहून देवशर्मा संतुष्ट झाला. उत्सुक बनून मोठ्या विनयवृत्तीने तो त्या मित्रवानापाशी गेला. मित्रवानाने किंचित मस्तक झुकवून देवशर्म्याचे स्वागत केले.

देवशर्मा अनन्य चित्ताने मित्रवानापाशी बसला. जेव्हा मित्रवानाचे ध्यान संपले तेव्हा देवशर्मा त्याला म्हणाला, ‘ महाभाग, मी आत्म्याचं ज्ञान प्राप्त करू इच्छितो. माझा हा मनोरथ जाणून आपण मला असा उपदेश करावा की, ज्यामुळं मला सिद्धीची प्राप्ती होईल.’ देवशर्म्याची ही जिज्ञासा जाणून मित्रवान एक क्षणभर विचार करीत राहिला. त्यानंतर तो म्हणाला, ‘ विद्वान पुरुषा, एका समयाची हकीगत आहे. मी वनात बकऱ्यांचं रक्षण करीत होतो. एवढ्यात एक भयंकर व्याघ्र सर्वांना ग्रासून टाकणारा मी पाहिला. मी मृत्यूच्या भयानं घाबरू लागलो. त्या वाघाला भिऊन मी बकऱ्यांच्या कळपास पुढं करून तेथून पळून गेलो. त्या कळपातील एक बकरी न भिता त्या वाघासमोर गेली. तिला पाहून वाघाच्या मनातील द्वेषभावना कमी झाली होती. त्या वाघाला बकरी म्हणाली,

‘ व्याघ्रा, आज तुला अभीष्ट भोजन मिळणार आहे. माझ्या शरीरातील मांस तू आज मोठ्या प्रेमानं खावंस. तू इतका वेळ असा स्तब्ध उभा का आहेस ? मला खाऊन टाकण्याचा विचार तू का करीत नाहीस ?’

‘ बकरी, या स्थानात आल्यापासून माझ्या मनातील द्वेषभाव निघून गेला आहे. माझी तहानभूक संपली आहे. म्हणून तू इथं आलीस तरी मी तुला खाणार नाही.’

‘ आणि व्याघ्रा, न जाणे, मी तरी इतकी निर्भय कशी झाले ?

याला एखादं कारण असावं. तुला माहीत असेल तर तू ते मला सांग.'

'मी पण काही जाणीत नाही. चल. तो दूर एक महापुरुष दिसतो आहे, त्याला विचारू.'

असे म्हणून ते दोघे तेथून निघून गेले. त्या दोघांच्या मनातील ते परिवर्तन पाहून मित्रवानाला मोठे आश्चर्य वाटले. एवढ्यात त्या वाघाने व बकरीने येऊन त्यालाच प्रश्न केला. तेथेच वृक्षाच्या शाखेवर एक वानरराज होता. त्या वाघास व बकरीस एकत्र पाहून मित्रवानाने त्या वानरराजास विचारल्यावर तो म्हणाला,

'अजापाल, ऐक. या बाबतीत एक प्राचीन कथा ऐकण्यासारखी आहे. या वनाच्या आत जे समोर एक मंदिर दिसते आहे ना, त्याकडं पाहा. यात ब्रह्मदेवांनी स्थापन केलेलं एक शिवलिंग आहे. पूर्वी इथंच सुकर्मा नावाचा एक बुद्धिमान महात्मा राहात होता. तपस्येत मग्न होऊन तो या मंदिरात उपासना करी. वनातील फुलांचा संग्रह करून नदीच्या पाण्यानं भगवान शंकरांना स्नान घालून तो त्या फुलांनी त्यांची नित्य पूजा करी. अशा प्रकारची आराधना करून सुकर्मा इथं राहात होता. काही दिवसांनंतर त्याच्या जवळ एक अतिथी आला. सुकर्म्यानं त्याचा सत्कार करून त्याला भोजनासाठी काही फळं अर्पण करून म्हटलं, 'विद्वान्, मी केवळ तत्त्वज्ञानाच्या इच्छेनं भगवान शंकराची आराधना करतोय. आज त्या आराधनेचं फल परिपक्व होऊन मला मिळालं आहे. कारण आज आपल्यासारख्या महापुरुषानं माझ्यावर अनुग्रह केला आहे.'

'सुकर्म्याचे हे बोल ऐकून त्या महात्म्या अतिथीस मोठी प्रसन्नता वाटली. त्यानं एका शिलाखंडावर गीतेचा दुसरा अध्याय लिहिला व त्या ब्राह्मणास तो पाठ अभ्यासासाठी देताना तो म्हणाला, 'ब्रह्मन्, या पाठामुळं तुझा आत्मज्ञानासंबंधीचा मनोरथ पूर्ण होईल.' इतकं म्हणून तो बुद्धिमान महात्मा अंतर्धान पावला. सुकर्मा विस्मित झाला. व त्यानं त्या गीतेच्या दुसऱ्या अध्यायाचा पाठ सुरू केला. त्यानं त्या अध्यायाचा अभ्यास केला. त्यानंतर दीर्घकाळानं त्याचं अंतःकरण शुद्ध बनून त्याला आत्मज्ञानाची प्राप्ती झाली. तो त्यानंतर जिथं जिथं गेला

तिथं तिथं हे तपोवन शांत झालं. यातील शीतोष्णाची भावना संपली. येथील रागद्वेष संपले. इतकेच नव्हे तर येथल्या स्थानावर तहानभुकेचे कष्टही होत नाहीत. इथं भयाचा सर्वत्र अभाव असतो. हे सर्व त्या द्वितीय अध्यायाच्या पाठाचं, अध्ययनाचं फल आहे. त्या जप करणाऱ्या सुकर्मा ब्राह्मणाचा हा प्रभाव समजावा.'

वानरराज इतकी हकीगत सांगत असताना मित्रवानास नवल वाटले. तो त्या बकरीस व वाघास घेऊन त्या मंदिरात गेला. तेथील शिलाखंडावरील लिहिलेला गीतेचा दुसरा अध्याय त्याने पाहिला. तो त्याने वाचून पाहिला. त्याचा पाठ करून मित्रवानाने तपस्या केली. ही सर्व हकीगत सांगून मित्रवान देवशर्म्यास म्हणाला, ' भद्रपुरुषा, तूही या दुसऱ्या अध्यायाची आवृत्ती नेहमी कर. असं करशील तर मुक्ती तुझ्यापासून दूर नाही. ' मित्रवानाच्या या सांगण्यावरून देवशर्म्याने त्याचे पूजन केले व तो पुरंदरपुरास निघून गेला. त्याने दुसऱ्या अध्यायाचे मन:पूर्वक अध्ययन केले. देवालयात जाऊन त्याने पूर्वोक्त आत्मज्ञानी महात्म्याकडून गीतेच्या दुसऱ्या अध्यायाचे मर्म समजावून घेतले. शुद्ध अंत:करणाने देवशर्मा नित्य दुसऱ्या अध्यायाचा पाठ करू लागला. त्यामुळे त्याला योग्य समयास परमपदाची प्राप्ती झाली.

## शंकुकर्णास मुक्ती

पाटलीपुत्र नावाचे एक दुर्गम नगर होते. त्याचे गोपुर फारच उंच होते. त्या नगरात शंकुकर्ण या नावाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याने वैश्यवृत्तीचा आश्रय घेऊन खूपच धन मिळविले. पण तो कधी पितरांना तर्पण करायचा नाही, की कधी देवांचे पूजन करायचा नाही. तो नेहमी धनार्जनाच्या कामातच व्यग्र असायचा. एकदा त्या ब्राह्मणाने आपल्या चौथ्या विवाहासाठी आपले पुत्र व बांधव यांसहित यात्रा केली. मार्गात अर्ध्या रात्री तो झोपलेला असताना कोठून तरी एक सर्प आला व त्याने शंकुकर्णाच्या हाताचा चावा घेतला. सर्प चावताच शंकूची अवस्था भयंकर झाली. मणी, मंत्र, औषध यांनी त्याच्या शरीरास शांतता मिळाली नाही. थोड्याच वेळात त्याच्या शरीरातून प्राणपाखरू

उडून गेले.

फार काळानंतर तो सर्पयोनीत जन्मास आला. त्याचे चित्त धनाच्या वासनेतच होते. त्याने आपल्या पूर्वजन्मीचे स्मरण करून म्हटले, ' मी घराच्या बाहेर कोटयवधी धन गाडून, पुरून ठेवलं आहे, पुत्रांपासून लपवून ठेवलं आहे. त्याचं रक्षण मी स्वतःच करीन. ' सर्पयोनीने पीडित झालेल्या त्या पित्याने आपल्या पुत्रांच्या स्वप्नात जाऊन त्यांना आपला मनोदय कळविला. पुत्रांनी आपापसांत पडलेल्या स्वप्नाची चर्चा केली. त्यांतील मधला पुत्र कुदळ हातात घेऊन घरातून बाहेर पडला. जेथे त्याचा पिता सर्पयोनीत राहून निवास करीत होता तेथे तो पोचला. त्याला नीट स्थान सापडले नाही. तरी त्याने अंदाज करीत करीत एका स्थानाचा निश्चय केला व ते स्थान कुदळीने खोदून काढण्यास आरंभ केला. त्यातून एक मोठा भयानक सर्प बाहेर आला. तो रागाने म्हणाला,

' अरे मूढा, तू कोण आहेस ? कशासाठी आलास ? माझं हे स्थान तू कशासाठी खोदून काढतोस ? तुला कुणी पाठविलं ? '

' तात, मी आपला पुत्र आहे. माझं नाव शिव. रात्री स्वप्नात आपण सांगितलंत, त्यानुसार मी कुतूहलानं येथील सुवर्ण नेण्यासाठी आलो आहे. '

' तू जर माझा पुत्र असशील तर शीघ्र मला या योनीतून मुक्त कर. पूर्वजन्मात मिळवलेल्या धनासाठीच मी या सर्पयोनीत अडकून पडलो आहे. '

' पिताजी, आपली मुक्ती कशी होणार ? याचा उपाय मला सांगावा ना. मी रात्रीच एकटा उठून सर्व लोकांना सोडून इथं आलो आहे. '

' बेटा, गीतेच्या अमृतमय सातव्या अध्यायाचा पाठ कर. याशिवाय मला दुसऱ्या कोणत्याही मार्गानं मुक्ती मिळणार नाही. तीर्थ, दान, तप व यज्ञ यांनी मी मुक्त होणार नाही. केवळ गीतेचा सातवा अध्यायच प्राण्यांना जन्ममरणादी दुःखांपासून दूर करतो. पुत्रा, तू श्रद्धेनं गीतेच्या सातव्या अध्यायाचा पाठ करणाऱ्या ब्राह्मणास बोलाव

माझ्या श्राद्धदिनी तू त्याच्याकडून हा पाठ करवून त्याला श्रद्धापूर्वक भोजन घाल. यामुळे मला नक्कीच मुक्ती मिळेल. वत्सा, तू एखाद्या वेदविद्येत प्रवीण असणाऱ्या ब्राह्मणास बोलाव. आपल्या शक्तीनुसार त्याला दक्षिणा देऊन श्राद्ध पूर्ण कर.'

सर्पयोनीतील आपल्या पित्याचे हे वचन ऐकून सर्व पुत्रांनी त्यांच्या सांगण्यानुसार सर्व काही उत्तम रीतीने केले. शंकुकर्णाने सर्पयोनीचा त्याग करून दिव्यरूप धारण केले व ते धन आपल्या मुलांच्या स्वाधीन केले. त्यामुळे ते सदाचारी पुत्र फार आनंदित झाले. त्यांची वुद्धी धर्म-मय झाली. त्यांनी विहिरी निर्माण केल्या. तलाव खणले. देवमंदिरे निर्माण केली. अन्नशाला तयार केल्या. सातव्या अध्यायाचा जप करीत करीत त्यांनीही मोक्ष प्राप्त करून घेतला.

## अर्ध्या श्लोकाने परमगती

दक्षिणेत आमर्दकपुर नावाचे एक प्रसिद्ध नगर होते. तेथे भाव-शर्मा नावाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याने एका वेश्येस पत्नी म्हणून राखले होते. तो मांस खात असे. दारू पीत असे. साधूंचे धन चोरी. परस्त्रीशी व्यभिचारही तो करीत असे. त्याला शिकार खेळण्याची मोठीच आवड होती. तो मोठ्या भयानक वृत्तीचा होता. एके दिवशी मदिरा पिणाऱ्यांचा एक गट आला. त्यात मिसळून भावशर्म्याने खूप ताडी घेतली. गळयात अडकेपर्यंत त्याने मद्य घेतले. त्याला त्याचे अजीर्ण झाले. तो पापात्मा मरण पावून फार मोठा ताडवृक्ष झाला. त्याच्या घनदाट व थंडगार छायेत बसून ब्रह्मराक्षसभाव प्राप्त झालेले कोणी पतिपत्नी राहत होते. त्यांच्या पूर्वजन्मीची घटना अशा प्रकारची होती.

एक कुशीबल नावाचा ब्राह्मण होता. तो वेदवेदांचे संपूर्ण अध्ययन केलेला होता. त्याच्या स्त्रीचे नाव कुमती होते. ती मोठ्या कुटिल वृत्तीची होती. तो ब्राह्मण विद्वान असूनही लोभवश होऊन आपल्या पत्नीसह प्रतिदिन म्हैस, गाय, घोडे आदींचे दान घ्यायचा. पण मिळालेल्या धनातील एक कवडीही तो दुसऱ्या ब्राह्मणांना देत नसे. या

पतिपत्नींना कालवश मृत्यू प्राप्त झाला व ते ब्रह्मराक्षस बनले. तहान व भूक यांनी पीडित होऊन ते पृथ्वीवर फिरत राहिले. फिरता फिरता ते त्या ताडवृक्षाखाली आले व तेथे विश्रांती घेऊ लागले. यावेळी पत्नीने एकदा पतीस विचारले,

'नाथ, आपणांस हे असं दुःख प्राप्त का झालं? आपली या राक्षसयोनीतून मुक्तता कशी होईल?'

'ब्रह्मविद्येचा उपदेश, अध्यात्मतत्त्वाचा विचार, कर्मविधींचं ज्ञान यांशिवाय या घोर संकटातून आपली मुक्तता होणार नाही.'

'पुरुषोत्तमा, हे ब्रह्म काय आहे? अध्यात्म काय आहे? कर्मविधी म्हणजे काय?'

पत्नीनें हे प्रश्न विचारताच एक चमत्कार घडला. 'किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम?' हे वाक्य पत्नीने उच्चारले. तो गीतेच्या आठव्या अध्यायातील एका श्लोकाचा अर्धा भाग होता. तो ऐकताच तो ताडवृक्ष एकदम भावशर्मा नावाच्या दिव्यस्वरूपाच्या ब्राह्मणात प्रकट झाला. त्याला त्वरित मुक्ती मिळून तो तेथून निघून गेला आणि त्या अर्ध्या श्लोकानेच त्या पतिपत्नींनाही मुक्ती मिळाली. आकाशातून आलेल्या एका दिव्य विमानात ते बसले व स्वर्गलोकास निघून गेले.

त्यानंतर त्या बुद्धिमान ब्राह्मण भावशर्म्याने आदरपूर्वक तो अर्धा श्लोक लिहून काढला व देवदेव जनार्दनाची आराधना करण्यासाठी तो मुक्तिदायिनी काशीपुरीस गेला. तेथे त्या बुद्धिमान ब्राह्मणाने मोठी तपस्या केली. त्यानंतर क्षीरसागराची कन्या भगवती लक्ष्मी जागी झाली. तिने हात जोडून जगत्पती जनार्दनास विचारले, 'नाथ, आपण असे एकाएकी झोप सोडून का उठलात?' जनार्दन देवीस म्हणाले,

'देवी, काशीपुरीत भागीरथीच्या तटावर एक बुद्धिमान ब्राह्मण भावशर्मा भक्तिरसानं परिपूर्ण होऊन कठोर तपस्या करीत आहे तो आपल्या इंद्रियांना राखून गीतेच्या अर्ध्या श्लोकाचा जप करीत आहे. मी त्याच्या तपस्येनं फारच संतुष्ट झालो आहे. त्याला अनुरूप असं फल द्यायला हवंय.'

यानंतर द्विजश्रेष्ठ भावशर्म्यास भगवान विष्णूंनी प्रसन्न होऊन

आत्यंतिक सुखदायक असे परमपद दिले. नरकयातनेत पडलेले त्याचे वंशजही परमगतीस जाऊन पोचले.

## बकऱ्यास परमगतीची प्राप्ती

नर्मदेच्या तटावर माहिष्मती नावाची एक नगरी होती. तेथे माधव नावाचा एक ब्राह्मण राहात होता. तो वेदवेदांगांचा ज्ञाता असून तत्त्वज्ञ होता. समयानुसार तो अतिथींचाही सत्कार करी. त्याने पुष्कळ धन मिळवून एका यज्ञाचे अनुष्ठान केले. त्या यज्ञात बळी देण्यासाठी एक बकरा आणला होता. त्याच्या शरीराची पूजा केली गेली. तेव्हा सर्वांना आश्चर्यात टाकून तो बकरा हसून उच्च स्वरांनी म्हणाला, 'ब्रह्मन, अशा अनेक यज्ञांचा लाभ काय ? याचं फल तर नष्ट होणारं आहे. जन्म, जरा, मृत्यू यांचंच हे यज्ञ एक कारण आहे. हे सर्व करूनही ही माझी दशा तुम्ही पाहा ना.'

बकऱ्याचे हे शब्द ऐकताच यज्ञमंडपातील सर्व लोक विस्मित झाले. तो यजमान ब्राह्मण अपलक नेत्रांनी त्या बकऱ्याकडे पाहून हात जोडून आदराने म्हणाला, 'आपण कोणत्या जातीचे ? आपला स्वभाव कसा आहे ? आचरण कसं आहे ? कोणत्या कर्मानं आपणांस ही बकऱ्याची योनी प्राप्त झाली ?'

'ब्रह्मन्, पूर्वजन्मी मी ब्राह्मणाच्या एका अत्यंत निर्मल कुळात उत्पन्न झालो होतो. समस्त यज्ञांचं अनुष्ठान करून राहाणारा मी एक वेदविद्येत प्रवीण असा होतो. एके दिवशी माझ्या पत्नीनं भगवती दुर्गाच्या भक्तीनं विनम्र होऊन आपल्या बालकाच्या रोगाची शांती व्हावी म्हणून बळी देण्यासाठी एका बकऱ्याची माझ्याजवळ मागणी केली. चंडिकेच्या मंदिरात जेव्हा तो बकरा मारला जाऊ लागला, तेव्हा त्याच्या मातेने मला शाप दिला, 'अरे ब्राह्मणा, नीचा, पाप्या, तू माझ्या पोराचा वध करू पाहातोस. म्हणून तूही बकऱ्याच्या योनीत जन्म पावशील.' द्विजश्रेष्ठा, तेव्हा मी मृत्यूनंतर या बकऱ्याच्या जन्मास आलो आहे. जरी मी या पशूच्या योनीत असलो तरी मला पूर्वजन्माचं ज्ञान चांगलं आहे. ब्रह्मन्, ऐकण्याची उत्कंठा असेल तर आणखी एक आश्चर्याची गोष्ट सांगतो.' बकऱ्याने आणखी एक कथा सांगितली,

कुरुक्षेत्र नावाच्या एका नगरात चंद्रशर्मा नावाचा एक सूर्यवंशी राजा राज्य करीत होता. एका समयास सूर्यग्रहणाचा अवसर प्राप्त झाला. राजाने मोठ्या श्रद्धेने कालपुरुषाच्या दानाची तयारी केली. त्याने एका वेदविद्यापारंगत ब्राह्मणास बोलविले. पुरोहितासह त्याने तीर्थाच्या पावन जलाने स्नान केले. तीर्थात स्नान केल्यानंतर त्याने प्रसन्नचित्त होऊन श्वेत चंदन लावले. व पुरोहिताचा हात पकडून तो मनुष्यांनी घेरलेल्या आपल्या स्थानावर परत आला. आल्यावर राजाने यथोचित विधी करून भक्तिपूर्वक वृत्तीने ब्राह्मणास कालपुरुषाचे दान केले.

तेव्हा कालपुरुषाच्या हृदयास चिरून त्यातून एक पापात्मा चांडाल प्रकट झाला. थोड्या वेळाने निंदा नावाची एक चांडालीही त्या कालपुरुषाच्या शरीरातून बाहेर पडली. या चांडालांच्या जोडीचे डोळे तांवडे लाल होते. त्यांनी त्या ब्राह्मणाच्या शरीरात घुसण्याचा बळाने प्रयत्न केला. ब्राह्मण मनातल्या मनात गीतेच्या नवव्या अध्यायाचा जप करीत होता. राजा गप्प उभा राहून हे सर्व कौतुक पाहात होता. ब्राह्मणाच्या अंत:करणात भगवान गोविंदांचा निवास होता. तो त्यांचेच ध्यान करू लागला. त्याने गीतेच्या नवव्या अध्यायाचे पाठ करून भगवानांचे चिंतन केले. गीताक्षराच्या रूपात प्रकट झालेल्या विष्णु-दूतांच्या भयाने ते दोनही चांडाल भिऊन पळून गेले. त्यांचा सारा प्रयत्न निष्फल झाला. हे सर्व पाहून राजाचे नेत्र आश्चर्याने चकित झाले. त्याने ब्राह्मणास विचारले,

'विप्रवर, या महाभयंकर आपत्तीस आपण दूर कसं केलं? आपण कोणत्या देवाचा, कोणता मंत्र जपत होता ? तो पुरुष कोण होता ? ती स्त्री कोण ? ती दोघे इथं उपस्थित का झाली ?'

'राजा, चांडालाचं रूप धारण करणारं पापच प्रकट झालं होतं. ती स्त्री निंदेची साक्षात मूर्ती होती. त्या वेळी मी गीतेचा नववा अध्याय म्हणत होतो. सारं संकट त्या अध्यायाच्या माहात्म्यानं दूर झालं. महीपते, मी नित्य गीतेच्या नवव्या अध्यायाचा पाठ करतो. त्यामुळं माझ्या सर्व आपत्ती नष्ट होतात.'

प. पु. उ २–१७

राजानेही त्या ब्राह्मणापासून गीतेचा नववा अध्याय समजावून घेतला. त्याने त्याचे अध्ययन केले. त्याला परमशांती प्राप्त झाली. वकऱ्याकडून हा सर्व वृत्तान्त ऐकून माधव ब्राह्मणाने त्यास सोडून दिले. गीतेच्या अभ्यासाने त्यालाही परमगतीची प्राप्ती झाली.

## बाराव्या अध्यायाचे सामर्थ्य

दक्षिण दिशेस कोल्हापूर नावाचे एक नगर आहे. ते सर्व प्रकारच्या सुखांचे आधार, सिद्धमहात्म्यांचे निवासस्थान, सिद्धीप्राप्तीचे क्षेत्र म्हणून त्याचा लौकिक मोठा होता. तेथे पराशक्ती भगवती लक्ष्मीचे प्रधान पीठ आहे. सर्व देव या पीठाची सेवा करतात. हे पुराणप्रसिद्ध तीर्थ भोग, मोक्ष देणारे असून तेथे कोटचवधी तीर्थे व शिवलिंगे आहेत. रुद्र-गया तेथेच आहे. एकदा त्या नगरात कोणी एक युवक राजकुमार आला. त्याच्या शरीराचा रंग गोरा होता. नेत्र सुंदर होते. ग्रीवा शंखाप्रमाणे, खांदे मोठे, छाती चांगली रुंद व हात लांब होते. नगरात प्रवेश करून त्याने सर्व महाल पाहिले, देवेश्वरी महालक्ष्मीचे दर्शन घेण्याची उत्कंठा त्याला होती. तो मणिकंठतीर्थास गेला. त्यानें तेथे स्नान करून पितरांना तर्पण केले. मंदिरात येऊन त्याने महामाया लक्ष्मीला प्रणाम केला व भक्तिपूर्वक अंतःकरणानें तो तिची स्तुती करू लागला.

'माते, तुझ्या हृदयात अपार दया भरलेली आहे. तू सर्व कामना पूर्ण करतेस. आपल्या कटाक्षानं सर्व जगताची तू निर्मिती करतेस. पालन, संहार करतेस. माते, तुझा जयजयकार असो. तुझ्या आधारानंच ब्रह्मदेव सृष्टीची रचना करतात. भगवान अच्युत पालन करतात. भगवान रुद्र संहार करतात. त्या संपन्न भगवतीचं मी आता भजन करतो.

'कमले, योगीजन तुझ्याच चरणकमलांचं चिंतन करतात. कमला-लये, तू आपल्या स्वाभाविक सत्तेनंच आमच्या सर्व इंद्रियगोचर विषयांना जाणतेस. तूचं कल्पनांचा समूह तथा संकल्प निर्माण करणाऱ्या मनासही उत्पन्न करतेस. इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती, ही सर्व तुझीच रूपं आहेत. तुझं स्वरूप निष्कल, निर्मल, नित्य, निराकार, निरंजन, अंतर-रहित, आतंकशून्य, आलंबहीन तथा निरामय आहे. तूच षट्चक्रांचं

भेदन करून अंत:करणाच्या बारा स्थानांवर विहार करतेस. अनाहत ध्वनी, बिंदू, नाद, कला, ही तुझीच रूपं आहेत. माते महालक्ष्मी, मी तुला प्रणाम करतो. माते, तू आपल्या मुखरूपी चंद्रम्यातून अमृतझरा प्रकट कर. तूच परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी वाणी आहेस. मी तुला नमस्कार करतो. देवी, तूच या जगाचं रक्षण करण्यासाठी नाना रूपं धारण करतेस. अंबिके, तूच ब्राह्मी, वैष्णवी, माहेश्वरी शक्ती आहेस. वाराही, महालक्ष्मी, नारसिंही, ऐन्द्री, कौमारी, चंडिका, लक्ष्मी, जगन्माता, सावित्री, चंद्रकला, रोहिणी; ही सर्व तुझीच रूपं आहेत. परमेश्वरी, भक्ताचे मनोरथ पूर्ण करणारी तू कल्पलता आहेस. माझ्यावर तू प्रसन्न व्हावंस.'

इतकी निष्ठेने प्रार्थना केल्यानंतर ती भगवती महालक्ष्मी साक्षात पकट झाली आणि त्या युवकास म्हणाली,

'राजकुमार, मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तू एक उत्तम वर माग.'

'माते, माझा पिता वृहद्रथ अश्वमेध नावाच्या एका महान यज्ञाचं अनुष्ठान करीत होता. पण दैवयोगानं तो रोगग्रस्त होऊन स्वर्गवासी झाला. याच वेळी यज्ञयूपाभोवती सर्व पृथ्वीची परिक्रमा करून आणलेला अश्व बांधलेला होता. पण कोणी तरी रात्री त्याची बंधनं सोडून त्याला मुक्त केलं. मी त्या अश्वाचा खूप शोध केला. तरी काही उपयोग नाही झाला. सर्व शोध घेणारे लोक निराश होऊन परत आले. तेव्हा मी ऋत्विजांची आज्ञा घेऊन तुला शरण आलो आहे. माते, तू प्रसन्न हो. माझा अश्व मला परत कसा मिळेल ते सांग. माझा यज्ञ पूर्ण व्हायला हवा. मी माझ्या पित्याचं ऋण फेडणार आहे.'

'राजकुमार, या मंदिराच्या दाराशी एक ब्राह्मण राहातो. लोकांत तो सिद्धसमाधी या नावानं प्रसिद्ध आहे. तो माझ्या आज्ञेनं तुझं काम पूर्ण करील.'

महालक्ष्मीच्या आज्ञेनुसार राजकुमार त्या सिद्धसमाधीच्या घरी गेला. त्याच्या चरणांना प्रणाम करून तो गप्पच उभा राहिला. तेव्हा तो ब्राह्मण म्हणाला,

'तुला माताजीनं पाठविलं आहे. ठीक आहे. पाहा. मी तुझं सर्व

अभीष्ट पूर्ण करीन,' असे म्हणून त्या ब्राह्मणाने सर्व देवांना तेथे आणले. सर्व देव हात जोडून त्या ब्राह्मणापुढे उपस्थित झालेले राजकुमाराने पाहिले. तो ब्राह्मण देवांना म्हणाला,

'देवगण, या राजकुमाराचा यज्ञाश्व रात्री देवराज इंद्रानं चोरून अन्यत्र नेऊन ठेवला आहे. त्याला शीघ्र घेऊन या,'

तेव्हा देवांनी चोरीस गेलेला अश्व परत आणून दिला. राजकुमाराने ब्राह्मणास नमस्कार केला, व म्हटले, 'महर्षे, आपले हे सामर्थ्य आश्चर्यजनक आहे. साधुश्रेष्ठा, माझा पिता मरण पावला. त्यांचं शरीर मात्र मी तापलेल्या तेलात राखून ठेवलं आहे. आपण त्यांना जिवंत करावं.'

'चल, जिथं यज्ञ सुरू आहे तिथं तुझा पिता उपस्थित आहे' असे हसत म्हणून सिद्धसमाधी राजकुमाराबरोबर यज्ञस्थानास आला. जल अभिमंत्रित करून त्या ब्राह्मणानें राजाच्या शवावर शिंपडले, राजा सचेत होऊन उठला. त्याने ब्राह्मणास चकित होऊन विचारले,

'धर्मस्वरूप, आपण कोण आहात ?'

तेव्हा राजकुमाराने सर्व हकीगत आपल्या पित्यास सांगितली. राजाने जीवदान देणाऱ्या ब्राह्मणास नमस्कार करून म्हटले,

'ब्रह्मन्, कोणत्या पुण्याईनं आपणांस हे असं अद्‌भुत सामर्थ्य प्राप्त झालं आहे ?'

'राजा', ब्राह्मणाने मधुर वाणीने म्हटले, 'मी रोज आळस सोडून गीतेचा बारावा अध्याय म्हणतो. त्यामुळं मला ही शक्ती प्राप्त झाली आहे. यामुळंच आपणांस जीवदान मिळालं.' इतके म्हणून ब्राह्मणांसह राजाकडून सिद्धसमाधीने गीतेच्या बाराव्या अध्यायाचे अध्ययन केले. यामुळे सर्वांनाच उत्तम गती प्राप्त झाली.

## चिन्मय आनंदाचा झरा

चिन्मय आनंदाची धारा वाहविणारा असा गीतेचा अठरावा अध्याय आहे. या अध्यायाचे माहात्म्य वेदापेक्षाही उत्तम आहे. सिद्धपुरुषांसाठी तर ही एक परमरहस्यमय वस्तू आहे. या विवेकमयी लतेचे मूल काम, क्रोध, मद आदींना नष्ट करणारे आहे. याचा पाठ केला की

यमदूतांची गर्जना बंद होते. मेरुपर्वताच्या शिखरावर अमरावती नावाची एक रमणीय पुरी आहे. पूर्वकाळी विश्वकर्म्यानें ती निर्माण केली होती. त्या पुरीत देवांनी सेवित असा इंद्र शचीसह निवास करीत होता. एकदा सुखपूर्वक तो बसला असताना त्याने पाहिले की, भगवान विष्णुदूतांनी सेवित असा एक पुरुष आला आहे. इंद्र त्या नवागत पुरुषाच्या तेजाने तिरस्कृत होऊन त्वरित तो आपल्या मणिमय सिंहासनावरून खाली मंडपात पडला. इंद्राच्या सेवकांनी देवलोकीच्या साम्राज्याचा मुकुट त्या नूतन इंद्राच्या मस्तकावर ठेवला. सर्व देव त्याचीच आरती करू लागले. ऋषींनी वेदमंत्रांचा उच्चार करून त्यालाच आशीर्वाद दिले. रंभा आदी अप्सरा त्याच्यासमोर नृत्य करू लागल्या. गंधर्वांनी मंगल गान त्याच्यासाठीच केले.

अशा प्रकारे हा नवीन इंद्र पाहाताच जुन्या इंद्राला फार मोठे नवल वाटले. त्याने मनाशी विचार केला, ‘ हा इंद्र झाला तरी कसा ? यानं कधी तलाव खोदले नाहीत. पथिकांना विश्राम देणारे वृक्ष लावले नाहीत. अन्नदान केलं नाही. तीर्थयात्रा नाही, अनुष्ठान नाही.’ या शंकेने व्याकुळ झालेला इंद्र क्षीरसागरनिवासी भगवान विष्णूंपाशी आला. तो विष्णूंना म्हणाला,

‘ भगवान, पूर्वकाळी मी यज्ञांचं अनुष्ठान केलं. म्हणून मला इंद्रपदाची प्राप्ती झाली, पण आता हा दुसरा इंद्र कोण आला आहे ?’

‘ इंद्रा, तो गीतेच्या अठराव्या अध्यायाचे पाच श्लोक प्रतिदिन म्हणतो. त्या पुण्याईनंच त्याला ते स्थान प्राप्त झालं आहे. गीतेच्या अठराव्या अध्यायाच्या पाठाचं पुण्य फार मोठं आहे. तू त्या अठराव्या अध्यायाचा आश्रय कर.’

भगवानांचे ऐकून इंद्राने ब्राह्मणवेष धारण केला. तो गोदावरीच्या तटावर आला. त्याने कालिकाग्राम नावाचे एक उत्तम नगर पाहिले. तेथे काळेश्वराचे स्थान होते. एक धर्मात्मा ब्राह्मण मोठा दयाळू व वेदपारंगत असा इंद्राने तेथे पाहिला. तो प्रतिदिन गीतेचा अठरावा अध्याय म्हणत असे. इंद्राने नम्रवृत्ती धारण करून त्याच्याकडून अठरावा अध्याय नीटपणे समजावून घेतला. त्याचा पाठ केला. त्यामुळे इंद्रासारखे छोटे

पद सोडून तो भगवानांच्या वैकुंठधामास जाऊन पोचला. असे हे अठराव्या अध्यायाचे माहात्म्य आहे. हे ऐकताच सर्व पापे संपतात. हा अध्याय म्हणजे चिन्मय आनंदाचा एक झरा आहे.

# ६ तत्त्वज्ञानदर्शन

## ' सत्यरूप परतत्त्व मीच '

कथा, उपकथा, आख्याने, स्थानमाहात्म्ये, तीर्थमहिमा, सदाचार इत्यादींवर भर देणाऱ्या पद्मपुराणात निखळ तत्त्वज्ञान असे फार थोडे आहे. सृष्टीची निर्मिती, तिचा विकास, तिचा संहार, यज्ञस्वरूप, भगवंतांचे साकार, निराकार रूप, भक्तितत्त्वाचे निरूपण, असे काही विषय कथेच्या, आख्यानाच्या स्वरूपात वा आचारधर्माच्या निरूपणात आलेले दिसतात. शिवतत्त्व, ब्रह्मतत्त्व, विष्णुतत्त्वही अनेक ठिकाणी समजावून सांगितले आहे. पद्मपुराणाच्या मताने हे सर्व विश्व नारायण-स्वरूप आहे. या नारायणास भगवान ब्रह्मदेवही नीट जाणीत नाही. मग इतरांची काय कथा ? भगवान नारायणच महर्षींचे गुप्त रहस्य, सर्व जाणण्यासारखे तत्त्व, अध्यात्मवेत्त्यांचे अध्यात्म, अधिदैव व अधिभूत आहे. तेच परम ऋषीचे परब्रह्म आहेत. वेदांनी त्यांचेच रूप विवरून सांगितले आहे. जो कर्ता, कारक, मन, बुद्धी, क्षेत्रज्ञ, प्रणव, पुरुष, शासन करणारा व अद्वितीय समजला जातो, जो पाच प्रकारचा प्राण आहे. जो ध्रुव असे अक्षरतत्त्व आहे, तोच परमात्मा नाना प्रकारच्या भावांनी प्रतिपादित झालेला आहे. तोच परब्रह्म असून सर्व सृष्टीची रचना करतो.

त्या आदिपुरुषालाच ऋषिमुनी हवन करतात. जितक्या कथा, जितक्या श्रुती, जितके धर्म आहेत, ते सर्व त्याच्यापासूनच निर्माण

झाले. तोच सत्य आहे, तोच मिथ्या आहे, तोच आदी, मध्य व अंत आहे. जो सीमारहित भविष्य, चर अचर प्राणी, जे काही दृश्य, अदृश्य आहे ते सर्व तोच आहे.

सत्ययुग, त्रेतायुग, द्वापरयुग, कलियुग अशी चार युगे संपली की बारा हजार दिव्य वर्षे होतात. अशी हजार चतुर्युगे संपली की ब्रह्मदेवांचा एक दिवस होतो. याच पद्धतीने ब्रह्मदेवांचेही आयुष्य संपते. सर्व प्राण्यांचेही आयुष्य संपून महाप्रलयास प्रारंभ होतो. सूर्यनारायण प्रचंड अग्नीप्रमाणे तापतो व सर्व समुद्र शोषून घेतो. सर्वत्र वायू सुटून सर्वत्र वादळ होते. पंचमहाभूते एकमेकांत विलीन होतात. कालरूप भगवान एका मुहूर्तातच सर्व लोकांची जीवन यात्रा संपवितात. मन, बुद्धी, चित्त, क्षेत्रज्ञ हे सर्व ब्रह्मदेवात विलीन होतात. व ब्रह्मदेव भगवान हृषिकेशात विलीन होतात.

भगवान एकटेच एकार्णवाच्या जलात शयन करतात. त्या अव्यक्त पुरुषास ओळखणारा व्यक्ती जीव तेथे नसतोच. शेवटी मुनी मार्कंडेय या दिव्य बालकाचा शोध घेतात. स्वतः भगवान मुनींना सांगतात,

' ब्रह्मन्, मी नारायण आहे. ज्यांना हजारो मस्तके, हजारो चरण आहेत तोच विराट परमात्मा मी आहे. मी सूर्याप्रमाणे तेजोमय पुरुष आहे. मीच देवांना हविष्य पोचविणारा अग्नी. सात अश्वांचा सूर्य मीच. इंद्रपदावर प्रतिष्ठित होणारा मीच. मी सर्व प्राण्यांत, देवांत असतो. मी सर्पांत शेषनाग, पक्ष्यांत गरुड, मनुष्यांचा धर्म मीच. तप मीच. मीच दयापरायण धर्म, दुधानं भरलेला महासागर मीच. सत्यरूप परतत्त्व मीच. मी एकमात्र प्रजापती, मीच सांख्य, मीच योग, मीच परमपद आहे. यज्ञ, क्रिया, ब्राह्मणांचा स्वामी मीच आहे. मीच अग्नी, मीच वायू, मीच पृथ्वी, मीच आकाश, मीच जल, मीच समुद्र, नक्षत्र, दिशा सर्व काही मीच. वर्षा, होम, मेघ, हविष्य सर्व काही मीच आहे. क्षीरसागराच्या आत वडवाग्निमुखातच माझं निवासस्थान आहे. मीच संवर्तक अग्नी बनून सर्व समुद्रांचं जल सुकवून टाकतो. मीच सूर्य आहे. मीच परम पुरातन असा सर्वांचा आश्रय आहे. भविष्यात मीच सर्वत्र प्रकट होईन. भावी वस्तूंची उत्पत्ती मजपासूनच होईल. या जगात

आपण जे काही पाहाता, जे ऐकता, जे अनुभवता ते सर्व माझंच रूप समजावं. पूर्वकालात मीच सृष्टीची रचना केली. आजही करणार आहे. मार्कंडेया, तुम्ही माझ्याकडे पाहावं, प्रत्येक युगात सर्व जगाचं रक्षण मीच करतो.

यत्किञ्चित्पपश्यसे विप्र यच्छृणोषि च किंचन ।
यच्चानुभवसे लोके तत्सर्वं मामनुस्मर ।।

## पंचमहाभूतांत आत्म्याचा मेळ कसा ?

भूमिखंडात राजा ययाती व मातली यांचा संवाद आला असून त्यात अनेक तात्त्विक प्रश्नांची चर्चा आलेली आहे. ही चर्चा प्रामुख्याने मानवी देहासंबंधी आहे. ययाती विचारतो, 'मनुष्यानं ज्या शरीरानं पुण्य केलेलं असतं, धर्मार्जिन केलं असतं ते शरीर कसं नष्ट होतं ?' मातली सांगतो, 'मनुष्याला हे शरीर सोडावंच लागतं. शरीर पंचमहाभूतांचं बनलेलं असतं. त्यांची बंधनं ढिली होतात. वृद्धावस्थेत पीडित मनुष्य शरीराचा त्याग करतो.'

'ही वृद्धावस्था कशी येते ? शरीरास पीडा का होते ?'

'राजन्, हे शरीर पंचमहाभूतांचं बनलं आहे. वीर्य व रक्त यांचा नाश होऊन शरीर प्राय: सुकून जातं. त्यात प्रचंड वायूचा प्रकोप होतो. त्यानं मनुष्याचा रंगच बदलून जातो. कामासक्त माणसाचं मांस, रक्त क्षीण होतं. त्याचे केस पिकतात. शरीराचं शोषण होतं. वृद्ध होताना दिनदिन त्याची तृष्णा वाढतच जाते. त्याची शक्ती अधिकच क्षीण होते. काम नाशरूपच असतो. या पाच भूतांचा आपापसांत मेळ राहात नाही. तर आत्म्याशी त्यांचा मेळ कसा राहील ? या शरीरात अधिकांश पृथ्वीचा भाग आहे. जशी पृथ्वी स्थित, तसं हे शरीर स्थित आहे. म्हणून ते स्वर्गलोकी जात नाही.

'एकमात्र धर्मानंच मनुष्यास देवत्वाची प्राप्ती होते. कर्मांच्या परिणामानं शरीर उत्पन्न होतं. उद्भिज, स्वेदज, अंडज, जरायुज अशी चार प्रकारची शरीरं आहेत. यांतूनच साऱ्या सृष्टीची निर्मिती होते.' मातलीने ययातीस मानवी देह व त्याचा विकास यांचे तत्त्वज्ञानच

स्पष्ट केले. मानवी शरीर, त्याचे विविध भाग, त्यांची कार्यशक्ती, त्यांचे परस्पर सहकार्य हे सर्व मातलीने समजावून दिले. वीर्य व रज यांच्या संयोगातून एकाच दिवसात कललाच्या आकारात परिणत होऊन पाच रात्रींत त्यांचा एक लहानसा बुडबुडा तयार होतो. पुढे एक महिन्यात ग्रीवा, मस्तक, खांदे, हाडे, उदर, इत्यादी अंगे तयार होतात. दोन महिन्यांत हात, पाय, कमर, पूर्ण शरीर यांची निर्मिती होते.

अशा प्रकारे सर्व मानवी शरीर तयार होते. पूर्वजन्मातील कर्मांचे स्मरण येथील निद्रित जीवास असते. तो विचार करतो, 'मी आतापर्यंत हजारो योनींतून फिरलो. आता या वेळेस जन्म घेत आहे. मी यावेळी कल्याणदायक काम करीन. त्यामुळं मला पुन्हा गर्भात पडणं होणार नाही.' गर्भवासातील महान दुःख भोगूनच तो मोक्षाचा उपाय शोधतो. या जीवाच्या जन्माच्या वेळी अत्यंत दुःख होते. जन्म होताच तो मूर्च्छित होतो. त्यावेळी त्याचे शरीर हाडांनी युक्त अशा गोल आकाराचे असते. रक्त, मांस, वसा यांनी ते व्याप्त असते. मल, मूत्र यांनी लिडबिडलेले असते. केश, रोम, नख यांनी युक्त अशा रोगांचे ते आश्रय असते. या शरीरावर काम-क्रोधांचे आक्रमण होते. या देहात तीनशे साठ हाडे, पाचशे मांसपेशी, साडेतीन कोटी केस आणि असंख्य नाड्या असतात. त्यांतील घाण मल, मूत्र, घाम आदींच्या रूपाने बाहेर येते. हे शरीर बत्तीस दात, वीस नखे यांनी युक्त असते.

आत्मा शुद्ध असून त्याचा या शरीराशी काहीच संबंध नसतो. त्याचे हे देहरूपी गृह मात्र नितान्त अशुद्ध असते. वीर्य व रज यांच्या संयोगाने निर्माण होणारा जीव तो मलमूत्राने लडबडलेला असतो. पंचमहाभूतांचा हा देह असा अशुद्ध असला तरी त्यातील आत्मा निर्मळ व शुद्ध असतो. या अशुद्ध व अपवित्र शरीराचा केवढा लोभ माणसास वाटतो ! भाव शुद्ध असेल तर मात्र या शरीराचा त्रास कमी होतो. पत्नी व पुत्री या दोघींना दिलेल्या आलिंगनांत केवढा फरक असतो. नारी पतीचे चिंतन करते, पुत्राचेही करते, पण दोनही भावांत केवढा फरक ! बाह्य शुद्धीपेक्षा मनाच्या शुद्धीचे महत्त्व म्हणून विशेष आहे. वैराग्यरूपी मातीने व ज्ञानरूप निर्मल जलाने शरीरशुद्धीचा प्रयत्न

करावा. या अपवित्र शरीरास वारंवार शुद्ध करावे लागते. केळीच्या वृक्षाप्रमाणे हे शरीर सर्वथा सारहीन आहे. अध्यात्मज्ञान हेच खरे सार आहे. देहाच्या इंद्रियांची ओढ कशी कमी करावी हेही मातलीने समजावून दिले आहे. कामादी विकारांच्या अतिरेकाचे, वृद्धकाळाचे चित्रही या देहविज्ञानाच्या संदर्भात दिलेले आहे. क्लेश, दुःख, मरण, शोकग्रस्त अवस्था यांचीही चर्चा आलेली आहे. दोन वस्त्रे व शेरभर अन्न यांतच केवळ सुख आहे. मानसन्मान, छत्रचामर, राज्यसिंहासन ही सर्व दुःखदायक आहेत. स्वर्गात तरी सुख कोठले ? देवांतही कमीजास्त श्रेणी आहेत. पुण्य क्षीण झाले की परत मर्त्यलोकात यावे लागते. सर्व चराचर जग अशा दुःखाने व्यापलेले असताना या सर्व भौतिक वस्तूंचा त्याग करावा. विचारी पुरुषाने निर्वेदाने परम वैराग्य धारण करावे. या वैराग्याने ज्ञान प्राप्त होते. ज्ञानाने परमात्मा मिळतो. मनुष्य कल्याण-मय मुक्ती मिळवितो. सर्व दुःखांपासून तो मुक्त होऊन सदा सुखी, सर्वज्ञ, कृतार्थ होतो.

## पंचविंशक पुरुषाचे ज्ञान

अंबरीष-नारदसंवादात निर्गुण ध्यान व सगुण ध्यान यांचे वर्णन आले असून याच पातालखंडात भगवद्भक्तीच्या लक्षणाची मीमांसा आली आहे. भक्ती मानसी, वाचिकी, कायिकी, लौकिकी, वैदिकी व आध्यात्मिकी असते. नारदांनी पापनाशक अशा श्रीकृष्णांच्या सगुण ध्यानाचे संपूर्ण वर्णन केले आहे. संपूर्ण विष्णुसहस्रनाम उत्तरखंडात आले असून भक्तप्रवर पुंडरीकाच्या कथेत भक्तितत्त्वाचे विवेचन आले आहे. ज्ञानयोगाचाही विस्तार याच आख्यानात आला आहे. ज्ञानयोगात गुरुपरंपरेने पंचविंशक पुरुष मानला आहे. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच इंद्रियविषय, मन, पाच भूते, अहंकार, महत्तत्त्व, प्रकृती ही चोवीस तत्त्वे व यांहून भिन्न असा परमात्मा पंचविसावे तत्त्व. म्हणून या सर्वांना 'पंचविंशक' म्हणतात. हा पुरुषच सर्व जगाचा आत्मा आहे. त्यालाच सर्व जगाचा निवासरूप सनातन परमात्मा मानला आहे. तोच या जगताची सृष्टी, पालन व संहार करतो. जो निःस्पृह, नित्य संतुष्ट,

ज्ञानी, जितेन्द्रिय, ममताअहंकारापासून रहित, रागद्वेषापासून शून्य, शांतचित्त, सर्व प्रकारच्या आसक्तींहून पृथक असून जो ध्यानयोगात प्रवृत्त होतो त्यालाच त्या अक्षय जगदीश्वराचे दर्शन होते.

## भक्तितत्त्वाचे स्वरूप

पद्मपुराणात यज्ञ, तीर्थयात्रा, योग, तपस्या यांना महत्त्व असले तरी एक भक्तिभाव नसेल तर सर्व व्यर्थ आहे असाच अभिप्राय सर्वत्र व्यक्त झाला आहे. सगुण परमेश्वरावर उत्कट प्रेम हा भक्तीचा मुख्य धागा सगुणपूजेच्या संदर्भात अनेकदा प्रकट झाला आहे. पूजेची विधि-विधाने असली तरी, मंत्रतंत्राचा भर असला तरी, शुद्ध भावाची जपणूकही सर्वत्र झालेली दिसते. मोक्षासाठी, परमधामाच्या प्राप्ती-साठी मनुष्य भक्ती करतो हे सूत्र सर्वत्र असले तरी भक्ती हेच अंतिम मूल्य अशी निष्ठाही काही ठिकाणी व्यक्त झाली आहे. मोक्षरूप फलाच्या इच्छेने मनुष्य सात्त्विकी, राजसी, तामसी भक्ती करतो असे उत्तरखंडात आले आहे. अहंकार मनात बाळगून, ईर्ष्यावश होऊन दुसऱ्यांचा संहार करण्यासाठी जी देवाची भक्ती केली जाते ती तामसी होय. भौतिक विषयांवर लक्ष देऊन ऐश्वर्यासाठी, राज्यासाठी, यशा-साठी भगवानांची पूजा केली जाते ती राजसी भक्ती होय. श्रीविष्णूंच्या प्राप्तीसाठी समर्पणभावाने जी भक्ती केली जाते ती सात्त्विकी भक्ती अशी पद्मपुराणाची धारणा आहे. भगवानांची भक्ती करणाऱ्या मनुष्यास पिशाचादी सर्व ग्रह शुभ असतात. त्याच्या घरात लक्ष्मी स्थिरावते. त्या भक्ताच्या शरीरात सर्वदा गंगा, गया, नैमिषारण्य, काशी, प्रयाग, कुरुक्षेत्र आदी तीर्थे निवास करतात.

गंगागयानैमिषपुष्कराणि काशी प्रयागः कुरुजांगलानि ।
तिष्ठन्ति देहे कृतभक्तिपूर्वं गोविंदभक्तिं वहतां नराणाम् ।।

भगवान वासुदेवांसाठी नित्य स्मरण करावे. तहानलेला मनुष्य जसा पाण्याची सदा आठवण काढतो त्याप्रमाणे व्याकुळ होऊन पर-मात्म्यास आठवावे. पतिव्रता नारी सदा पतीचे चिंतन करते, धनलोभी सतत धनाचाच ध्यास घेतो, त्याप्रमाणे मनुष्याने परमेश्वराचे चिंतन

सतत करावे. हंस मानससरोवराचे, ऋषी भगवानांचे, वैष्णव भक्तीचे, पशू हरित चाऱ्याचे, साधुपुरुष धर्माचे; त्याप्रमाणे मनुष्याने विष्णूंचे चिंतन नित्य करावे. सूर्यकान्त मणी व सूर्यकिरणे यांचा संयोग झाला की जशी आग प्रकट होते त्याप्रमाणे साधुपुरुषांच्या संसर्गाने श्रीहरीच्याबद्दल भक्ती निर्माण होते. कुमुदिनी चंद्रास पाहून जशी खुलते तशीच अवस्था भगवानांना पाहून भक्ताच्या हृदयाची होते. भक्तीने, स्नेहाने, द्वेषभावाने, स्वामिसेवकभावाने, विचारपूर्वक बुद्धीने कसेही जनार्दनांचे चिंतन केले तरी मनुष्य त्यांच्या सनातनधामास जातो.

या भक्तियोगाने पुरुषास सनातन परमात्म्याचे दर्शन होते. भगवानांच्या मायेने मोहित झालेला पुरुष 'हे तत्त्व, ते तत्त्व' असे म्हणत संशयग्रस्त होतो. पण भक्तितत्त्व प्राप्त झाले की त्याला विष्णुरूपतत्त्वाची प्राप्ती होते. इंद्राने अमृत मिळविले, पण विष्णुभक्तीच्या शिवाय तो दुःखीच राहिला. भक्ती हेच असे अमृत आहे की जे प्याल्यावर दुःख कधीच होत नाही. भक्तपुरुष वैकुंठधामास जाऊन भगवान विष्णूंच्या समीप राहातो. सदा आनंदच भोगतो. भक्तीनेच भगवान विष्णूंची प्राप्ती होते. वैकुंठनाथास सोडून भक्तपुरुष दुसऱ्या मार्गाने कसा जाणार? भक्तिहीन राहून चार वेदांचा अभ्यास काय कामाचा ? भक्तियुक्त चांडाल असला तरी तो देवांद्वारा पूजित असतो, ही पद्मपुराणाची धारणा आहे.

**भक्तिहीनैश्चतुर्वेदैः पठितैः किं प्रयोजनम् ।**
**श्वपचो भक्तियुक्तस्तु त्रिदशैरपि पूज्यते ।।**

ज्या वेळी श्रीहरीच्या स्मरणजनित प्रसन्नतेने शरीरात रोमांच उभे राहातात, नेत्रांतून आनंदाचे अश्रू वाहातात, त्यावेळी मुक्ती दासी बनते. हा पद्मपुराणातील विचार पुढे प्राकृत भाषांतील संतवाङ्मयात चांगलाच रुजलेला दिसतो. सनातन मोक्षमार्गात लक्ष्मी व नारायण या मंत्राने जे इच्छित ते प्राप्त होते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, स्त्री, शूद्र, सर्व जातींचे पुरुष या मंत्राचे व भक्तिमार्गाचे अधिकारी आहेत. परमात्म्याची आराधना करावी, त्याला सर्व कर्मे अर्पण करावीत, अनन्यभावाने त्याला शरण जावे, त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणत्याच मार्गाकडे लक्ष देऊ नये,

आपणांसाठी कोणत्याही वस्तूंचा संग्रह न करणे, हे सर्व शरणागत भक्ताचे नियम पद्मपुराण सांगते. लक्ष्मी व नारायण हे दोन छोटे मंत्र महत्त्वाचे आहेत.

पार्वती-महादेव यांच्या संवादांतूनही भक्तितत्त्वाची अनेक अंगे स्पष्ट होताना दिसतात. त्यांनी पार्वतीला भगवान विष्णूंचा महिमा, त्यांच्या भक्तीचे भेद, अष्टाक्षरमंत्राचे स्वरूप इत्यादी विषय विवरून सांगितले आहेत. भगवानांचे अर्चन, त्यांच्या मंत्रांचा जप, स्वरूपाचे ध्यान, नामांचे स्मरण, कीर्तन, श्रवण, वंदन, चरणसेवन, चरणोदकसेवन, त्यांचा प्रसाद ग्रहण करणे, भगवद्भक्तांची सेवा करणे, द्वादशी व्रताचे पालन करणे, तुलसीचा वृक्ष लावणे; ही सर्व कर्मे भगवान विष्णूंची भक्ती प्रकट करणारी आहेत. 'ॐ नमो नारायण' या अष्टाक्षरमंत्राची महतीही महादेवांनी समजावून सांगितली आहे. ॐकार, नारायण, श्रीविष्णू, लक्ष्मी, त्यांची रूपे, त्यांचे गुण, त्यांचे धाम इत्यादींचेही वर्णन महादेव करताना दिसतात. लक्ष्मी, श्री, कमला, विद्या, माता, विष्णुप्रिया, सती, पद्माक्षी, भूतेश्वरी, महादेवी, सर्वसुखप्रदा, सरस्वती, रती, ही सर्व लक्ष्मीची नावे सांगून महादेव म्हणतात,

**हिरण्यवर्णां हरिणीं सुवर्णरजतस्रजाम् ।**
**चन्द्रां हिरण्मयीं लक्ष्मीं विष्णोरनपगामिनीम् ।।**
**गन्धद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीम् ।**
**ईश्वरीं सर्वभूतानां तामिहोपव्हये श्रियम् ।।**

'ज्या श्रीअंगांचा वर्ण सुवर्णाप्रमाणे सुंदर व गौर आहे, जी सोन्याचांदीच्या हारांनी सुशोभित आहे, सर्वांना आल्हाद देणारी आहे, भगवान विष्णूपासून जिचा कधी वियोग झाला नाही, जी स्वर्णमयी कांती धारण करते, उत्तम लक्षणांनी विभूषित असल्यामुळे जिचे नाव लक्ष्मी आहे, जी सर्व प्रकारच्या सुगंधांचे द्वार आहे, जिला परास्त करणे कठीण आहे, जी सदा सर्व अंगांनी पुष्ट आहे, गायीच्या सुक्या शेणात जिचा निवास आहे, जी सर्व प्राण्यांची अधीश्वरी आहे, त्या भगवतीदेवीस मी आवाहन करतो.'

वैकुंठधामात भगवानांची स्थिती, योगमायाद्वारे भगवानांची

स्तुती, भगवानांच्या द्वारे सृष्टीची रचना, भगवानांचे चार व्यूह व त्यांचे वर्णन महादेवांनी पार्वतीसाठी विस्ताराने केले आहे. याच संदर्भात महादेवांनी पार्वतीजवळ वैष्णवांचा आचारधर्म भक्तितत्त्वास धरून वर्णन केला आहे. श्रीविष्णूचा पूजाविधीही त्यांनी समजावून दिला आहे. विष्णुभक्तीचे हे सारे माहात्म्य महादेव पार्वतीला समजावून सांगतात. यातील औचित्य चिंतनीय आहे.

भक्तितत्त्वाचा सुंदर आविष्कार अनेक कथा, आख्याने ज्यातून झाला आहे, त्या भागवतपुराणाचाही पुरस्कार पद्मपुराण करताना दिसते. श्रीमद्‌भागवताच्या सप्ताहपारायणाचा विधी सनकादींनीं नारदांना समजावून दिला आहे. हे भागवत म्हणजे वेदरूप कल्पवृक्षाचे पिकलेले फल असून ते परमानंदमय अमृतरसाने भरलेले आहे. श्रीशुकदेवरूपी पोपटाने त्याला या पृथ्वीलोकावर आणले. जोपर्यंत जीवन आहे, प्रलय-काल येत नाही, तोपर्यंत भागवताच्या रसाचा आस्वाद लोक वारंवार पीत राहातील. श्रीमद्‌भागवत सर्व पुराणांचे तिलक व वैष्णव पुरुषांची प्रिय वस्तू आहे. ज्ञान, वैराग्य, भक्तीच्या सह निवृत्तिमार्ग यांना या भागवताने प्रकाशित केले आहे.

# ७ उपसंहार व महिमा

## सर्व देवांत श्रीविष्णू श्रेष्ठ

फार पूर्वीची हकीगत आहे. स्वायंभुव मनू दीर्घकाल चालणारा एक उत्तम यज्ञ मुनींच्यासह मंदराचल पर्वतावर करीत होता. यज्ञात कठोर व्रतांचे पालन करणारे मोठमोठे ऋषी, धर्मशास्त्रज्ञ, वेदवेत्ते इत्यादी तेथे जमले होते. ब्रह्मा, विष्णू, महेश यांपैकी कोणत्या देवाची स्तुती अधिक होते ? कोणाचे चरणोदक घ्यावे ? कोणाचा प्रसाद

घ्यावा ? कोण अविनाशी आहे ? परमधामस्वरूप व सनातन परमात्मा कोण आहे ? आदी प्रश्नांची चर्चा त्यांच्यांत होत होती. कोणी रुद्रांचे, कोणी ब्रह्मदेवांचे, कोणी सूर्याचे, कोणी विष्णूंचे महत्त्व निवेदन केले. तेव्हा स्वायंभुव मनू म्हणाला,

'शुद्ध, सत्त्वमय, कल्याणमय गुणांनी युक्त, कमलाप्रमाणे नेत्र असणारा, श्रीदेवीचा स्वामी भगवान पुरुषोत्तम हाच एकमेव वेदवेत्ते ब्राह्मणांच्या द्वारे पूजित आहे.' मनूचे हे बोलणे ऐकून ऋषिमुनी तपोनिधी भृगू ऋषींच्यापाशी गेले. हात जोडून ते त्यांना म्हणाले, 'सुव्रता, आपण आमचा संदेह दूर करावा. आपणच ब्रह्मा, विष्णू व महेश यांच्यापाशी जावं.' त्यानुसार भृगू त्वरित कैलासपर्वतावर गेले. शंकरांच्या गृहद्वारावर महाभयंकर नंद हातात त्रिशूल घेऊन उभा होता. भृगू त्याला म्हणाले, 'मी भृगू. मी ब्राह्मण आहे. महादेवांचं दर्शन करण्यासाठी आलो आहे. आपण भगवानांना मी आलो असल्याची सूचना द्यावी.'

'अरे, यावेळी भगवानांच्याकडं तुला जाता नाही येणार. भगवान देवींच्याबरोबर क्रीडाभवनात आहेत. जर जगून राहायचं असेल तर आलास तसा परत जा.'

'हा रुद्र तमोगुणानं युक्त होऊन माझ्यासारख्या ब्राह्मणास जाणीत नाही ? त्याला दिलेलं अन्न, जल, फुल, हविष्य, निर्माल्य, हे सर्व अभक्ष्य होईल.'

रुद्रशिवांना असा शाप देऊन भृगू ब्रह्मदेवांकडे गेले. ब्रह्मदेवांनी त्यांचा काहीच आदरसत्कार केला नाही. गोड बोलणेही केले नाही. ब्रह्मदेव यावेळी कमलाच्या आसनावर स्वस्थ बसले होते. भृगू त्यांना म्हणाले, 'महान रजोगुणानं आसक्त होऊन तुम्ही माझी अवहेलना केलीत. सर्व जगतातील लोकांना आपण अपूज्य व्हाल.'

त्यानंतर भृगुमुनी क्षीरसागराच्या तटावर विष्णुलोकात आले. तेथील महात्मा पुरुषांनी भृगूंचा आदरसत्कार केला. त्यांना त्या लोकात कोणीच अडविले नाही. ते एकदमच भगवानांच्या अंतःपुरात पोचले. तेथे त्यांनी सूर्याप्रमाणे तेजस्वी विमानात शेषनागावर भगवान लक्ष्मी-

पती झोपलेले पाहिले. लक्ष्मी आपल्या करकमलांनी त्यांची सेवा करीत होती. त्यांन पाहून भृगू उगाचच रागावले व त्यांनी शोभायमान अशा भगवानांच्या छातीवर आपल्या डाव्या पायाचा प्रहार केला. भगवान जागे होऊन उठून बसले. प्रसन्नतापूर्वक म्हणाले,

'आज मी धन्य झालो.' ते हर्षाने महर्षींचे चरण दाबू लागले. ते म्हणाले,

'ब्रह्मर्षे, आज मी धन्य झालो. कृतकृत्य बनलो. माझ्या शरीरास आपल्या चरणाचा स्पर्श झाला हे माझं मोठंच भाग्य आहे. सर्व संपत्ती प्राप्त करून घेण्याचं जे साधन, संसारसागर तरून जाण्याचा जो सेतू, त्या ब्राह्मणाच्या चरणधुळीनं मी पवित्र झालो आहे.'

इतके म्हणून भगवानांनी लक्ष्मीदेवीसह उठून त्या ऋषींना दिव्य माला, चंदन आदींनी पूजा समर्पण केली. त्यांचे हे रूप पाहून मुनिश्रेष्ठ भृगूंचे डोळे आनंदाच्या अश्रूंनी भरून आले. त्यांनी आसनावरून उठून भगवानांना प्रणाम केला. ते हात जोडून म्हणाले,

'ओ हो. श्रीहरींचे रूप किती मनोहर आहे! किती शांती. कसं ज्ञान, किती दया, कशी निर्मल क्षमा, किती पावन सात्त्विक गुण. भगवान्, आपण गुणांचे सागर आहात. आपणातच सत्त्वगुणाचा स्वाभाविक निवास आहे. आपण शरणागतांना रक्षक आहात. आपण पुरुषोत्तम आहात. आपलं चरणोदक पितरांना, देवांना, सर्व ब्राह्मणांना सेव्य आहे. पापांचा नाश करून आपण मुक्ती देता. आपलं प्रतिदिन पूजन करावं. आपल्या चरणांचं तीर्थ घ्यावं. आपल्या प्रसादाचं सेवन करावं. जे आपलं पूजन करतात ते ब्राह्मण होत. देवकीनंदन कृष्ण ब्राह्मणांचे हितैषी आहेत. श्रीमधुसूदन ब्राह्मणांचे हितचिंतक आहेत. पद्नाभ, दामोदर ब्राह्मणांचे हित करणारे आहेत, अशा कमलनेत्रांच्या लक्ष्मीपतीस नमस्कार असो. सर्वव्यापी वासुदेवास नमस्कार असो. कल्याणमय गुणांनी पूर्ण, सृष्टी, पालन, संहार यांना कारण असणाऱ्या आपणांस नमस्कार असो. ब्राह्मणांचे हितैषी प्रद्युम्न, अनिरुद्ध, संकर्षण यांना नमस्कार असो. शेषनागावर शयन करणाऱ्या ब्रह्मण्यदेवास नमस्कार असो. कमलाप्रमाणे नेत्र असणाऱ्या श्रीरघुनाथांना वारंवार नमस्कार

असो. प्रभो, सर्व देव, ऋषी, आपल्या मायेनं मोहित असल्यामुळं आपलं स्वरूप जाणीत नाहीत. भगवान, सर्व वेदांचे विद्वानही आपल्या. तत्त्वास जाणीत नाहीत. प्रभो, मी महर्षींनी पाठविलं म्हणून इथं आलो आपलं शील, आपलं गुण यांचं ज्ञान व्हावं म्हणून मी आपल्या छातीवर पाय ठेवला. गोविंदा, कृपानिधे, आपण मला क्षमा करावी.'

इतके म्हणून महर्षी भृगूंनी भगवानांच्या चरणांना वारंवार प्रणाम केला. भगवानांच्या धामात राहणाऱ्या दिव्य महर्षींनी भृगु-मुनींचे चांगले स्वागत केले. तेथून प्रसन्न वृत्तीने भृगू परत यज्ञस्थानी आले. इतर ऋषींनी त्यांचे स्वागत करून त्यांचा आदर-सत्कार केला. भृगू मुनींनी त्यांना सर्व हकीगत सांगितली. ते म्हणाले, 'ब्रह्मदेव रजो-गुणात अधिक, रुद्र तमोगुणी आहे. केवळ भगवान विष्णू हेच सत्त्वगुणात श्रेष्ठ आहेत, ते कल्याणमय, गुणांचा सागर, नारायण, परब्रह्म, सर्व ब्राह्मणांचे देव आहेत. त्यांच्या स्मरणानंच पापांपासून मुक्ती मिळते. त्यांचं चरणोदक, त्यांचा प्रसाद परमपावन असून मोक्ष देणारा आहे. हवन भगवान विष्णूंनाच करावं. ते सर्व अक्षय होईल. द्विजांनो, तुम्ही आलस्य सोडावं व जीवनभर भगवान विष्णूंचं पूजन करावं. तेच परम-धाम आहे. तेच सत्यज्योती आहेत. अष्टाक्षरमंत्र द्वारे विधिपूर्वक भगवान विष्णूंचं पूजन करावं. श्रीविष्णूच सर्व यज्ञांचा भोक्ता परमेश्वर आहे. हे नीट जाणूनच आपण हवन, दान, जप इत्यादी कर्म करावीत.'

## वेदतुल्य पद्मपुराण

भृगुजींनी असे निक्षून सांगितल्यावर सर्व ऋषींनी निष्पाप वृत्तीने त्यांना नमस्कार केला. त्यांच्याकडून मंत्रदीक्षा घेतली. त्यांनी भगवान विष्णूंचे पूजन केले. वसिष्ठ म्हणाले, 'भगवान रामचंद्र, सर्व देवांत परमपुरुषोत्तम आहे. परमपद प्राप्त होण्यासाठी रघुनाथांनाच शरण जाणं युक्त आहे. हे पद्मपुराण वेदतुल्य आहे. स्वायंभुव मन्व-न्तरात ब्रह्मदेवांनी याचा उपदेश केला होता. जो प्रतिदिन याचा एकाग्रचित्तानं पाठ करील त्याला भगवान लक्ष्मीपतीची भक्ती लाभेल.

तो, जर विद्यार्थी असेल तर विद्या, धर्मार्थी असेल तर धर्म, मोक्षार्थी असेल तर मोक्ष, कामार्थी असेल तर सुख पावेल. द्वादशी तिथीस, श्रवण नक्षत्र असल्यास, सूर्य व चंद्र यांच्या ग्रहणाच्या वेळी, अमावास्या व पौर्णिमेस या पुराणाचा भक्तिपूर्वक पाठ करावा. जो एकाग्रचित्ताने प्रतिदिन याचा अर्धा हिस्सा वा श्लोकांचा चौथा भाग वाचील त्याला निश्चितच एक हजार अश्वमेध यज्ञांचं फल मिळेल. या प्रकारे हे परम गुह्य पद्मपुराण आहे. जर परमपदाची प्राप्ती करून घ्यायची असेल तर भगवान हृषिकेशाची आराधना करावी.'

आपल्या गुरूने, वसिष्ठांनी इतके सांगितल्यावर राजा दिलीपाने त्यांना प्रणाम केला व यथायोग्य पूजन करून विधिपूर्वक विष्णुमंत्राची दीक्षा घेतली. आलस्यरहित होऊन जीवनभर त्याने श्रीहृषिकेशाची आराधना करून समयानुसार योग्यांनाच प्राप्त होणारा सनातन असा योग्य विष्णुधाम प्राप्त करून घेतला.



# ८ स्तोत्रमंजूषा

## १. महादेवकृत श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्र

इति मंत्रं समुच्चार्य यजेद् वा विष्णुमव्ययम् ।
श्रीनिवासं जगन्नाथं ततः स्तोत्रं पठेत् सुधीः ॥

ॐ वासुदेवः परं ब्रह्म परमात्मा परात्परः ॥ १ ॥

परं धाम परं ज्योतिः परं तत्त्वं परं पदम् ।
परः शिवः परो ध्येयः परं ज्ञानं परा गतिः ॥ २ ॥

परमार्थः परश्रेष्ठः परानन्दः परोदयः ।
परोऽव्यक्तात्परं व्योम परमर्द्धिः परेश्वरः ॥ ३ ॥

निरामयो निर्विकारो निर्विकल्पो निराश्रयः ।
निरञ्जनो निरालम्बो निर्लेपो निरवग्रहः ॥ ४ ॥

निर्गुणो निष्कलोऽनन्तोऽभयोऽचिन्त्योऽचलोऽञ्चितः ।
अतीन्द्रियोऽमितोऽपारो नित्योऽनीहोऽव्ययोऽक्षयः ॥ ५ ॥

सर्वज्ञः सर्वगः सर्वः सर्वदः सर्वभावनः ।
सर्वशास्ता सर्वसाक्षी पूज्यः सर्वस्य सर्वदृक् ॥ ६ ॥

सर्वशक्तिः सर्वसारः सर्वात्मा सर्वतोमुखः ।
सर्ववासः सर्वरूपः सर्वादिः सर्वदुःखहा ॥ ७ ॥

सर्वार्थः सर्वतोभद्रः सर्वकारणकारणम् ।
सर्वातिशयितः सर्वाध्यक्षः सर्वेश्वरेश्वरः ॥ ८ ॥

षड्विंशको महाविष्णुर्महागुह्यो महाविभुः ।
नित्योदितो नित्ययुक्तो नित्यानन्दः सनातनः ।। ९ ।।

मायापतिर्योगपतिः कैवल्यपतिरात्मभूः ।
जन्ममृत्युजरातीतः कालातीतो भवातिगः ।। १० ।।

पूर्णः सत्यः शुद्धबुद्धस्वरूपो नित्यचिन्मयः ।
योगप्रियो योगगम्यो भवबन्धैकमोचकः ।। ११ ।।

पुराणपुरुषः प्रत्यक्चैतन्यः पुरुषोत्तमः ।
वेदान्तवेद्यो दुर्ज्ञेयस्तापत्रयविवर्जितः ।। १२ ।।

ब्रह्मविद्याश्रयोऽनघः स्वप्रकाशः स्वयम्प्रभुः ।
सर्वोपाय उदासीनः प्रणवः सर्वतः समः ।। १३ ।।

सर्वानवद्यो दुष्प्राप्यस्तुरीयस्तमसः परः ।
कूटस्थः सर्वसंश्लिष्टो वाङ्मनोगोचरातिगः ।। १४ ।।

संकर्षणः सर्वहरः कालः सर्वभयंकरः ।
अनुल्लङ्घ्यश्चित्रगतिर्महारुद्रो दुरासदः ।। १५ ।।

मूलप्रकृतिरानन्दः प्रद्युम्नो विश्वमोहनः ।
महामायो विश्वबीजं परशक्तिः सुखैकभूः ।। १६ ।।

सर्वकाम्योऽनन्तलीलः सर्वभूतवशंकरः ।
अनिरुद्धः सर्वजीवो हृषीकेशो मनःपतिः ।। १७ ।।

निरुपाधिप्रियो हंसोऽक्षरः सर्वनियोजकः ।
ब्रह्मप्राणेश्वरः सर्वभूतभृद् देहनायकः ।। १८ ।।

क्षेत्रज्ञः प्रकृतिस्वामी पुरुषो विश्वसूत्रधृक् ।
अन्तर्यामी त्रिधामान्तःसाक्षी निर्गुण ईश्वरः ।। १९ ।।

योगिगम्यः पद्मनाभः शेषशायी श्रियः पतिः ।
श्रीशिवोपास्यपादाब्जो नित्यश्रीः श्रीनिकेतनः ।। २० ।।

नित्यवक्षःस्थलश्रीः श्रीनिधिः श्रीधरो हरिः ।
वश्यश्रीर्निश्चलश्रीदो विष्णुः क्षीराब्धिमन्दिरः ।। २१ ।।

कौस्तुभोद्भासितोरस्को माधवो जगदार्तिहा।
श्रीवत्सवक्षा निःसीमकल्याणगुणभाजनम् ॥ २२॥

पीताम्बरो जगन्नाथो जगत्त्राता जगत्पिता।
जगद्वन्धुर्जगत्स्रष्टा जगद्धाता जगन्निधिः॥ २३॥

जगदेकस्फुरद्वीर्यो नाहंवादी जगन्मयः।
सर्वाश्चर्यमयः सर्वसिद्धार्थः सर्वरञ्जितः॥ २४॥

सर्वामोघोद्यमो ब्रह्मरुद्राद्युत्कृष्टचेतनः।
शम्भोः पितामहो ब्रह्मपिता शक्राद्यधीश्वरः॥ २५॥

सर्वदेवप्रियः सर्वदेवमूर्तिरनुत्तमः।
सर्वदेवैकशरणं सर्वदेवैकदेवता ॥ २६॥

यज्ञभुग्यज्ञफलदो यज्ञेशो यज्ञभावनः।
यज्ञत्राता यज्ञपुमान्वनमाली द्विजप्रियः ॥ २७॥

द्विजैकमानदो विप्रकुलदेवोऽसुरान्तकः।
सर्वदुष्टान्तकृत्सर्वसज्जनानन्यपालकः ॥ २८॥

सप्तलोकैकजठरः सप्तलोकैकमण्डनः।
सृष्टिस्थित्यन्तकृच्चक्री शार्ङ्गधन्वा गदाधरः ॥ २९॥

शङ्खभृन्नन्दकी पद्मपाणिर्गरुडवाहनः।
अनिर्देश्यवपुः सर्वपूज्यस्त्रैलोक्यपावनः॥ ३०॥

अनन्तकीर्तिर्निःसीमपौरुषः सर्वमङ्गलः ।
सूर्यकोटिप्रतीकाशो यमकोटिदुरासदः॥ ३१॥

कन्दर्पकोटिलावण्यो दुर्गाकोटयरिमर्दनः ।
समुद्रकोटिगम्भीरस्तीर्थकोटिसमाह्वयः ॥ ३२॥

ब्रह्मकोटिजगत्स्रष्टा वायुकोटिमहाबलः ।
कोटीन्दुजगदानन्दी शम्भुकोटिमहेश्वरः॥ ३३॥

कुबेरकोटिलक्ष्मीवाञ्शक्रकोटिविलासवान्।
हिमवत्कोटिनिष्कम्पः कोटिब्रह्माण्डविग्रहः॥ ३४॥

कोट्यश्वमेधपापघ्नो यज्ञकोटिसमार्चनः ।
सुधाकोटिस्वास्थ्यहेतुः कामधुक्कोटिकामदः ॥ ३५ ॥

ब्रह्मविद्याकोटिरूपः शिपिविष्टः शुचिश्रवाः ।
विश्वम्भरस्तीर्थपादः पुण्यश्रवणकीर्तनः ॥ ३६ ॥

आदिदेवो जगज्जैत्रो मुकुन्दः कालनेमिहा ।
वैकुण्ठोऽनन्तमाहात्म्यो महायोगेश्वरोत्सवः ॥ ३७ ॥

नित्यतृप्तो लसद्भावो निःशङ्को नरकान्तकः ।
दीनानाथैकशरणं विश्वैकव्यसनापहः ॥ ३८ ॥

जगत्कृपाक्षमो नित्यं कृपालुः सज्जनाश्रयः ।
योगेश्वरः सदोदीर्णो वृद्धिक्षयविवर्जितः ॥ ३९ ॥

अधोक्षजो विश्वरेताः प्रजापतिशताधिपः ।
शक्रब्रह्मार्चितपदः शम्भुब्रह्मोर्ध्वधामगाः ॥ ४० ॥

सूर्यसोमेक्षणो विश्वभोक्ता सर्वस्य पारगः ।
जगत्सेतुर्धर्मसेतुधरो विष्वधुरन्धरः ॥ ४१ ॥

निर्ममोऽखिललोकेशो निःसङ्गोऽद्भुतभोगवान् ।
वश्यमायो वश्यविश्वो विष्वक्सेनः सुरोत्तमः ॥ ४२ ॥

सर्वश्रेयःपतिर्दिव्योऽनर्घ्यभूषणभूषितः ।
सर्वलक्षणलक्षण्यः सर्वदैत्येन्द्रदर्पहा ॥ ४३ ॥

समस्तदेवसर्वस्वं सर्वदैवतनायकः ।
समस्तदेवकवचं सर्वदेवशिरोमणिः ॥ ४४ ॥

समस्तदेवतादुर्गः प्रपन्नाशनिपञ्जरः ।
समस्तभयहृन्नामा भगवान् विष्टरश्रवाः ॥ ४५ ॥

विभुः सर्वहितोदर्को हतारिः स्वर्गतिप्रदः ।
सर्वदैवतजीवेशो ब्राह्मणादिनियोजकः ॥ ४६ ॥

ब्रह्मशम्भुपरार्धायुर्ब्रह्मज्येष्ठः शिशुस्वराट् ।
विराड् भक्तपराधीनः स्तुत्यः स्तोत्रार्थसाधकः ॥ ४७ ॥

परार्थकर्ता कृत्यज्ञः स्वार्थकृत्यसदोज्झितः ।
सदानन्दः सदाभद्रः सदाशान्तः सदाशिवः ॥ ४८ ॥

सदाप्रियः सदातुष्टः सदापुष्टः सदार्चितः ।
सदापूतः पावनाग्र्यो वेदगुह्यो वृषाकपिः ॥ ४९ ॥

सहस्रनामा त्रियुगश्चतुर्मूर्तिश्चतुर्भुजः ।
भूतभव्यभवन्नाथो महापुरुषपूर्वजः ॥ ५० ॥

नारायणो मञ्जुकेशः सर्वयोगविनिःसृतः ।
वेदसारो यज्ञसारः सामसारस्तपोनिधिः ॥ ५१ ॥

साध्यश्रेष्ठः पुराणर्षिर्निष्ठा शान्तिः परायणम् ।
शिवस्त्रिशूलविध्वंसी श्रीकण्ठैकवरप्रदः ॥ ५२ ॥

नरः कृष्णो हरिर्धर्मनन्दनो धर्मजीवनः ।
आदिकर्ता सर्वसत्यः सर्वस्त्रीरत्नदर्पहा ॥ ५३ ॥

त्रिकालजितकन्दर्प उर्वशीसृङ्मुनीश्वरः ।
आद्यः कविर्हयग्रीवः सर्ववागीश्वरेश्वरः ॥ ५४ ॥

सर्वदेवमयो ब्रह्मगुरुर्वागीश्वरीपतिः ।
अनन्तविद्याप्रभवो मूलाविद्याविनाशकः ॥ ५५ ॥

सार्वज्ञ्यदो नमज्जाड्यनाशको मधुसूदनः ।
अनेकमन्त्रकोटीशः शब्दब्रह्मैकपारगः ॥ ५६ ॥

आदिविद्वान् वेदकर्ता वेदात्मा श्रुतिसागरः ।
ब्रह्मार्थवेदाहरणः सर्वविज्ञानजन्मभूः ॥ ५७ ॥

विद्याराजो ज्ञानमूर्तिर्ज्ञानसिन्धुरखण्डधीः ।
मत्स्यदेवो महाशृङ्गो जगद्बीजवहित्रधृक् ॥ ५८ ॥

लीलाव्याप्ताखिलाम्भोधिर्ऋग्वेदादिप्रवर्तकः ।
आदिकूर्मोऽखिलाधारस्तृणीकृतजगद्भरः ॥ ५९ ॥

अमरीकृतदेवौघः पीयूषोत्पत्तिकारणम् ।
आत्माधारो धाराधारो यज्ञाङ्गो धरणीधरः ॥ ६० ॥

हिरण्याक्षहरः पृथ्वीपतिः श्राद्धादिकल्पकः ।
समस्तपितृभीतिघ्नः समस्तपितृजीवनम् ॥ ६१ ॥

हव्यकव्यैकभुग्घव्यकव्यैकफलदायकः ।
रोमान्तर्लीनजलधिः क्षोभिताशेषसागरः ॥ ६२ ॥

महावराहो यज्ञघ्नध्वंसको याज्ञिकाश्रयः ।
श्रीनृसिंहो दिव्यसिंहःसर्वानिष्टार्थदुःखहा ॥ ६३ ॥

एकवीरोऽद्भुतबलो यन्त्रमन्त्रैकभञ्जनः ।
ब्रह्मादिदुःसहज्योतिर्युगान्ताग्न्यतिभीषणः ॥ ६४ ॥

कोटिवज्राधिकनखो जगद्दुष्प्रेक्ष्यमूर्तिधृक् ।
मातृचक्रप्रमथनो महामातृगणेश्वरः ॥ ६५ ॥

अचिन्त्यामोघवीर्याढ्यः समस्तासुरघस्मरः ।
हिरण्यकशिपुच्छेदी कालः संकर्षणीपतिः ॥ ६६ ॥

कृतान्तवाहनः सद्यःसमस्तभयनाशनः ।
सर्वविघ्नान्तकः सर्वसिद्धिदः सर्वपूरकः ॥ ६७ ॥

समस्तपातकध्वंसी सिद्धिमन्त्राधिकाह्वयः ।
भैरवेशो हरार्तिघ्नः कालकोटिदुरासदः ॥ ६८ ॥

दैत्यगर्भस्त्राविनामा स्फुटब्रह्माण्डगर्जितः ।
स्मृतमात्राखिलत्रातादद्भुतरूपो महाहरिः ॥ ६९ ॥

ब्रह्मचर्यशिरःपिण्डी दिक्पालोऽर्धाङ्गभूषणः ।
द्वादशार्कशिरोदामा रुद्रशीर्षैकनूपुरः ॥ ७० ॥

योगिनीग्रस्तगिरिजात्राता भैरवतर्जकः ।
वीरचक्रेश्वरोऽत्युग्रो यमादिः कालसंवरः ॥ ७१ ॥

क्रोधेश्वरो रुद्रचण्डीपरिवारादिदुष्टभुक् ।
सर्वाक्षोभ्यो मृत्युमृत्युः कालमृत्युनिवर्तकः ॥ ७२ ॥

असाध्यसर्वरोगघ्नः सर्वदुर्ग्रहसौम्यकृत् ।
गणेशकोटिदर्पघ्नो दुःसहाशेषगोत्रहा ॥ ७३ ॥

देवदानवदुर्दर्शो जगद्भयदभीषकः ।
समस्तदुर्गतित्राता जगद्भक्षकभक्षकः ॥ ७४ ॥

उग्रेशोऽम्बरमार्जारः कालमूषकभक्षकः ।
अनन्तायुधदोर्दण्डी नृसिंहो वीरभद्रजित् ॥ ७५ ॥

योगिनीचक्रगुह्येशः शक्रारिपशुमांसभुक् ।
रुद्रो नारायणो मेषरूपशङ्करवाहनः ॥ ७६ ॥

मेषरूपशिवत्राता दुष्टशक्तिसहस्रभुक् ।
तुलसीवल्लभो वीरो वामाचाराखिलेष्टदः ॥ ७७ ॥

महाशिवः शिवारूढो भैरवैककपालधृक् ।
झिल्लिचक्रेश्वरः शक्रदिव्यमोहनरूपदः ॥ ७८ ॥

गौरीसौभाग्यदो मायानिधिर्मायाभयापहः ।
ब्रह्मतेजोमयो ब्रह्मश्रीमयश्च त्रयीमयः ॥ ७९ ॥

सुब्रह्मण्यो बलिध्वंसी वामनोऽदितिदुःखहा ।
उपेन्द्रो नृपतिर्विष्णुः कश्यपान्वयमण्डनः ॥ ८० ॥

बलिस्वाराज्यदः सर्वदेवविप्रान्नदोऽच्युतः ।
उरुक्रमस्तीर्थपादस्त्रिपदस्थस्त्रिविक्रमः ॥ ८१ ॥

व्योमपादः स्वपादाम्भःपवित्रितजगत्त्रयः ।
ब्रह्मेशाद्यभिवन्द्याङ्घ्रिर्द्रुतधर्माह्रिधावनः ॥ ८२ ॥

अचिन्त्याद्भुतविस्तारो विश्ववृक्षो महाबलः ।
राहूमूर्धपराङ्गाच्छिद् भृगुपत्नीशिरोहरः ॥ ८३ ॥

पापात्त्रस्तः सदापुण्यो दैत्याशानित्यखण्डकः ।
पूरिताखिलदेवाशो विश्वार्थैकावतारकृत् ॥ ८४ ॥

स्वामायानित्यगुप्तात्मा भक्तचिन्तामणिः सदा ।
वरदः कार्तवीर्यादिराजराज्यप्रदोऽनघः ॥ ८५ ॥

विश्वश्लाघ्योऽमिताचारो दत्तात्रेयो मुनीश्वरः ।
पराशक्तिसदाश्लिष्टो योगानन्दसदोन्मदः ॥ ८६ ॥

समस्तेन्द्रारितेजोहृत्परमामृतपद्मपः ।
अनसूयागर्भरत्नं भोगमोक्षसुखप्रदः ।। ८७ ।।

जमदग्निकुलादित्यो रेणुकाद्भुतशक्तिधृक् ।
मातृहत्यादिनिर्लेपः स्कन्दजिद्विप्रराज्यदः ।। ८८ ।।

सर्वक्षत्रान्तकृद्वीरदर्पहा कार्यवीर्यजित् ।
सप्तद्वीपवतीदाता शिवार्चकयशःप्रदः ।। ८९ ।।

भीमः परशुरामश्च शिवाचार्यैकविश्वभूः ।
शिवाखिलज्ञानकोशो भीष्माचार्योऽग्निदैवतः ।। ९० ।।

द्रोणाचार्यगुरुर्विश्वजैत्रधन्वा कृतान्तजित् ।
अद्वितीयतपोमूर्तिर्ब्रह्मचर्यैकदक्षिणः ।। ९१ ।।

मनुश्रेष्ठः सता सेतुर्महीयान् वृषभो विराट् ।
आदिराजः क्षितिपिता सर्वरत्नैकदोहकृत् ।। ९२ ।।

पृथुर्जन्माद्येकदक्षो गीःश्रीकीर्तिस्वयंवृतः ।
जगद्वृत्तिप्रदश्चक्रवर्तिश्रेष्ठोऽद्वयास्त्रधृक् ।।९३।।

सनकादिमुनिप्राप्यभगवद्भक्तिवर्धनः ।
वर्णाश्रमादिधर्माणां कर्ता वक्ता प्रवर्तकः ।।९४।।

सूर्यवंशध्वजो रामो राघवः सद्गुणार्णवः ।
काकुत्स्थो वीरराजार्यो राजधर्मधुरन्धरः ।।९५।।

नित्यस्वस्थाश्रयः सर्वभद्रग्राही शुभैकदृक् ।
नवरत्नं रत्नगर्भो धर्माध्यक्षो महानिधिः ।।९६।।

सर्वश्रेष्ठाश्रयः सर्वशस्त्रास्त्रग्रामवीर्यवान् ।
जगदीशो दाशरथिः सर्वरत्नाश्रयो नृपः ।।९७।।

समस्तधर्मसूः सर्वधर्मद्रष्टाखिलर्तिहा ।
अतीन्द्रो ज्ञानविज्ञानपारद्रष्टा क्षमाम्बुधिः ।।९८।।

सर्वप्रकृष्टः शिष्टेष्टो हर्षशोकाद्यनाकुलः ।
पित्राज्ञात्यक्तसाम्राज्यः सपत्नोदयनिर्भयः ।।९९।।

गुह्यदेशार्पितैश्वर्यः शिवस्पर्धाजटाधरः ।
चित्रकूटाप्तरत्नाद्रिर्जगदीशो वनेचरः ॥१००॥

यथेष्टामोघसर्वास्त्रो देवेन्द्रतनयाक्षिहा ।
ब्रह्मेन्द्रादिनतैषीको मारीचघ्नो विराधहा ॥१०१॥

ब्रह्मशापहताशेषदण्डकारण्यपावन ।
चतुर्दशसहस्त्रोग्ररक्षोघ्नैकशरैकधृक् ॥१०२॥

खरारिस्त्रिशिरोहन्ता दूषणघ्नो जनार्दनः ।
जटायुषोऽग्निगतिदोऽगस्त्यसर्वस्वमन्त्रराट् ॥१०३॥

लीलाधनुष्कोटयपास्तदुन्दुभ्यस्थिमहाचलः ।
सप्ततालव्यधाकृष्टध्वस्तपातालदानवः ॥१०४॥

सुग्रीवराज्यदोऽहीनमनसैवाभयप्रदः ।
हनुमद्रुद्रमुख्येशः समस्तकपिदेहभृत् ॥१०५॥

सनागदैत्यवाणैकव्याकुलीकृतसागरः ।
सम्लेच्छकोटिवाणैकशुष्कनिर्गन्धसागरः ॥१०६॥

समुद्राद्भुतपूर्वैकवद्धसेतुर्यशोनिधिः ।
असाध्यसाधको लङ्कासमूलोत्सादक्षिणः ॥१०७॥

वरदृप्तजगच्छल्यपौलस्त्यकुलकृन्तनः ।
रावणिघ्नः प्रहस्तच्छित्कुम्भकर्णभिदुग्रहा ॥१०८॥

रावणैकशिरश्छेत्ता निःशङ्केन्द्रैकराज्यदः ।
स्वर्गास्वर्गत्वविच्छेदी देवेन्द्रानिन्द्रताहरः ॥१०९॥

रक्षोदेवत्वहृद्धर्माधर्मत्वघ्नः पुरुष्टुतः ।
नतिमात्रदशास्यारिर्दत्तराज्यविभीषणः ॥११०॥

सुधावृष्टिमृताशेषस्वसैन्योज्जीवनैककृत् ।
देवब्राह्मणनामैकधाता सर्वामरार्चितः ॥१११॥

ब्रह्मसूर्येन्द्ररुद्रादिवृन्दार्पितसतीप्रियः ।
अयोध्याखिलराजन्यः सर्वभूतमनोहरः ॥११२॥

स्वाम्यतुल्यकृपादण्डो हीनोत्कृष्टैकसत्प्रियः ।
श्वपक्ष्यादिन्यायदर्शी हीनार्थाधिकसाधकः ॥११३॥

वधव्याजानुचितकृत्तारकोऽखिलतुल्यकृत् ।
पावित्र्याधिक्यमुक्तात्मा प्रियात्यक्तः स्मरारिजित् ॥११४॥

साक्षात्कुशलवच्छद्मद्रावितो ह्यपराजितः ।
कोसलेन्द्रो वीरबाहुः सत्यार्थत्यक्तसोदरः ॥११५॥

शरसंधाननिर्धूतधरणीमण्डलो जयः ।
ब्रह्मादिकामसांनिध्यसनाथीकृतदैवतः ॥११६॥

ब्रह्मलोकाप्तचाण्डालाद्यशेषप्राणिसार्थकः ।
स्वर्नीतगर्दभश्वादिश्चिरायोध्यावनैककृत् ॥११७॥

रामो द्वितीयसौमित्रिर्लक्ष्मणः प्रहतेन्द्रजित् ।
विष्णुभक्तः सरामाङ्घ्रिपादुकाराज्यनिर्वृतिः ॥११८॥

भरतोऽसह्यगन्धर्वकोटिघ्नो लवणान्तकः ।
शत्रुघ्नो वैद्यराडायुर्वेदगर्भौषधीपतिः ॥ ११९ ॥

नित्यामृतकरो धन्वन्तरिर्यज्ञो जगद्धरः ।
सूर्यारिघ्नः सुराजीवो दक्षिणेशो द्विजप्रियः ॥ १२० ॥

छिन्नमूर्धापदेशार्कः शेषाङ्गस्थापितामरः ।
विश्वार्थशेषकृद्राहुशिरश्छेत्ताक्षताकृतिः ॥ १२१ ॥

वाजपेयादिनामाग्निर्वेदधर्मपरायणः ।
श्वेतद्वीपपतिः सांख्यप्रणेता सर्वसिद्धिराट् ॥ १२२ ॥

विश्वप्रकाशितज्ञानयोगमोहतमिस्रहा ।
देवहूत्यात्मजः सिद्धः कपिलः कर्दमात्मजः ॥ १२३ ॥

योगस्वामी ध्यानभङ्गसगरात्मजभस्मकृत् ।
धर्मो वृषेन्द्रः सुरभीपतिः शुद्धात्मभावितः ॥ १२४ ॥

शम्भुस्त्रिपुरदाहैकस्थैर्यविश्वरथोद्वहः ।
भक्तशम्भुजितो दैत्यामृतवापीसमस्तपः ॥ १२५ ॥

महाप्रलयविश्वैकनिलयोऽखिलनागराट् ।
शेषदेवः सहस्राक्षः सहस्रास्यशिरोभुजः ॥ १२६ ॥

फणामणिकणाकारयोजिताच्छाम्बुदक्षितिः ।
कालाग्निरुद्रजनको मुशलास्त्रो हलायुधः ॥ १२७ ॥

नीलाम्बरो वारुणीशो मनोवाक्कायदोषहः ।
असंतोषदृष्टिमात्रपतितैकदशाननः ॥ १२८ ॥

बिलसंयमनो घोरो रौहिणेयः प्रलम्बहा ।
मुष्टिकघ्नो द्विविदहा कालिन्दीकर्षणो बलः ॥ १२९ ॥

रेवतीरमणः पूर्वंभक्तिखेदाच्युताग्रजः ।
देवकीवसुदेवाव्हकश्यपादितिनन्दनः ॥ १३० ॥

वार्ष्णेयः सात्वतां श्रेष्ठः शौरिर्यदुकुलेश्वरः ।
नराकृतिः परं ब्रह्म सव्यसाचिवरप्रदः ॥ १३१ ॥

ब्रह्मादिकाम्यलालित्यजगदाश्चर्यशैशवः
पूतनाघ्नः शकटभिद्यमलार्जुनभञ्जकः ॥ १३२ ॥

वातासुरारिः केशिघ्नो धेनुकारिर्गवीश्वरः ।
दामोदरो गोपदेवो यशोदानन्ददायकः ॥ १३३ ॥

कालीयमर्दनः सर्वगोपगोपीजनप्रियः ।
लीलागोवर्धनधरो गोविन्दो गोकुलोत्सवः ॥ १३४ ॥

अरिष्टमथनः कामोन्मत्तगोपीविमुक्तिदः ।
सद्यःकुवलयापीडघाती चाणूरमर्दनः ॥ १३५ ॥

कंसारिरुग्रसेनादिराज्यव्यापारितामरः ।
सुधर्माङ्कितभूलोको जरासंधबलान्तकः ॥ १३६ ॥

त्यक्तभग्नजरासंघो भीमसेनयशःप्रदः ।
सांदीपनिमृतापत्यदाता कालान्तकादिजित् ॥ १३७ ॥

समस्तनारकत्राता सर्वभूपतिकोटिजित् ।
रुक्मिणीरमणो रुक्मिशासनो नरकान्तकः ॥ १३८ ॥

समस्तसुन्दरीकान्तो मुरारिर्गरुडध्वजः ।
एकाकिजितरुद्रार्कमरुदाद्यखिलेश्वरः ॥ १३९ ॥

देवेन्द्रदर्पहा कल्पद्रुमालंकृतभूतलः ।
बाणबाहुसहस्रच्छिन्नन्याद्यादिगणकोटिजित् ॥ १४० ॥

लीलाजितमहादेवो महादेवैकपूजितः ।
इन्द्रार्थार्जुननिर्भङ्गजयदः पाण्डवैकधृक् ॥ १४१ ॥

काशिराजशिरश्छेत्ता रुद्रशक्त्येकमर्दनः ।
विश्वेश्वरप्रसादाढ्यः काशिराजसुतार्दनः ॥ १४२ ॥

शम्भुप्रतिज्ञाविध्वंसी काशीनिर्दग्धनायकः ।
काशीशगणकोटिघ्नो लोकशिक्षाद्विजार्चकः ॥ १४३ ॥

शिवतीव्रतपोवश्यः पुराशिववरप्रदः ।
शङ्करैकप्रतिष्ठाधृक्स्वांशशङ्करपूजकः ॥ १४४ ॥

शिवकन्याव्रतपतिः कृष्णरूपशिवारिहा ।
महालक्ष्मीवपुगौरीत्राता वैदलवृत्रहा ॥ १४५ ॥

स्वधाममुचुन्दैकनिष्कालयवनेष्टकृत् ।
यमुनापतिरानीतपरिलीनद्विजात्मजः ॥ १४६ ॥

श्रीदामरङ्कभक्तार्थभूम्यानीतेन्द्रवैभवः ।
दुर्वृत्तशिशुपालैकमुक्तिदो द्वारकेश्वरः ॥ १४७ ॥

आचाण्डालादिकप्राप्यद्वारकानिधिकोटिकृत् ।
अक्रूरोद्धवमुख्यैकभक्तः स्वच्छन्दमुक्तिदः ॥ १४८ ॥

सबालस्त्रीजलक्रीडामृतवापीकृतार्णवः ।
ब्रह्मास्त्रदग्धगर्भस्थपरीक्षिज्जीवनैककृत् ॥ १४९ ॥

परिलीनद्विजसुतोनेतार्जुनमदापहः ।
गूढमुद्राकृतिग्रस्तभीष्माद्यखिलकौरवः ॥ १५० ॥

यथार्थखण्डिताशेषदिव्यास्त्रपार्थमोहहृत् ।
गर्भशापच्छलध्वस्तयादवोर्वीभरापहः ॥ १५१ ॥

जराव्याधारिगतिदः स्मृतमात्राखिलेष्टदः ।
कामदेवो रतिपतिर्मन्मथः शम्बरान्तकः ॥ १५२ ॥

अनङ्गो जितगौरीशो रतिकान्तः सदेप्सितः ।
पुष्पेषुर्विश्वविजयी स्मरः कामेश्वरीप्रियः ॥ १५३ ॥

ऊषापतिर्विश्वकेतुर्विश्वतृप्तोऽधिपूरुषः ।
चतुरात्मा चतुर्व्यूहश्चतुर्युगविधायकः ॥ १५४ ॥

चतुर्वेदैकविश्वात्मा सर्वोत्कृष्टांशकोटिसूः ।
आश्रमात्मा पुराणर्षिर्व्यासः शाखासहस्रकृत् ॥ १५५ ॥

महाभारतनिर्माता कवीन्द्रो बादरायणः।
कृष्णद्वैपायनः सर्वपुरुषार्थैकबोधकः ॥ १५६ ॥

वेदान्तकर्ता ब्रह्मैकव्यञ्जकः पुरुवंशकृत् ।
बुद्धो ध्यानजिताशेषदेवदेवीजगत्प्रियः ॥ १५७ ॥

निरायुधो जगज्जैत्रः श्रीधनो दुष्टमोहनः ।
दैत्यवेदबहिष्कर्ता वेदार्थश्रुतिगोपकः ॥ १५८ ॥

शौद्धोदनिर्दृष्टदिष्टः सुखदः सदसस्पतिः ।
यथायोग्याखिलकृपः सर्वशून्योऽखिलेष्टदः ॥ १५९ ॥

चतुष्कोटिपृथक्तत्त्वप्रज्ञापारमितेश्वरः ।
पाखण्डवेदमार्गेशः पाखण्डश्रुतिगोपकः ॥ १६० ॥

कल्की विष्णुयशःपुत्रः कलिकालविलोपकः ।
समस्तम्लेच्छदुष्टघ्नः सर्वशिष्टद्विजातिकृत् ॥ १६१ ॥

सत्यप्रवर्तको देवद्विजदीर्घक्षुधापहः ।
अश्ववारादिरेकान्तपृथ्वीदुर्गतिनाशनः ॥ १६२ ॥

सद्यःक्ष्मानन्तलक्ष्मीकृन्नष्टनिःशेषधर्मवित् ।
अनन्तस्वर्णयागैकहेमपूर्णाखिलद्विजः ॥ १६३ ॥

असाध्यैकजगच्छास्ता विश्वबन्धो जयध्वजः ।
आत्मतत्त्वाधिपः कर्तृश्रेष्ठो विधिरुमापतिः ॥ १६४ ॥

भर्तृश्रेष्ठः प्रजेशाग्र्यो मरीचिर्जनकाग्रणीः ।
कश्यपो देवराडिन्द्रः प्रल्हादो दैत्यराट् शशी ॥ १६५ ॥

नक्षत्रेशो रविस्तेजःश्रेष्ठः शुक्रः कवीश्वरः ।
महर्षिराड्भृगुर्विष्णुरादित्येशो बलिस्वराट् ॥ १६६॥

वायुर्वन्हिः शुचिश्रेष्ठः शङ्करो रुद्रराड्गुरूः ।
विद्वत्तमश्चित्ररथो गन्धर्वाग्र्योऽक्षरोत्तमः ॥ १६७ ॥

वर्णादिरग्र्यस्त्री गौरी शक्त्यग्र्या श्रीश्च नारदः ।
देवर्षिराट्पाण्डवाग्र्योऽर्जुनो वादः प्रवादराट् ॥ १६८॥

पावनः पावनेशानो वरुणो यादसां पतिः ।
गङ्गा तीर्थोत्तमो द्यूतं छलकाग्र्यं वरौषधम् ॥ १६९ ॥

अन्नं सुदर्शनोऽस्त्राग्र्यं वज्रं प्रहरणोत्तमम् ।
उच्चैःश्रवा वाजिराज ऐरावत इभेश्वरः ॥ १७० ॥

अरुन्धत्येकपत्नीशो ह्यश्वत्थोऽशेषवृक्षराट् ।
अध्यात्मविद्या विद्याग्र्यः प्रणवश्छन्दसां वरः ॥ १७१ ॥

मेरुगिरिपतिर्मार्गो मासाग्र्यः कालसत्तमः ।
दिनाद्यात्मा पूर्वसिद्धः कपिलः साम वेदराट् ॥ १७२ ॥

तार्क्ष्यः खगेन्द्र ऋत्वग्र्यो वसन्तः कल्पपादपः ।
दातृश्रेष्ठः कामधेनुरार्तिघ्नाग्र्यः सुहृत्तमः ॥ १७३ ॥

चिन्तामणिर्गुरुश्रेष्ठो माता हिततमः पिता ।
सिंहो मृगेन्द्रो नागेन्द्रो वासुकिर्नृवरो नृपः ॥ १७४ ॥

वर्णेशो ब्राह्मणश्चेतः करणाग्र्यं नमो नमः ।
इत्येतद्वासुदेवस्य विष्णोर्नामसहस्रकम् ॥ १७५ ॥

(उत्तरखंड, ७२ वा अध्याय)

## २. श्रीरामकृत महादेवस्तुती

नमस्ते देवदेवेश भक्तानामभयंकर ।
गौरीकान्त नमस्तुभ्यं दक्षयज्ञविनाशन ॥

नमः शर्वाय रुद्राय भवाय वरदाय च ।
पशूनां पतये नित्यमुग्राय च कपर्दिने ॥

महादेवाय भीमाय त्र्यम्बकाय विशाम्पते ।
ईशानाय भगघ्नाय नमोऽस्त्वन्धकघातिने ॥

नीलग्रीवाय भीमाय वेधसे वेधसा स्तुत ।
कुमारशत्रुनिघ्नाय कुमारजननाय च ॥

विलोहिताय धूम्राय शिवाय क्रथनाय च ।
नित्यं नीलशिखण्डाय शूलिने दिव्यशायिने ॥

उग्राय च त्रिनेत्राय हिरण्यवसुरेतसे ।
अचिन्त्यायाम्बिकाभर्त्रे सर्वदेवस्तुताय च ॥

अभिगम्याय काम्याय सद्योजाताय वै नमः ।
वृषध्वजाय मुण्डाय जटिने ब्रह्मचारिणे ॥

तप्यमानाय शान्ताय ब्रह्मण्याय जयाय च ।
विश्वात्मने विश्वसृजे विश्वमावृत्य तिष्ठते ॥

नमो नमस्ते दिव्याय प्रपन्नार्तिहराय च ।
भक्तानुकम्पिने नित्यं विश्वतेजोमनोगते ॥

(सृष्टिखंड ३५.१३९-१४७)

भक्तांना अभय देणाऱ्या देवेश्वरा, आपणांस नमस्कार असो. दक्षयज्ञाचा विध्वंस करणाऱ्या गौरीपते, आपणांस नमस्कार असो. आपणच शर्व, रुद्र, भव व वरद या नावांनी प्रसिद्ध आहात. आपणांस नमस्कार असो. आपणच जीवांचे स्वामी आहात. आपण नित्य उग्र

स्वरूप धारण करून जटाजूट मस्तकावर धारण करता. आपणांस नमस्कार असो. आपणच महादेव आहात, भीम व त्र्यंबक आहात. आपणांस नमस्कार असो. प्रजापालक, सर्वांचे ईश्वर, भग देवाचे नेत्र फोडणारे, अंधकासुरास मारणारे आपणच आहात. आपणांस नमस्कार असो. आपण नीलकंठ, भीम, वेधा, ब्रह्मदेवांकडून स्तुती केलेले, कुमार कार्तिकेयाच्या शत्रूचा नाश करणारे, कुमारास जन्म देणारे, विलोहित, धूम्र, शिव, क्रथन, नीलशिखंड, शूली, दिव्यशायी, उग्र, त्रिनेत्र आदी नावांनी आपणच प्रसिद्ध आहात. सोने व धन हे आपले वीर्य आहे. आपले स्वरूप कोणाच्याच चिंतनात येऊ शकत नाही. आपण देवी पार्वतीचे स्वामी आहात. सर्व देव आपलीच स्तुती करतात. आपण शरण येण्यास योग्य, कामना करण्यास योग्य, सद्योजात नावाने प्रसिद्ध आहात. आपणांस नमस्कार असो. आपल्या ध्वजेत ऋषभाचे चिन्ह आहे. आपण मुंडित पण आहात. जटाधारी पण आहात. आपण ब्रह्मचर्यव्रताचे पालन करणारे, तपस्वी, शांत, ब्राह्मणभक्त, जयस्वरूप, विश्वाचा आत्मा, जगताची सृष्टी करणारे, सर्व विश्वाला व्यापून असणारे आहात. आपणांस नमस्कार असो. आपण दिव्यस्वरूप, शरणागताचे कष्ट दूर करणारे, भक्तांवर सदा दया करणारे, विश्वाच्या तेजात व मनात व्याप्त असणारे आहात. आपणांस वारंवार नमस्कार असो.

शर्व– प्रलयकाळात जगताचा संहार करणारे

रुद्र– जगतास रडविणारे

भव– जगताची उत्पत्ती करणारे

वरद– वर देणारे

भीम– भयंकर रूप धारण करणारे

त्र्यंबक– तीन डोळ्यांचे

वेधा– विधाता

विलोहित– लाल रंगाचे

धूम्र– धुराच्या रंगाचे

शिव– कल्याणस्वरूप

क्रथन– मारणारे

नीलशिखंड– निळ्या रंगाची जटा धारण करणारे

शूली– त्रिशूलधारी

दिव्यशायी– दिव्यस्वरूपात शयन करणारे

सद्योजात– भक्तांच्या प्रार्थनेने प्रसन्न होणारे

## ३. सुव्रतकृत जनार्दनस्तुती

संसारसागरमतीव गभीरपारं ।
दुःखोर्मिभिर्विविधमोहमयैस्तरङ्गैः ॥
सम्पूर्णमस्ति निजदोषगुणैस्तु प्राप्तं ।
तस्मात् समुद्धर जनार्दन मां सुदीनम् ॥१॥

कर्माम्बुदे महति गर्जति वर्षतीव ।
विद्युल्लतोल्लसति पातकसञ्चयैर्मे ॥
मोहान्धकारपटलैर्मम नष्टदृष्टे– ।
र्दीनस्य तस्य मधुसूदन देहि हस्तम् ॥२॥

संसारकाननवरं बहुदुःखवृक्षैः ।
संसेव्यमानमपि मोहमयैश्च सिंहैः ॥
संदीप्तमस्ति करुणाबहुवन्हितेजः ।
संतप्यमानमनसं परिपाहि कृष्ण ॥३॥

संसारवृक्षमतिजीर्णमपीह उच्चं ।
मायासुकन्दकरुणा बहुदुःखशाखम् ॥
जायादिसङ्घछदनं फलितं मुरारे ।
तं चाधिरुढपतितं भगवन् हि रक्ष ॥४॥

दुःखानलैर्विविधमोहमयैः सुधूमैः ।
शोकैर्वियोगमरणान्तकसंनिभैश्च ॥
दग्धोऽस्मि कृष्ण सततं मम देहि मोक्षं ।
ज्ञानाम्बुनाथ परिषिच्य सदैव मां त्वम् ॥४॥

मोहान्धकारपटले महतीव गर्ते ।
संसारनाम्नि सततं पतितं हि कृष्ण ॥
कृत्वा तरीं मम हि दीनभयातुरस्य ।
तस्माद् विकृष्य शरणं नय मामितस्त्वम् ॥५॥

त्वामेव ये नियतमानसभावयुक्ता ।
ध्यायन्त्यनन्यमनसा पदवीं लभन्ते ।।
नत्वैव पादयुगलं च महत्सुपुण्यं ।
ये देवकिन्नरगणाः परिचिन्तयन्ति ।।६।।

नान्यं वदामि न भजामि न चिन्तयामि ।
त्वत्पादपद्मयुगलं सततं नमामि ।।
एवं हि मामुमगतं शरणं च रक्ष ।
दूरेण यान्तु मम पातकसञ्चयास्ते ।।७।।

दासोऽस्मि भृत्यवदहं तव जन्म जन्म
त्वत्पादपद्मयुगलं सततं नमामि ।।८।।
(भूमिखंड २१.२०-२७)

जनार्दना, हा संसारसागर अत्यंत खोल असून याचा पार लागणे अतिशय कठीण आहे. दुःखमय लहरी, मोहमयी विविध तरंग यांनी हा भरलेला आहे. मी अत्यंत दीन आहे. आपल्याच गुणदोषांनी, पाप-पुण्यांनी प्रेरित होऊन फसलेलो आहे. म्हणून आपण माझा उद्धार करावा.

कर्मरूपी मेघांचे मोठमोठे समुदाय आले आहेत. ते गरजत आहेत. वर्षाव करीत आहेत. माझ्या पातकांची राशी विद्युल्लतेप्रमाणे त्यांतून चमकत आहे. मोहरूपी अंधकारसमूहात माझी विवेकशक्ती नष्ट झाली आहे. मी अत्यंत दीन झालो आहे. मधुसूदना, मला आपल्या हातांचा सहारा द्यावा.

हा संसार म्हणजे एक महान वन आहे. यात खूपच दुःखे वृक्ष-रूपाने स्थित आहेत. मोहरूपी सिंह यात निर्भय बनून निवास करतात. यात शोकरूपी प्रचंड दावानल प्रज्वलित झाला आहे. त्याच्या आचेने माझे चित्त संतप्त बनून गेले आहे. कृष्णा, मला यातून वाचवावे.

हा संसार एका वृक्षाप्रमाणे आहे. हा अतिशय जुनापुराणा झाल्यामुळे फार उंचही आहे. माया याची मूळ आहे. शोक व नाना

प्रकारची दुःखे याच्या शाखा आहेत. पत्नी व परिवाराचे लोक याची पाने आहेत. यास अनेक प्रकारची फले लगडलेली आहेत. मुरारे, मी या संसारवृक्षावर चढून पडू लागलो आहे. या वेळी आपण माझे रक्षण करावे.

श्रीकृष्णा, दुःखरूपी अग्नीत, विविध प्रकारच्या मोहरूपी धुरांत, वियोग, मृत्यू, काल यांच्यासारख्या शोकाने मी जळत आहे. आपण नेहमी ज्ञानरूप जलाचे सिंचन करून मला कायमचे या संसार-बंधनातून मुक्त करावे.

कृष्णा, मी या मोहरूपी अंधकाराच्या राशीत, या संसार नावाच्या महान खड्ड्यात सतत पडतो आहे. मी दीन आहे. भयाने अत्यंत व्याकुळ बनलो आहे. आपण माझ्यासाठी नौका बनावे. मला या खड्ड्या-तून बाहेर काढावे. तेथून वर खेचून आपणांस शरण आणावे.

संयमशील राहून जो हृदयाच्या भावाने, अनन्य चित्ताने आपले ध्यान करतो तोच आपल्या पदवीपर्यंत पोचतो. जे देव, जे किन्नरगण आपल्या दोनही पवित्र चरणांना प्रणाम करतात, त्यांचे चिंतन करतात, तेही आपल्याच पदवीस प्राप्त होतात.

मी तर दुसऱ्याचे नाव घेत नाही. दुसऱ्याचे भजन करीत नाही. दुसऱ्याचे चिंतन करीत नाही. नित्य निरंतर मी आपल्याच चरणयुगलांना प्रणाम करतो. या प्रकाराने मी आपणांस शरण आलो आहे. आपण माझे रक्षण करावे. माझा पातकसमूह त्वरित दूर व्हावा.

मी दासाप्रमाणे जन्मजन्म आपलीच सेवा करीन. भगवन्, मी आपल्या चरणयुगलांस, पदकमलांस सतत नमस्कार करीत आहे.

## ४. कुंजलकृत शतनामस्तोत्र

नामाम्यहं हृषीकेशं केशवं मधुसूदनम् ।
सूदनं सर्वदैत्यानां नारायणमनामयम् ।।
जयन्तं विजयं कृष्णमनन्तं वामनं तथा ।
विष्णुं विश्वेश्वरं पुण्यं विश्वात्मानं सुरार्चितम् ।।
अनघं त्वघहर्तारं नारसिंहं श्रियःप्रियम् ।
श्रीमतिं श्रीधरं श्रीदं श्रीनिवासं महोदयम् ।।
श्रीरामं माधवं मोक्षं क्षमारूपं जनार्दनम् ।
सर्वज्ञं सर्ववेत्तारं सर्वेशं सर्वदायकम् ।।
हरिं मुरारिं गोविन्दं पद्मनाभं प्रजापतिम् ।
आनन्दं ज्ञानसंम्पन्नं ज्ञानदं ज्ञानदायकम् ।।
अच्युतं सबलं चन्द्रवक्त्रं व्याप्तपरावरम् ।
योगेश्वरं जगद्योनिं ब्रह्मरूपं महेश्वरम् ।।
मुकुंदं चापि वैकुण्ठमेकरूपं कविं ध्रुवम् ।
वासुदेवं महादेवं ब्रह्मण्यं ब्राह्मणप्रियम् ।।
गोप्रियं गोहितं यज्ञं यज्ञाग्ङं यज्ञवर्धनम् ।
यज्ञस्यापि सुभोक्तारं वेदवेदाङ्गपारगम् ।।
वेदज्ञं वेदरूपं तं विद्यावासं सुरेश्वरम्
प्रत्यक्षं च महाहंसं शङ्खपाणिं पुरातनम् ।।
पुष्करं पुष्कराक्षं च वाराहं धरणीधरम् ।
प्रद्युम्नं कामपालं च व्यासध्यातं महेश्वरम्
सर्वसौख्यं महासौख्यं सांख्यं च पुरुषोत्तमम् ।
योगरूपं महाज्ञानं योगीशमजितं प्रियम् ।।
असुरारिं लोकनाथं पद्महस्तं गदाधरम् ।
गुहावासं सर्ववासं पुण्यवासं महाजनम् ।।

वृन्दानाथं बृहत्कायं पावनं पापनाशनम् ।
गोपीनाथं गोपसखं गोपालं गोगणाश्रयम् ॥
परात्मानं पराधीशं कपिलं कार्यमानुषम् ।
नमामि निखिलं नित्यं मनोवाक्कायकर्मभिः ॥
नाम्नां शतेनापि तु पुण्यकर्ता यः स्तौति कृष्णं मनसा स्थिरेण ।
स याति लोकं मधुसूदनस्य विहाय दोषानिह पुण्यभूतः॥
नाम्नां शतं महापुण्यं सर्वपातकशोधनम् ।
अनन्यमनसा ध्यायेज्जपेद्ध्यानसमन्वितः ॥
नित्यमेव नरः पुण्यं गङ्गास्नानफलं लभेत् ।
तस्मात्तु सुस्थिरो भूत्वा समाहितमना जपेत् ॥
(भूमिखण्ड ८७.९–२५)

'हृषिकेश (इंद्रियांचा स्वामी), केशव, मधुसूदन, सर्वदैत्यसूदन, नारायण, अनामय, (रोगशोकरहित), जयन्त, विजय, कृष्ण, अनंत, वामन, विष्णू, विश्वेश्वर, पुण्य, विश्वात्मा, सुरार्चित (देवांकडून पूजित), अनघ (पापरहित), अघहर्ता, नारसिंह, श्रीप्रिय, श्रीपती, श्रीह (लक्ष्मी प्रदान करणारा), श्रीनिवास, महोदय, श्रीराम, माधव, मोक्ष, क्षमारूप, जनार्दन, सर्वज्ञ, सर्ववेत्ता, सर्वेश्वर, सर्वदायक, हरी, मुरारी, गोविंद, पद्मनाभ, प्रजापती, आनंद, ज्ञानसंपन्न, ज्ञानद, ज्ञानदायक, अच्युत, सबल, चंद्रवक्त्र (चंद्राप्रमाणे मोहक मुख असणारा), व्याप्तपरावर (कार्यकारणरूप संपूर्ण जगास व्यापणारा), योगेश्वर, जगद्योनी (जगाचे उत्पत्तिस्थान), ब्रह्मरूप, महेश्वर, मुकुंद, वैकुंठ, एकरूप, कवी, ध्रुव, वासुदेव, महादेव, ब्रह्मण्य, ब्राह्मणप्रिय, गोप्रिय, गोहित, यज्ञ, यज्ञांग, यज्ञवर्धन, यज्ञभोक्ता, वेदवेदांगपारग, वेदज्ञ, विद्यावास, सुरेश्वर, प्रत्यक्ष, महाहंस, शंखपाणी, पुरातन, पुष्कर, पुष्कराक्ष, वाराह, धरणीधर, प्रद्युम्न, कामपाल, व्यासध्यात (व्यासांकडून चिंतित), महेश्वर, सर्व-सौख्य, मयासौख्य सांख्य, पुरुषोत्तम, योगरूप, महाज्ञान, योगीश्वर, अजित,

प्रिय, असुरारी, लोकनाथ, पद्महस्त, गदाधर, गुहावास, सर्ववास, पुण्यवास, महाजन, वृन्दानाथ, बृहत्काय, पावन, पापनाशन, गोपीनाथ, गोपसख, गोपाल, गोगणाश्रय, परात्मा, पराधीश, कपिल व कार्यमानुष (जगाचा उद्धार करण्यासाठी मनुष्यशरीर धारण करणारा) आदी नामांनी प्रसिद्ध असलेल्या परमेश्वरास मी प्रतिदिन मन, वाणी, क्रिया यांच्याद्वारे नमस्कार करतो.

जो पुण्यात्मा पुरुष शतनामस्तोत्र वाचून, म्हणून स्थिरचित्ताने भगवान श्रीकृष्णांची स्तुती करतो, तो सर्व दोषांचा त्याग करून या लोकात पुण्यवान होतो व अंतकाळी भगवान मधुसूदनाच्या लोकी जातो. हे शतनामस्तोत्र महान पुण्याचे जनक असून सर्व पातकांना नाहीसे करणारे आहे. मनुष्याने ध्यानयुक्त होऊन अनन्यचित्ताने याचा जप करावा. चिंतन करावे. प्रतिदिन याचा जप केल्याने पुरुषास नित्यप्रती गंगास्नान केल्याचे फल मिळते. म्हणून सुस्थिर व एकाग्रचित्त होऊन या स्तोत्राचा जप करणे उचित आहे.

## ५. कुंजलकृत श्रीवासुदेवाभिधानस्तोत्र (अंशमात्र)

परमं पावनं पुण्यं वेदज्ञं वेदमन्दिरम् ।
विद्याधारं मखाधारं प्रणवं तं नमाम्यहम् ।।
निरावासं निराकारं सुप्रकाशं महोदयम् ।
निर्गुणं गुणकर्तारं नमामि प्रणवं परम् ।।
गायत्रीसाम गायन्तं गीतज्ञं गीतसुप्रियम् ।
गंधर्वगीतभोक्तारं प्रणवं तं नमाम्यहम् ।।
महाकान्तं महोत्साहं महामोहविनाशनम् ।
अचिन्त्यन्तं जगत् सर्वं गुणातीतं नमाम्यहम् ।।
भाति सर्वत्र यो भूत्वा भूतानां भूतिवर्धनः ।
समभावाय सद्धर्मं नमामि प्रणवं परम् ।।

विचारं वेदरूपं तं यज्ञाख्यं यज्ञवल्लभम् ।
योनिं सर्वस्य लोकस्य ओंकारं प्रणमाम्यहम् ।।
तारकं सर्वलोकानां नौरूपेण विराजितम् ।
संसारार्णवमग्नानां नमामि प्रणवं हरिम् ।।
वसते सर्वभूतेषु एकरूपेण नैकधा ।
धामकैवल्यरूपेण नमामि वरदं सुखम् ।।
सूक्ष्मं सूक्ष्मतरं शुद्धं निर्गुणं गुणनायकम् ।
वर्जितं प्राकृतैर्भावैर्वेदाख्यं तं नमाम्यहम् ।।
देवदैत्यवियोगैश्च वर्जितं तुष्टिभिस्तथा ।
वेदैश्च योगभिर्ध्येयं तमोङ्कारं नमाम्यहम् ।।
व्यापकं विश्ववेत्तारं विज्ञानं परमं पदम् ।
शिवं शिवगुणं शांतं वन्दे प्रणवमीश्वरम् ।।
यस्य मायां प्रविष्टास्तु ब्रह्माद्याश्च सुरासुराः ।
न विन्दन्ति परं शुद्धं मोक्षद्वारं नमाम्यहम् ।।

(भूमिखण्ड ९८.३९–५०)

जो परम पावन, पुण्यस्वरूप, वेदांचा ज्ञाता, वेदमंदिर, विद्येचा आधार, यज्ञाचा आश्रय आहे त्या प्रणवस्वरूप परमात्म्यास मी नमस्कार करतो. जो आवास (गृह) व आकार यांनी रहित, उत्तम प्रकाशरूप, महान अभ्युदयशाली, निर्गुण तथा गुणांचा उत्पादक आहे, त्या प्रणव-स्वरूप परमात्म्यास मी प्रणाम करतो. जो गायत्री-सामाचे गायन करतो, गीताचा ज्ञाता, गीतप्रेमी व गंधर्वगीताचा अनुभव करतो, त्या प्रणव-स्वरूप परमात्म्यास मी नमस्कार करतो.

जो महान कांतिमान आहे, अत्यंत उत्साही आहे, महामोहाचा नाशक आहे, सर्व जगात व्यापक व गुणातीत आहे, जो सर्वत्र विद्यमान राहून शोभायमान होतो, प्राण्यांचे ऐश्वर्य व कल्याण यांची वृद्धी करतो, समतेचा भाव निर्माण व्हावा म्हणून जो सद्धर्माचा प्रसार करतो, त्या प्रणवस्वरूप परमेश्वरास मी नमस्कार करतो. जो विचारक आहे, वेद

ज्याचे स्वरूप आहे, जो 'यज्ञ' या नावानें पुकारला जातो, यज्ञ ज्याला अत्यंत प्रिय आहे, जो सर्व विश्वाचे उत्पत्तिस्थान आहे, जो सर्व जगाचा उद्धार करतो, संसारसागरात बुडणाऱ्या प्राण्यांना वाचविण्यासाठी जो नौकारूपाने विराजमान आहे, त्या प्रणवस्वरूप श्रीहरीस मी प्रणाम करतो.

जो सर्व भूतांत निवास करतो, नाना रूपांनी प्रतीत होतो, तरीसुद्धा एकरूपानें विराजमान असतो, जो परमधाम व कैवल्य (मोक्ष) या रूपांत प्रतिष्ठित आहे, जो सुखस्वरूप वरदाता आहे, त्या भगवानास मी प्रणाम करतो. जो सूक्ष्म, सूक्ष्मतर, शुद्ध, निर्गुण गुणांचा नियंता व प्राकृत भावांनी रहित आहे, त्या वेदसंज्ञक परमात्म्यास नमस्कार असो. जो देव व दैत्य यांच्या वियोगाने वर्जित, तुष्टींनी रहित, वेदांचे व योग्यांचे ध्येय जो आहे त्या ॐकाररूप परमेश्वरास मी नमस्कार करतो. व्यापक, विश्वाचा ज्ञाता, विज्ञानस्वरूप, परमपदरूप, शिव, कल्याणमय गुणांनी युक्त, शांत व प्रणवस्वरूप ईश्वरास मी नमस्कार करतो. ज्याच्या मायेच्या प्रभावानें ब्रह्मा आदी देव व असुरही त्याच्या स्वरूपास जाणीत नाहीत, जो मोक्षाचे द्वार आहे, त्या परमात्म्यास मी नमस्कार करतो.

## ६. शंकुकर्णकृत कपर्दीश्वरस्तोत्र

कपर्दिनं त्वां परतः परस्ताद् गोप्तारमेकं पुरुषं पुराणम् ।
व्रजामि योगेश्वरमीशितारमादित्यमग्निं कपिलाधिरूढम् ।।
त्वां ब्रह्मसारं हृदि संनिविष्टं हिरण्मयं योगिनमादिमन्तम् ।
व्रजामि रुद्रं शरणं दिविष्ठं महामुनिं ब्रह्ममयं पवित्रं ।।
सहस्रपादाक्षिशिरोऽभियुक्तं सहस्ररूपं तमसः परस्तात् ।
तं ब्रह्मपारं प्रणमामि शम्भुं हिरण्यगर्भादिपतिं त्रिनेत्रम् ।।
यत्र प्रसूतिर्जगतो विनाशो येनावृतं सर्वमिदं शिवेन ।
तं ब्रह्मपारं भगवन्तमीशं प्रणम्य नित्यं शरणं प्रपद्ये ।।
अलिङ्गमालोकविहीनरूपं स्वयंप्रभुं चित्पतिमेकरूपम् ।

तं ब्रह्मपारं परमेश्वरं त्वां नमस्करिष्ये न यतोऽन्यदस्ति ।।
यं योगिनस्त्यक्तसबीजयोगा लब्ध्वा समाधिं परमात्मभूताः ।
पश्यन्ति देवं प्रणतोऽस्मि नित्यं तं ब्रह्मपारं भवतः स्वरूपम् ।।
न यत्र नामादिविशेषक्लप्तिर्न संदृशे तिष्ठति यत्स्वरूपम् ।
तं ब्रह्मपारं प्रणतोऽस्मि नित्यं स्वयंभूवं त्वां शरणं प्रपद्ये ।।
यद् वेदवादाभिरता विदेहं सब्रह्मविज्ञानमभेदमेकम् ।
पशन्त्यनेकं भवतः स्वरूपं तं ब्रह्मपारं प्रणतोऽस्मि नित्यम् ।।
यतः प्रधानं पुरुषः पुराणो बिभर्ति तेजः प्रणमन्ति देवाः ।
नमामि तं ज्योतिषि संनिविष्टं कालं बृहन्तं भवतः स्वरूपम् ।।
व्रजामि नित्यं शरणं गुहेशं स्थाणुं प्रपद्ये गिरिशं पुराणम् ।
शिवं प्रपद्ये हरमिन्दुमौलिं पिनाकिनं त्वां शरणं व्रजामि ।।
(स्वर्गखण्ड ३४.३४–४३)

भगवन्, आपण जटाजूट धारण करणारे असल्यामुळे आपणांस कपर्दी म्हणतात. आपण परात्पर, सर्वांचे रक्षक, एक अद्वितीय पुराणपुरुष, योगेश्वर, ईश्वर, आदित्य, अग्निरूप तथा कपिल वर्णाच्या वृषभ नंदीश्वरावर आरूढ आहात. मी आपणांस शरण आलो आहे. आपण सर्वांच्या हृदयात स्थित असे सारभूत ब्रह्म आहात. हिरण्मय पुरुष आहात, योगी आहात, सर्वांचे आदी व अंत आपणच आहात. आपण 'रु' म्हणजे दुःखास दूर करणारे आहात. म्हणून आपणांस रुद्र म्हणतात. आपण आकाशात व्यापक रूपाने स्थित, महामुनी, ब्रह्मस्वरूप व परम पवित्र आहात. मी आपणांस शरण आलो आहे. आपण सहस्र चरणांचे, सहस्र नेत्रांचे, सहस्र मस्तकांचे आहात. आपली सहस्र रूपे आहेत. आपण अंधकाराच्या पलीकडचे व वेदांच्या कक्षेबाहेरचे आहात. कल्याणोत्पादक असल्याने आपणांस 'शंभू' म्हणतात. आपणच हिरण्यगर्भ आदी देवांचे स्वामी आहात. आपण तीन नेत्रांनी सुशोभित आहात. मी आपणांस प्रणाम करतो.

ज्यामुळे या जगाची उत्पत्ती होते, लय होतो, ज्या शिवस्वरूप

परमात्म्याने या समस्त दृश्यप्रपंचास व्यापून टाकले आहे, जो वेदांच्या सीमेच्या वाहेर आहे, त्या भगवान शंकरांना मी प्रणाम करतो. मी सदाच त्यांना शरण आलो आहे. जो लिंगरहित, आलोकशून्य (स्वयं-प्रकाशी), स्वयंप्रभू, चेतनेचा स्वामी, एकरूप तथा ब्रह्मदेवांपेक्षाही उत्कृष्ट परमेश्वर आहे, ज्याच्याशिवाय दुसरी कोठली वस्तूच नाही, जो वेदांपलीकडचा आहे, त्या आपणांस, भगवान कपर्दीश्वरांना मी नमस्कार करतो.

सबीज समाधीचा त्याग करून निर्बीज समाधीस सिद्ध करून परमात्मरूप झालेल्या योगीजनास ज्याचा साक्षात्कार होतो, जो वेदां-पलीकडचा आहे, वेद हेच आपले स्वरूप आहे, अशा आपणांस मी सदा प्रणाम करतो. जेथे नाम आदी विशेषणांची कल्पना नाही, ज्याचे स्वरूप या चर्मचक्षूंचा विषय होत नाही, जो स्वयंभू आहे, कारणहीन तथा वेदांपलीकडचा आहे, त्या भगवान शिवांना मी शरण आलो आहे. त्यांना माझा सदाचा प्रणाम आहे. जो भेदरहित, व्यापक ब्रह्म, विज्ञानमय, भेदशून्य, एक अद्वितीय आहे, तथापि वेदवादात आसक्त मनुष्य ज्यात अनेकता पाहतात, त्या आपल्या वेदातीत स्वरूपास मी नित्य प्रणाम करतो.

ज्याच्यापासून प्रकृतीची निर्मिती झाली आहे, स्वयं पुराणपुरुष आपण ज्याला तेजाच्या रूपात धारण करता, ज्याला देवगण सदा नमस्कार करतात, जो आपल्याच ज्योतीत सन्निहित आहे, त्या आपल्याच स्वरूपभूत बृहत् कालास मी नमस्कार करतो. मी सदाच कार्तिकेयाच्या स्वामीस शरण जातो. स्थाणूचा आश्रय घेतो. कैलासपर्वतावर शयन करणाऱ्या पुराणपुरुष शिवांच्या चरणांवर मी सदाच पडून असतो. भगवन्, आपण कष्ट हरण करता म्हणून ‘ हर ’ नावाने ओळखले जाता. आपल्या मस्तकावर चंद्राचा मुकुट शोभतो, आपण पिनाक नावाचे धनुष्य धारण करणारे आहात. मी आपणांस शरण आलो आहे.

## ७. पुराणं कृष्णरूपिणः

ब्राह्मणं च पुरस्कृत्य ब्राह्मणेन च कीर्तितम् ।
पुराणं श्रृणुयान्नित्यं महापापदवानलम् ।।
पुराणं सर्वतीर्थेषु तीर्थं चाधिकमुच्यते ।
यस्यैकपादश्रवणाद्धरिरेव प्रसीदति ।।
यथा सूर्यवपुर्भूत्वा प्रकाशाय चरेद्धरिः ।
सर्वेषां जगतामेव हरिरालोकहेतवे ।।
तथैवान्तःप्रकाशाय पुराणावयवो हरिः ।
विचरेदिह भूतेषु पुराणं पावनं परम् ।।
तस्माद्यदि हरेः प्रीतेरुत्पादे धीयते मतिः ।
श्रोतव्यमनिशं पुम्भिःपुराणं कृष्णरूपिणः ।।
विष्णुभक्तेन शान्तेन श्रोतव्यमतिदुर्लभम् ।
पुराणाख्यानममलममलीकरणं परम् ।।
यस्मिन् वेदार्थमाहृत्य हरिणा व्यासरूपिणा ।
पुराणं निर्मितं विप्र तस्मात्तप्तरमो भवेत् ।।
पुराणे निश्चितो धर्मो धर्मश्च केशवः स्वयम् ।
तस्मात्कृती पुराणे हि श्रुते विष्णुर्भवेदिति ।।
साक्षात्स्वयं हरिर्विप्रः पुराणं च तथाविधम् ।
एतयोः सङ्गमासाद्य हरिरेव भवेन्नरः ।।

(स्वर्गखण्ड ६२. ५८-६६)

ब्राह्मणाला पुढे बसवून ब्राह्मणाच्या मुखातूनच पुराणांचे प्रतिपादन ऐकायला हवे. पुराण महापापांच्या वनास भस्म करणाऱ्या दावानलाप्रमाणे आहे. पुराण सर्व तीर्थांत श्रेष्ठ तीर्थ म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचा एक चतुर्थांश जरी श्रवण केला तरी श्रीहरी प्रसन्न होतात. ज्याप्रमाणे भगवान विष्णू सर्व जगास प्रकाश व पाहण्याची शक्ती

देण्यासाठी सूर्याचे शरीर धारण करतात, आकाशात संचार करतात, त्याचप्रमाणे पुराणस्वरूप श्रीहरी सर्व भूतांच्या अंतःकरणात ज्ञानाचा प्रकाश पाडण्यासाठी या जगात विचरतात. पुराण सर्वांहून मोठे पवित्रतेचे साधन आहे. म्हणून जर भगवानांना प्रसन्न करण्याचा संकल्प मनात झाला तर प्रत्येक पुरुषास निरंतर श्रीविष्णूंच्या अंगभूत पुराणाचे श्रवण केले पाहिजे. पुराणाची कथा अत्यंत दुर्लभ व स्वरूपाने निर्मल आहे. अंतःकरणास निर्मल राखण्यासाठी सर्वांत उत्कृष्ट साधन पुराण आहे. म्हणून विष्णुभक्त पुरुषाने शांत भावाने पुराणाचे श्रवण केले पाहिजे. ब्रह्मन्, व्यासरूपी भगवान श्रीहरीने वेदार्थाचा संग्रह करून पुराणाची रचना केली आहे, म्हणून त्याचे श्रवण व अध्ययन तत्परतेने करावे. पुराणात धर्माचे स्वरूप निश्चित केले गेले आहे व धर्म साक्षात श्रीविष्णूचा अवतार आहे. म्हणून विद्वान पुरुषाने पुराण श्रवण करून विष्णुरूप होणे अगत्याचे आहे. ब्राह्मण स्वतःच श्रीहरीचे स्वरूप आहे. पुराणासही असेच मानावे. या दोहोंची संगत मिळवून मनुष्य नराचा नारायण होतो.

## ८. राजा रत्नग्रीवकृत भगवानस्तुती

एकस्त्वं पुरुषः साक्षाद् भगवान् प्रकृतेः परः ।
कार्यकारणतो भिन्नो महत्तत्त्वादिपूजितः ।।
त्वन्नाभिकमलाज्जज्ञे ब्रह्मा सृष्टिविचक्षणः ।
तथा संहारकर्ता च रुद्रस्त्वन्नेत्रसंभवः ।।
त्वथाऽऽज्ञप्तः करोत्यस्य विश्वस्य परिचेष्टितम् ।
त्वत्तो जातं पुराणाद्यं जगत् स्थास्नु चरिष्णु च ।।
चेतनाशक्तिमाविश्य त्वमेनं चेतयस्यहो ।
तव जन्म तु नास्त्येव नान्तस्तव जगत्पते ।।
वृद्धिक्षयपरीणामास्त्वयि सन्त्येव नो विभो ।
तथापि भक्तरक्षार्थं धर्मस्थापनहेतवे ।।

करोषि जन्मकर्माणि ह्यनुरूपगुणानि च ।
त्वया मात्स्यं वपुर्धृत्वा शङ्खस्तु निहतोऽसुरः ॥
वेदाः सुरक्षिता ब्रह्मन् महापुरुषपूर्वज ॥
शेषो न वेत्ति मह ते भारत्यपि महेश्वरी ।
किमुतान्ये महाविष्णो मादृशास्तु कुबुद्धयः ॥
(पातालखण्ड २२. २८–३४)

भगवन्, एकमात्र आपणच अंतर्यामी पुरुष आहात. आपणच प्रकृतीच्या पलीकडचे साक्षात भगवान आहात. आपण कार्य व कारण यांहून भिन्न असून महत्तत्त्व आदींनी पूजित आहात. सृष्टिरचना करण्यात कुशल असलेले ब्रह्मदेव आपल्याच नाभिकमलातून उत्पन्न झाले आहेत. आपल्याच आज्ञेने ब्रह्मदेव या जगताची निर्मिती करतात. पुराण-पुरुषा, आदिकालाचे जे स्थावरजंगमरूप जगाचे दृश्य दिसते आहे, ते सर्व आपणांपासूनच निर्माण झाले आहे. आपणच त्यात चेतनाशक्ती घालून या जगास सचेत बनविले आहे.

जगदीश्वरा, वास्तविक पाहता आपला जन्म तर कधी झालेलाच नाही. म्हणून आपला अंतही होऊ शकत नाही. प्रभो, आपणांत वृद्धी, क्षय, परिणाम या तीन विकारांचा सर्वस्वी अभाव आहे. तथापि आपण भक्तांचे रक्षण व धर्माची स्थापना करण्यासाठी अनुरूप गुणांनी युक्त होऊन दिव्य जन्म स्वीकारता. आपण मत्स्यावतार धारण करून शंखा-सुरास मारले व वेदांचे रक्षण केले. ब्रह्मन्, आपण महापुरुष, पुरुषोत्तम आहात. आपणच सर्वांचे पूर्वज आहात. महाविष्णो, शेषही आपला महिमा जाणीत नाही. भगवती वाणीही आपणांस समजू शकत नाही. मग माझ्यासारखा अन्यान्य अज्ञानी जीव आपली स्तुती करण्यास समर्थ कसा होईल ?

## १. लोमशमुनिकृत श्रीरामस्तुती

रामान्नास्ति परो देवो रामान्नास्ति परं व्रतम् ।
न हि रामात्परो योगो न हि रामात्परो मखः ।।
न स्मृत्वा चैव जप्त्वा च पूजयित्वा नरः पदम् ।
प्राप्नोति परमामृद्धिमैहिकामुष्मिकीं तथा ।।
संस्मृतो मनसा ध्यातः सर्वकामफलप्रदः ।
ददाति परमां भक्तिं संसाराम्भोधितारिणीम् ।।
श्वपाकोऽपि हि संस्मृत्य रामं याति परां गतिम् ।
ये वेदशास्त्रनिरतास्त्वादृशास्तत्र किं पुनः ।।
सर्वेषां वेदशास्त्राणां रहस्यं ते प्रकाशितम् ।
समाचार तथा त्वं वै यथा स्यात्ते मनीषितम्
एको देवो रामचन्द्रो व्रतमेकं तदर्चनम् ।
मन्त्रोऽप्येकश्च तन्नाम शास्त्रं तद्ध्येव तत्स्तुतिः ।।
तस्मात्सर्वात्मना रामचन्द्रं भज मनोहरम् ।
यथा गोष्पदवत्तुच्छो भवेत्संसारसागरः ।।

(पातालखण्ड ३५. ४६–५२)

श्रीरामाहून मोठा देव नाही. रामाहून मोठे असे दुसरे व्रत नाही. श्रीरामाहून मोठा योग नाही. रामापेक्षा मोठा यज्ञ नाही. श्रीरामाचे स्मरण, त्याचा जप, त्याचे पूजन करून मनुष्य परमपदास प्राप्त होतो. त्याला या लोकी व परलोकी उत्तम समृद्धी मिळते. श्रीरघुनाथजी संपूर्ण कामना व फलांचा दाता आहे. मनाच्या द्वारे स्मरण व ध्यान केल्यावर तो आपली उत्तम भक्ती प्रदान करतो. ही भक्ती संसारसमुद्र तारणारी आहे. चांडालही श्रीरामाचे स्मरण करून परमगती प्राप्त करून घेतो. तर मग तुझ्यासारख्या वेदशास्त्रपरायण पुरुषाच्या बाबतीत काय सांगायला हवंय ? सर्व वेद व शास्त्रे यांचे रहस्य हे आहे ते मी तुमच्यासाठी येथे प्रकट केले आहे. जसा तुमचा विचार असेल तसे तुम्ही करावे.

श्रीराम हा एकच देव आहे. त्यांचे पूजन हेच एक व्रत आहे. त्यांचे नाम हाच एक मंत्र आहे. त्यांची स्तुती हेच एक शास्त्र आहे. म्हणून तुम्ही सर्व प्रकारांनी परममनोहर अशा श्रीरामचंद्रांचे भजन करावे. यामुळे तुम्हांस हा महान संसारसागर गायीच्या खुराएवढचा जागेप्रमाणे तुच्छ वाटेल.

## १०. हनुमानकृत श्रीरामस्तवन

हा नाथ हा नरवरोत्तम हा दयालो
सीतापते रुचिरकुण्डलशोभिवक्त्र ।
भक्तार्तिदाहक मनोहररूपधारिन्
मां बन्धनात् सपदि मोचय मा विलम्बम् ॥
संमोचितास्तु भवता गजपुङ्गवाद्या
देवाश्च दानवकुलाग्निसुदह्यमानाः ॥
तत्सुन्दरीशिरसि संस्थितकेशबन्ध –
संमोचितासि करुणालय मां स्मरस्व ॥
त्वं यागकर्मनिरतोऽसि मुनीश्वरेन्द्रै –
र्धर्मं विचारयसि भूमिपतीड्यपाद ।
अत्राहमद्य सुरथेन विगाढपाश –
बद्धोऽस्मि मोचय महापुरुषाशु देव ॥
भो मोचयस्यथ यदि स्मरणातिरेका –
त्वं सर्वदेववरपूजितपादपद्म ।
लोको भवन्तमिदमुल्लसितो हसिष्य –
त्तस्माद् विलम्बमिह मा चर मोचयाशु ॥
(पातालखण्ड, ५३.१२–१७)

हे नाथ, हे पुरुषोत्तमा, हे दयाळू सीतापते, प्रभो, आपले मुख स्वभावतःच शोभासंपन्न आहे. त्यावरील सुंदर कुंडलांच्यामुळे त्याची शोभा आणखीनच वाढली आहे. आपण भक्तांची पीडा नाहीशी करणारे

आहात. आपण मनोहर शरीर धारण करता. दयामया, या बंधनातून मला आपण शीघ्र मुक्त करावे. उशीर करू नये. आपण गजराज आदी भक्तांना संकटातून वाचविले आहे. दानववंशरूपी अग्नीच्या ज्वालांत जळणाऱ्या देवांचे आपण रक्षण केलेत. दानवांना मारून त्यांच्या पत्नींच्या डोक्यांच्या केसांना आपण बंधनमुक्त केले आहे. करुणानिधे, आपण माझीही थोडी आठवण ठेवावी. नाथा, मोठमोठे सम्राटही आपल्या चरणांचे पूजन करतात. या वेळी आपण यज्ञकर्मात आहात, मुनीश्वरां-बरोबर आपण धर्मचर्चा करीत आहात आणि मी येथे या सुरथाने बांधलेल्या गाढ बंधनात अडकून आहे. महापुरुषा, देवा, शीघ्र येऊन आपण माझी सुटका करावी. प्रभो, सर्व देवही आपल्या चरणांची अर्चा करतात. देवा, इतके स्मरण करूनही आपण आम्हांस या बंधनातून मुक्त केले नाही तर सर्व जग खूश होऊन आपणांसच हसेल. म्हणून आपण विलंब न करता आमची त्वरित सुटका करावी.

## ११. दूतकृत नामामृतस्तोत्र

श्रीकेशवं क्लेशहरं वरेण्यमानन्दरूपं परमार्थमेव ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ।।
श्रीपद्मनाभं कमलेक्षणं च आधाररूपं जगतां महेशम् ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ।।
पापापहं व्याधिविनाशरूपमानन्ददं दानवदैत्यनाशनम् ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ।।
यज्ञाङ्गरूपं च रथाङ्गपाणिं पुण्याकरं सौख्यमनन्तरूपम् ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ।।
विश्वाधिवासं विमलं विरामं रामभिधानं रमणं मुरारिम् ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ।।
आदित्यरूपं तमसां विनाशं चन्द्रप्रकाशं नलपङ्कजानाम् ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ।।

सखड्गपाणि मधुसूदनाख्यं तं श्रीनिवासं सगुणं सुरेशम् ।
नामामृतं दोषहरं तु राज्ञा आनीतमत्रैव पिबन्तु लोकाः ॥
नामामृतं दोषहरं सुपुण्यमधीत्य यो माधवविष्णुभक्तः ।
प्रभातकाले नियतो महात्मा स याति मुक्तिं न हि कारणं च ॥
(भूमिखंड, ७३.१०-१७)

भगवान केशव सर्वांचे क्लेश हरण करणारे आहेत. तेच सर्वश्रेष्ठ, आनंदस्वरूप व परमार्थतत्त्व आहेत. त्यांचे नाममय अमृत सर्व दोषांना दूर करते. महाराज ययातीने त्या अमृतास सुलभ करून ठेवले आहे. जगातील लोक इच्छेनुसार त्याचे पान करतील. भगवान विष्णूंच्या नाभीतून कमल प्रकट झाले आहे. त्यांचे नेत्र कमलांप्रमाणे सुंदर आहेत. तेच जगताचे आधार असून महेश्वर आहेत. पापांचा नाश करून ते आनंद देतात. दानव व दैत्य यांचा संहारही तेच करतात. त्यांचे अंग-स्वरूप यज्ञ हाच आहे. त्यांच्या हातात सुदर्शनचक्र शोभते. तेच पुण्याचा निधी व सुखरूप आहेत. त्यांच्या स्वरूपाचा अंत लागत नाही. सर्व विश्व त्यांच्या हृदयात निवास करते. ते निर्मल, सर्वांना आराम देणारे, 'राम' या नावाने विख्यात आहेत. ते सर्वांत रममाण होतात. ते मुर दैत्याचे शत्रू आहेत. ते आदित्यस्वरूप आहेत. अंधकाराचा नाश करणारे आहेत. मलरूप कमलांसाठी ते चंद्रप्रकाशरूप आहेत. ते लक्ष्मीचे निवासस्थान आहेत. तेच सगुण व देवेश्वर आहेत. त्यांचे नामामृत सर्व दोषांना दूर करते. राजा ययातीने त्याला सुलभ करून दिले आहे. सर्व लोक या नामामृताचे पान करतात. हे नामामृत-स्तोत्र दोषहारी आहे. उत्तम पुण्याचे जनक आहे. लक्ष्मीपती भगवान विष्णूत भक्ती ठेवणारा जो महात्मा प्रतिदिन प्रातःकाली नियमपूर्वक या स्तोत्राचा पाठ करील तो मुक्त होऊन जाईल.

## १२. कुंजलकृत जगदीशध्यान

एवं सर्वंमयं ध्यानं पश्यते यो महात्मनः ।
स याति परमं स्थानममूर्तममृतोपमम् ।।
द्वितीयं तु प्रवक्ष्यामि ह्यस्य ध्यानं महात्मनः ।
मूर्ताकारं तु साकारं निराकारं निरामयम् ।।
ब्रह्माण्डं सर्वमतुलं वासितं यस्य वासनात् ।
स तस्माद् वासुदेवेति उच्यते मम नन्दन ।।
वर्षमाणस्य मेघस्य यद्वर्षं तस्य तद्भवेत् ।
सूर्यतेजःप्रतीकाशं चतुर्बाहुं सुरेश्वरम् ।।
दक्षिणे शोभते शङ्खो हेमरत्नविभूषितः ।
सूर्यबिम्बसमाकारं चक्रं पद्मप्रतिष्ठितम् ।।
कौमोदकी गदा तस्य महासुरविनाशिनी ।
वामे च शोभते वत्स करे तस्य महात्मनः ।।
महापद्मं तु गन्धाढ्यं तस्य दक्षिणहस्तगम् ।
शोभमानं सदा ध्यायेत् सायुधं कमलाप्रियम् ।।
कम्बुग्रीवं वृत्तमास्यं पद्मपत्रनिभेक्षणम् ।
राजमानं हृषीकेशं दशनै रत्नसन्निभैः ।।
गुडाकेशाः सन्ति यस्य अधरं बिम्बसन्निभम् ।
शोभते पुण्डरीकाक्षः किरीटेनापि पुत्रक ।।
विशालेनापि रूपेण केशवस्तु सुचक्षुषा ।
कौस्तुभेनापि वै तेन राजमानो जनार्दनः ।।
सूर्यतेजःप्रकाशाभ्यां कुण्डलाभ्यां प्रभाति च ।
श्रीवत्साङ्केन पुण्येन सर्वदा राजते हरिः ।।
केयूरकङ्कणैर्हारैर्मौक्तिकैर्ऋक्षसन्निभैः ।
वपुषा भ्राजमानस्तु विजयो जयतां वरः ।।

राजते सोऽपि गोविन्दो हेमवर्णेन वाससा ।
मुद्रिकारत्नयुक्ताभिरङ्गुलीभिर्विराजते ॥
सर्वायुधैः सुसंपूर्णो दिव्यैराभरणैर्हरिः ।
वैनतेयसमारूढो लोककर्ता जगत्पतिः ॥
एवं तं ध्यायते नित्यमनन्यमनसा नरः ।
मुच्युते सर्वपापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति ॥
एतत्ते सर्वमाख्यातं ध्यानमेय जगत्पतेः ।

(भूमिखंड, ८६.७८–९२)

या प्रकाराने जो परमात्म्याच्या सर्वमय स्वरूपाचे ध्यान करतो, तो अमृताप्रमाणे सुखदायी व आकाररहित परमपद प्राप्त करून घेतो. आता परमात्म्याच्या दुसऱ्या ध्यानाचे स्वरूप सांगतो. मूर्तिमान आकाराच्या चिंतनास साकार ध्यान म्हणतात व जो निरामय तत्त्वाचे चिंतन आहे त्याला निराकार ध्यान म्हणतात. हे सर्व ब्रह्मांड, ज्याची तुलना होऊ शकत नाही, भगवानांच्या वासनेने वासित आहे, भगवानांतच त्याचा निवास आहे, म्हणून त्यांना 'वासुदेव' म्हणतात. वर्षाकालातील उन्मुख मेघाप्रमाणे त्यांचा वर्ण आहे. ते सूर्याप्रमाणे तेजस्वी, चतुर्भुज व देवांचे स्वामी आहेत. त्यांच्या उजव्या हातांत एकात सुवर्ण व रत्नांनी विभूषित असा शंख शोभा पावतो. डाव्या हातांत एकात चक्र प्रतिष्ठित झाले असून त्याची तेजोमयी आकृती सूर्यमंडलाप्रमाणे आहे. कौमोदाची गदा, जिने मोठमोठ्या असुरांचा नाश केला आहे ती त्यांच्या डाव्या हातात शोभते. दुसऱ्या उजव्या हातात सुगंधपूर्ण असे महान पद्म शोभादायक आहे.

अशा आयुधांसहित भगवान कमलापतींचे ध्यान करायला हवे. शंखासमान ग्रीवा, गोल गोल मुख, पद्मपत्रांप्रमाणे मोठमोठे डोळे, हे रूप अत्यंत मनोहर वाटत आहे. रत्नांप्रमाणे चमकणारे दात भगवान हृषीकेशांची शोभा मोठीच वाढवितात. त्यांचे कुरळे केस, बिंबफला-प्रमाणे लाल ओठ, मस्तकावर धारण केलेला किरीट यांनी हे कमल-

नयन श्रीहरी अत्यंत सुशोभित दिसतात. विशाल रूप, सुंदर नेत्र व कौस्तुभमणी त्यांची कांती वाढवितात. सूर्याप्रमाणे तेज प्रकाशित करणारी कुंडले, पुण्यमय श्रीवत्सचिन्ह; श्रीहरींना सदा देदीप्यमान दिसणाऱ्या या गोष्टी आहेत. त्यांच्या श्याममूर्तीवर बाजूबंद, कंकणे, मोत्यांचा हार यांमुळे त्यांची मूर्ती नक्षत्रांसारखी भासत आहे.

या सर्वांनी शोभणारे भगवान विजय विजयी पुरुषांत सर्वश्रेष्ठ आहेत. सोन्याप्रमाणे चमकणारा पीतांबर त्यांची शोभा वाढवितो. रत्न-जडित अंगठ्यांनी त्यांची बोटे सुशोभित झाली असल्याने भगवान मोठे सुंदर दिसतात. सर्व प्रकारच्या आयुधांनी पूर्ण, दिव्य आभूषणांनी विभूषित असे ते गरुडाच्या पाठीवर विराजमान झाले आहेत. तेच या विश्वाचे स्रष्टा व जगताचे स्वामी आहेत. जो मनुष्य या प्रकारच्या भगवानांच्या सगुण मूर्तीचे अनन्य चित्ताने प्रतिदिन ध्यान करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो व शेवटी भगवान विष्णूंच्या लोकास जातो. बेटा, या जगदीश्वराच्या ध्यानाचे हे सर्व प्रकार मी तुला सांगितले आहेत.

## १३. श्रीहरींचे स्तवन

जन्मादिरहितं पूर्वं चित्सदानन्दलक्षणम् ।
त्वामौपनिषदा ब्रह्म चिन्तयन्ति परात्परम् ।।

खादिभूतानि देहश्च मनो बुद्धीन्द्रियाणि च ।
विद्याविद्ये त्वमेवात्र नान्यत्त्वत्तोऽस्ति किंचन ।।

त्वमग्निस्त्वं हविस्त्वं स्रुग्दीक्षितानां क्रिया क्षमा ।
त्वं सेतुः सर्वभूतानां त्वमेव शरणं मम ।।

युवतीनां यथा यूनि यूनां च युवतौ यथा ।
मनोऽभिरमते तद्वन्मनो मे रमतां त्वयि ।।

अपि पापं दुराचारं नरं त्वां प्रणतं हरे ।
नेक्षन्ते किङ्करा याम्या उलूकास्तपनं यथा ।।

तापत्रयमघौघश्च तावत्पीडयते जनम् ।
यावन्नाश्रयते मर्त्यो भक्त्या त्वत्पादपङ्कजम् ।।
(उत्तरखंड, २४९.१०६–१११)

भगवन, उपनिषदांचे विद्वान आपणांस जन्म आदीपासून विरहित, सर्वांचे पूर्ववर्ती, सच्चिदानंदस्वरूप तथा परात्पर ब्रह्म मानून चिंतन करतात. आकाशादी पाच भूते, देह, मन, बुद्धी, इंद्रिये, विद्या, अविद्या हे सर्व आपणच आहात. या जगात आपणांशिवाय दुसऱ्या कोणत्याच व्यक्तीची सत्ता नाही. आपणच अग्नी, आपणच हविष्य, आपणच स्रुवा, आपणच यज्ञात दीक्षित पुरुषांसाठी क्रिया व क्षमा आहात. आपणच सर्व प्राण्यांच्यासाठी सेतू आहात. आपणच माझ्यासाठी आश्रय आहात. नाथा, ज्याप्रमाणे युवती स्त्रियांचे मन युवक पुरुषात व युवक पुरुषाचे मन युवतीत रमते त्याचप्रमाणे माझे मन आपणांत रमावे. हरे, पापी व दुराचरणी मनुष्यही जर आपल्या चरणांपाशी आला तर यमराजाचे दूत त्याच्याकडे दृष्टी टाकीत नाहीत. घुवड सूर्याकडे कसे पाहू शकेल ? मनुष्याच्या पापराशी, त्याचे तीन प्रकारचे ताप त्याला तो जोपर्यंत भक्तिपूर्वक वृत्तीने आपल्या चरणकमलांना शरण आला नाही तोपर्यंतच पीडा देत असतात.

## १४. ब्रह्मदेवकृत नारायणमहिमा

नारायणपरो धर्मस्तथा लोकाश्च शाश्वताः ।
नारायणपरा यज्ञाः शास्त्राणि विविधानि च ।।
वेदाः साङ्गास्तथा चान्ये विष्णुर्विश्वेश्वरो हरिः ।
पृथिव्यादीनि विविधाः पञ्चभूतानि सोऽव्ययः ।।
सर्वं विष्णुमयं ज्ञेयं विबुधैः सकलं जगत् ।
तथापि मानुषाः पापा न जानन्ति विमोहिताः ।।
तस्यैव मायया व्याप्तं चराचरमिदं जगत् ।
तन्मनास्तद्गतप्राणो जानाति परमार्थवित् ।।

ईश्वरः सर्वभूतानां विष्णुस्त्रैलोक्यपालकः ।
तस्मिन्नेव जगत् सर्वं तिष्ठति प्रभवत्यपि ।।
जगत् संहरते रुद्रः पालने विष्णुरुच्यते ।
उत्पत्तौ चाहमेवात्र तथान्ये लोकपालकाः ।।
सर्वाधारो निराधारः सकलो निष्कलस्तथा ।
अणुर्महांस्तथाप्यन्यत्तस्माच्च परतः परः ।।
तमेव शरणं यात सर्वसंहारकारकम् ।
स पिता जनितास्माकं कीर्तितो मधुसूदनः ।।
(उत्तरखंड, ८१.९४–१०१)

देवांनो, भगवान नारायण हेच धर्मांचे आश्रय आहेत. सनातन लोक, यज्ञ, तथा नाना प्रकारची शास्त्रे सर्व काही नारायणात पर्यवसित होतात. सहा अंगांसहित वेद तथा अन्य आगम सर्वव्यापी विश्वेश्वर श्रीहरीची रूपे आहेत. पृथ्वी आदी पाच भूतेही तोच अविनाशी परमेश्वर आहे. देवांसहित सर्व जगतास विष्णुमयच समजले पाहिजे. पण पापी मनुष्य मोहग्रस्त असल्यामुळे ही गोष्ट नीट समजू शकत नाही. हे सर्व चराचर जगत त्याच्याच मायेने व्याप्त आहे. जो मनाने भगवानांचे चिंतन करतो, ज्याचे प्राण भगवानात लागलेले आहेत, तो परमार्थ-तत्त्वाचा ज्ञाता पुरुषच या रहस्याला नीट जाणतो. सर्व भूतांचा ईश्वर भगवान विष्णू या तीन लोकांचे पालन करतो. हे सर्व जगत त्याच्यातच स्थित असून त्याच्यापासूनच उत्पन्न झाले आहे. तोच रुद्र बनून जगताचा संहार करतो. पालनाच्या वेळी त्याला विष्णू म्हणतात व निर्मितीच्या काळात त्यालाच माझे, म्हणजे ब्रह्मदेवाचे नाव देतात. अन्यान्य लोक-पाल ही त्याचीच रूपे आहेत. तोच सर्वांचा आधार आहे. पण त्याचा आधार मात्र कोणीही नाही. तो सर्व कलांनी युक्त असूनही त्यांरहित आहे. तोच छोटा-बडा असून त्यांहून भिन्न आहे. त्याबरोबरच तो सर्वांहून विलक्षणही आहेच. म्हणून देवांनो, सर्वांचा संहार करणाऱ्या श्रीहरीस शरण जावे. तोच आपला जन्मदाता आहे. त्यालाच मधुसूदन म्हणतात.

## १५. शिवकृत राधास्तुती

देवी कृष्णमयी प्रोक्ता राधिका परदेवता ।
सर्वलक्ष्मीस्वरूपा सा कृष्णाल्हादस्वरूपिणी ॥
ततः सा प्रोच्यते विप्र ल्हादिनीति मनीषिभिः ।
तत्कलाकोटिकोटचंशा दुर्गाद्यास्त्रिगुणात्मिकाः ॥
सा तु साक्षान्महालक्ष्मी कृष्णो नारायणः प्रभुः ।
नैतयोर्विद्यते भेदः स्वल्पोऽपि मुनिसत्तम ॥
इयं दुर्गा हरी रुद्रः कृष्णः शक्र इयं शची ।
सावित्रीयं हरिर्ब्रह्मा धूमोर्णासौ यमो हरिः ॥
बहुना किं मुनिश्रेष्ठ विना ताभ्यां न किंचन ।
चिदचिल्लक्षणं सर्वं राधाकृष्णमयं जगत् ॥
इत्थं सर्वं तयोरेव विभूतिं विद्धि नारद ।
न शक्यते मया वक्तुं वर्षकोटिशतैरपि ॥

(पातालखंड, ८१.५३–५८)

नारदा, श्रीकृष्णप्रिया राधा आपल्या चैतन्यादी अंतरंग विभूतींनी या प्रपंचाचे गोपन, संरक्षण करते. म्हणून तिला 'गोपी' म्हणतात. ती श्रीकृष्णांच्या आराधनेत तन्मय असल्यामुळे तिला 'राधिका' हे नाव मिळाले आहे ती श्रीकृष्णमयी असल्यामुळे परादेवता आहे. ती पूर्णतः लक्ष्मीस्वरूपा आहे. श्रीकृष्णाच्या आल्हादाची ती मूर्तिमान स्वरूप असल्यामुळे मनीषी लोक तिला आल्हादिनी शक्ती म्हणूनही ओळखतात. श्रीराधा साक्षात महालक्ष्मी आहे. व भगवान श्रीकृष्ण साक्षात नारायण आहेत. मुनिश्रेष्ठा, यात थोडाही मतभेद नाही. श्रीराधा दुर्गा आहे, तर श्रीकृष्ण रुद्र. ती सावित्री आहे तर ते साक्षात ब्रह्मदेव आहेत. आणखी अधिक काय सांगावे ? त्या दोघांच्या शिवाय कसलीच सत्ता असू शकत नाही. जडचेतनमय सर्व जगत श्रीराधाकृष्णमय आहे. या प्रकाराने सर्वांना या दोघांची विभूती समजावे. मी एकेक नाव घेऊन मोजायला लागेन तर शंभर कोटी वर्षांतही विभूतींचे वर्णन करू शकणार नाही.

## १६. नारदकृत श्रीकृष्णध्यान

सुमनप्रकरसौरभोद्गलितमाध्विकाद्युल्लस-
त्सुशाखिनवपल्लवप्रकरनम्रशोभायुतम् ।
प्रफुल्लनवमञ्जरीललितवल्लरीवेष्टितं
स्मरेत सततं शिवं सितमतिः सुवृन्दावनम् ॥१॥

प्रवालनवपल्लवं मरकतच्छदं मौक्तिक-
प्रभाप्रकरकोरकं कमलरागनानाफलम् ।
स्थविष्ठमखिलर्तुभिः सततसेवितं कामदं
तदन्तरपि कल्पकाङ्घ्रिपमुदञ्चितं चिन्तयेत् ॥२॥

सुहेमशिखराचले उदितभानुवद्भासुरा-
मधोऽस्य कनकस्थलीममृतशीकरासारिणः ।
प्रदीप्तमणिकुट्टिमां कुसुमरेणुपुञ्जोज्ज्वलां
स्मरेत्पुनरतन्द्रितो विगतषट्तरङ्गां बुधः ॥३॥

तद्रत्नकुट्टिमनिविष्टमहिष्ठयोग-
पीठेऽष्टपत्रमरुणं कमलं विचिन्त्य ।
उद्यद्विरोचनसरोचिरमुष्य मध्ये
संचिन्तयेत् सुखनिविष्टमथो मुकुन्दम् ॥४॥

सुत्रामहेतिदलिताञ्जनमेघपुञ्ज-
प्रत्यग्रनीलजलजन्मसमानभासम् ।
सुस्निग्धनीलघनकुञ्चितकेशजालं
राजन्मनोज्ञशितिकण्ठशिखण्डचूडम् ॥५॥

रोलम्बलालितसुरद्रुमसूनसम्प-
द्युक्तं समुत्कचनवोत्पलकर्णपूरम् ।
लोलालिभिः स्फुरितभालतलप्रदीप्त-
गोरोचनातिलकमुज्जवलचिल्लिचापम् ॥६॥

आपूर्णशारदगताङ्कशशाङ्कबिम्ब-
कान्ताननं कमलपत्रविशालनेत्रम् ।
रत्नस्फुरन्मकरकुण्डलरश्मिदीप्त--
गण्डस्थलीमुकुरमुन्नतचारुनासम् ॥७॥

सिन्दूरसुन्दरतराधरमिन्दुकुन्द--
मन्दारमन्दहसितद्युतिदीपिताशम् ।
वन्यप्रवालकुसुमप्रचयावक्लृप्त--
ग्रैवेयकोज्ज्वलमनोहरकम्बुकण्ठम् ॥८॥

मत्तभ्रमद्भ्रमरघुष्टविलम्बमान--
संतानकप्रसवदामपरिष्कृतांसम् ।
हारावलीभगणराजितपीवरोरो--
व्योमस्थलीलसितकौस्तुभभानुमन्तम् ॥९॥

श्रीवत्सलक्षणसुलक्षितमुन्नतांस--
माजानुपीनपरिवृत्तसुजातबाहुम् ।
आबन्धुरोदरमुदारगभीरनाभि
भृङ्गाङ्गनानिकरमञ्जुलरोमराजिम् ॥१०॥

नानामणिप्रघटिताङ्गदकङ्कणोर्मि--
ग्रैवेयकारसननूपुरतुन्दबन्धम् ।
दिव्याङ्गरागपरिपिञ्जरिताङ्गयष्टि-
मापीतवस्त्रपरिवीतनितम्बबिम्बम् ॥११॥

चारूरुजानुमनुवृत्तमनोज्ञजङ्घं
कान्तोन्नतप्रपदनिन्दितकूर्मकान्तिम् ।
माणिक्यदर्पणलसन्नखराजिराज--
द्रक्ताङ्गुलिच्छदनसुन्दरपादपद्मम् ॥१२॥

मत्स्याङ्कुशारिदरकेतुयवाब्जवज्रैः
संलक्षितारुणकराङ्घ्रितलाभिरामम् ।

लावण्यसारसमुदायविनिर्मिताङ्गं
सौन्दर्यनिन्दितमनोभवदेहकान्तिम् ।।१३।।

आस्यारविन्दपरिपूरितवेणुरन्ध्र--
लोलत्कराङ्गुलिमीरितदिव्यरागैः ।
शश्वद्भवैः कृतनिविष्टसमस्तजन्तु--
सन्तानसंनतिमनन्तसुखाम्बुराशिम् ।।१४।।

गोभिर्मुखाम्बुजविलीनविलोचनाभि--
रूधोभरस्खलितमन्थरमन्दगाभिः ।
दन्ताग्रदष्टपरिशिष्टतृणाङ्कुराभि--
रालम्बिवालधिलताभिरथाभिवीतम् ।।१५।।

सम्प्रस्नुतस्तनविभूषणपूर्णनिश्च--
लास्याद् वृढक्षरितफेनिलदुग्धमुग्धैः ।
वेणुप्रवर्तितमनोहरमन्दगीत--
दत्तोश्चकर्णयुगलैरपि तर्णकैश्च ।।१६।।

गोपैः समानगुणशीलवयोविलास--
वेशैश्च मूर्च्छितकलस्वनवेणुवीणैः ।
मन्दोच्चतारपटुगानपरैर्विलोल--
दोर्वल्लरीललितलास्यविधानदक्षैः ।।१७।।

जङ्घान्तपीवरकटीरतटीनिबद्ध--
व्यालोलकिङ्किणिघटारणितैरटद्भिः ।
मुग्धैस्तरक्षुनखकलितकान्तभूषै--
रव्यक्तमञ्जुवचनैः पृथुकैः परीतम् ।।१८।।

तद्वद् दक्षिणतो मुनिनिकरं दृढधर्मवाञ्छया समाम्नायपरम्।
योगीन्द्रानथ पृष्ठे मुमुक्षमाणान् समाधिना तु सनकाद्यान् ।।
सव्ये सकान्तानथ यक्षसिद्धान्
गन्धर्वविद्याधरचारणांश्च ।

सकिन्नरानप्सरसश्च मुख्याः
कामार्थिनीर्नर्तनगीतवाद्यैः ॥१९॥

शङ्खेन्दुकुन्दधवलं सकलागमज्ञं
सौदामनीततिपिशङ्गजटाकलापम् ।
तत्पादपङ्कजगतामसलां च भक्ति
वाञ्छन्तमुज्जिततरान्यसमस्तसङ्गम् ॥२०॥

नानाविधश्रुतिगणान्वितसप्तराग-
ग्रामत्रयीगतमनोहरमूर्च्छनाभिः ।
सम्प्रीणयन्तमुदिताभिरपि प्रभक्त्या
संचिन्तयेन्नभसि मां द्रुहिणप्रसूतम् ॥२१॥

इति ध्यात्वाऽऽत्मानं पटुविशदधीर्नन्दतनयं
नरो बौद्धैर्वार्घप्रभृतिभिरनिन्द्योपहृतिभिः ।
भजेद् भूयो भक्त्या स्ववपुषि बहिष्ठैश्च विभवै-
रिति प्रोक्तं सर्वं यदभिलषितं भूसुरवराः ॥२२॥

(पातालखण्ड, अध्याय ९९)

ध्यान करणाऱ्याने सदा शुद्ध होऊन प्रथम त्या परम कल्याणमय सुंदर वृंदावनाचे चिंतन करावे. हे वृंदावन फुलांचा समुदाय आहे. मनोहर सुगंध व वाहाणारा मकरंद आदींनी सुशोभित सुंदर सुंदर वृक्षांच्या नूतन पल्लवांनी या वनाची शोभा वाढलेली आहे. उमलणाऱ्या नवीन मंजऱ्या व ललित लता यांनी हे वन समृद्ध आहे.

त्या वनाच्या आत एका कल्पवृक्षाचे चिंतन करावे. हा कल्पवृक्ष बहुत मोठा व उंच आहे. त्याचे नवीन पल्लव लाल असून पाने मरकत मण्यांप्रमाणे निळी आहेत. कळ्या मोत्यांच्या प्रभेप्रमाणे चमकतात व नाना प्रकारची फले पद्मराग माणिकाच्या समान आहेत. सारे ऋतू त्या वृक्षाच्या सेवेत असतात. तो सर्व कामना पूर्ण करणारा वृक्ष आहे.

आलस्यरहित विद्वान पुरुषाने धारावाहिक रूपाने अमृताचे बिंदू स्रवणाऱ्या त्या कल्पवृक्षाखाली सुवर्णमय वेलीची कल्पना करावी. ती मेरूपर्वतावर उगवलेल्या सूर्याच्या प्रभेने उद्भासित होते. तिची

फरशी चमकत्या मण्यांची आहे. ती फुलांच्या परागपुंजाने थोडीशी धवलवर्णाचीही झाली आहे. तेथे क्षुधा, पिपासा, शोक-मोह, जरा-मृत्यू इत्यादी सहा ऊर्मी राहू शकत नाहीत.

त्या रत्नमय भूमीवर राखलेल्या एका विशाल योगपीठावर एक लाल रंगाचे अष्टदल कमल काढून त्याचे चिंतन करावे. त्याच्या मध्य-भागी सुखपूर्वक बसलेल्या श्रीकृष्णांचे ध्यान करावे. तो श्रीकृष्ण आपल्या दिव्य प्रभेने उदयकालीन सूर्यदेवाप्रमाणे देदीप्यमान आहे.

भगवानांच्या मूर्तीची प्रभा इंद्राच्या वज्राने विदीर्ण झालेल्या कज्जलगिरीसमान, मेघांच्या समुदायासमान, निळ्या रंगाच्या कमला-समान श्यामल रंगाची आहे. श्याम-मेघाप्रमाणे त्यांचा काळा कुरळा केशकलाप मोठा रमणीय आहे. त्यांच्या मस्तकावर मनोहर असा मोर-पंखांचा टोप आहे.

कल्पवृक्षाच्या फुलांनी, ज्यांवर भ्रमर गुंजारव करतात, भगवानांचा शृंगार झालेला आहे. त्यांनी कानांत नवीन उमलेल्या कमळांची कुंडले धारण केली आहेत. त्यांवर चंचल भ्रमर उडत आहेत. त्यांच्या ललाटा-वर गोरोचनाचा तिलक चमकत आहे. त्यांच्या धनुष्याकार भुवया मोठ्या सुंदर दिसतात.

भगवानांचे मुख शरत्पूर्णिमेच्या कलंकहीन चंद्रमंडलाप्रमाणे कांतिमान आहे. त्यांचे मोठे डोळे कमलदलांप्रमाणे सुंदर आहेत. दर्पणा-प्रमाणे त्यांचे गाल स्वच्छ आहेत. रत्नांच्यामुळे चमकणारी मकराकृती कुंडले प्रकाशमान झाली आहेत. त्यांचे नाक मोठे सुंदर व मनोहर आहे. त्यांचे ओठ शेंदराप्रमाणे लाल लाल आहेत. चंद्र, कुंद, मंदार यांच्या पुष्पाप्रमाणे मंद हास्याची छटा सर्व दिशांना प्रकाशित करते. वनातील कोमल पल्लव व फूल यांनी बनविलेला हार त्यांची शंखाकृती मनोहर ग्रीवा शोभवीत आहे.

उडणाऱ्या मत्त झालेल्या भृंगांनी निनादित गुडघ्यांपर्यंत लगडलेली पारिजात पुष्पांची माला त्यांच्या दोनही खांद्यांची शोभा वाढवीत आहे. पीत व विशाल वक्षःस्थलरूपी आकाश हाररूपी नक्षत्रांनी सुशोभित असून त्यात कौस्तुभमणिरूपी सूर्य भासमान होत आहे.

भगवानांच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह मोठे सुंदर दिसत आहे.

त्यांचे खांदे उंच आहेत. त्यांचे गोल गोल सुंदर हात गुडघ्यांपर्यंत लांब व सुदृढ आहेत. उदराचा भाग मोठा मनोहर आहे. नाभी विस्तृत व खोल आहे. त्रिवलीची रोमपंक्ती भृंगांप्रमाणे शोभत आहे.

नाना प्रकारच्या मण्यांनी बनलेले बाजुबंद, कडी, अंगठ्या, हार करधनी, नूपुर, पेटी आदी भूषणांनी त्यांची मूर्ती शोभत आहे. त्यांचे सर्व अंग दिव्य अंगरागांनी अनुरंजित असून कटिभागावरून हलक्या रंगाचा पीतांबर किंचित ढळला आहे.

दोन मांड्या, गुडघे सुंदर आहेत. पिंडऱ्या गोलाकार व सुंदर आहेत. पादाग्रभाग परम कांतिमान व उंच आहे. दोनही चरणकमल माणिक्य दर्पण तथा यांच्याप्रमाणे स्वच्छ नखपंक्तींनी सुशोभित आहेत. लाल लाल बोटे फारच सुंदर दिसत आहेस.

मत्स्य, अंकुश, चक्र, शंख, पताका, जव, कमल, वज्र आदी चिन्हांनी चिन्हित लाल लाल हात तथा तळवे यांनी भगवान सुंदर दिसताहेत. त्यांचे सुंदर श्रीअंग लावण्याच्या सारसंग्रहानेच जणू निर्माण केले आहे. त्यांच्या सौंदर्यासमोर कामदेवाची शरीरकांती फिकी पडते.

भगवान आपल्या मुखाने मुरली वाजवीत आहेत. यावेळी त्यांची बोटे मुरलीच्या छिद्रांवरून फिरत असल्याने दिव्य रागांची सृष्टी निर्माण झाली आहे. सारे जीवजंतू याने प्रभावित होऊन आपापल्या जागी बसून भगवानांच्याकडे एकटक लावून बघत आहेत. भगवान गोविंद अनंत आनंदाचे समुद्र आहेत.

स्तनांच्या भाराने अवघडलेल्या गायी, मंद मंद चालणाऱ्या गायी दातांच्या अग्रभागांतून चावून वाचणारा तृणाचा भाग प्रकट करणाऱ्या आहेत. त्या शेपट्या उभारून भगवानांच्या मुखकमलावर डोळे स्थिरावून त्यांच्याभोवती चारही बाजूंनी उभ्या आहेत.

गायींच्या बरोबर छोटे छोटे बच्चे आहेत. त्यांनी भगवानांना घेरून टाकले आहे. मुरलीच्या स्वरांतून झरणारी संगीताची मंदधारा कान लावून ऐकण्यात या धेनू व त्यांची वासरे गुंग झाली आहेत. त्यांनी आपले दोनही कान खडे केले आहेत. गायींच्या स्तनांतून ठिबकणाऱ्या आभूषणरूप दुधाने त्यांचे मुख स्थिर आहे. त्यातून फेसयुक्त दूध वाहात असल्याने ते मोठे मनोहर दिसत आहेत.

भगवानांच्या समान गुण, शील, अवस्था, विलास, वेषभूषा करणारे गोपही आपल्या चंचल भुजांनी सुंदर नृत्य करण्यात कुशल आहेत. वंशी, वाणी यांचा मधुर ध्वनी विस्तार करून मंद, उच्च व तारस्वरात कुशलतापूर्वक गान करणाऱ्या भगवानांना सर्व बाजूंनी त्यांनी घेरले आहे.

छोटे छोटे गोपबालक भगवानांच्या चारही दिशांना फिरत आहेत. त्यांनी कटिभागावर करधनी ल्याली आहे. तिच्या क्षुद्र घंटिकांच्या मधुर ध्वनींच्या नादात सर्वजण आहेत. त्या भोळ्या बालकांनी वाघनखांची सुंदर आभूषणे वापरली आहेत. त्यांची गोडगोड पण बोबडी वाणी समजताना अडचण येते. भगवानांच्या प्रती दृढ अनुराग धारण करणाऱ्या सुंदर गोपकन्या त्यांना प्रेमपूर्वक नीट न्याहळतात. गोप, गोपी, पशू इत्यादींनी घेरलेले भगवान ब्रह्मा, शिव व इंद्र आदी देवांचा समुदाय यांचा स्तुतिविषय झालेले आहेत.

अशा प्रकारे त्या भगवानांच्या दक्षिण भागात सुदृढ धर्माची अभिलाषा धरणारा, वेदाभ्यासपरायण मुनिसमुदाय उपस्थित आहे. सनकादी योगीश्वरही पृष्ठभागी उभे आहेत.

वामभागी आपल्या स्त्रियांसह यक्ष, सिद्ध, गंधर्व, विद्याधर, चारण, किन्नर उभे आहेत. त्यांच्याबरोबर भगवानांवर प्रेम करणाऱ्या मुख्य मुख्य अप्सरा आहेत. हे सर्व लोक नाचून, गाऊन, वाद्ये वाजवून भगवानांची सेवा करतात.

त्यानंतर आकाशस्थ नारदांचे चिंतन करावे. त्यांचे शरीर शंख, चंद्र, कुंद यांच्याप्रमाणे गौर आहे. ते सर्व आगमांचे ज्ञाते आहेत. त्यांच्या जटा बिजलीप्रमाणे पिवळ्या व चमकदार आहेत. ते मोठ्या भक्तीने, सर्व परित्याग करून, संगीताच्या नाना प्रकारांनी भगवानांना प्रसन्न करीत आहेत.

या प्रकारे प्रखर व निर्मल बुद्धीचा पुरुष आपल्या आत्मस्वरूप भगवान नंदनंदनाचे ध्यान करून मानसिक अर्घ्य व उत्तम उपाहार यांनी शरीराच्या आतच त्यांची भक्तिपूर्वक पूजा करतो व बाह्य उपचारांनीही तो त्यांची आराधना करतो. ब्राह्मणांची जशी अभिलाषा होती तीस अनुसरून भगवानांचे हे संपूर्ण ध्यान वर्णन केले आहे.

पद्म पुराण उत्तरार्ध पूर्ण.

